# आबा

( सामाजिक कादंबरी )



लेखक

**वि. वि बोकील**



[illegible]

किंमत ३ रुपये

—१—

आबांनीं वेणूताईशीं लग्न लावलें असें म्हणण्यापेक्षां अत्यंत प्रतिकूल परिस्थितीच्या खाईत स्वतःला लोटून घेतलें असें म्हणणें जास्त सयुक्तिक ठरलें असतें. आयुष्यामध्यें माणसाच्या हातून चुका ह्या होणारच. परंतु वेणूताईशीं लग्न लावण्याची तयारी दर्शविण्याची जी चूक आबांनीं आपल्या म्हाताऱ्या आईबापांच्या भीडेला बळी पडून केली ती मात्र अक्षम्य ठरली. सामान्य चुका निस्तरतांना थोडा फार त्रास सहन करावा लागतोच परंतु आबांच्या हातून घडलेली चूक निस्तरायला त्यांचा उभा जन्म तरी पुरला असता कीं नाहीं याविषयीं शंकाच होती. श्रीमंताच्या मुलींशीं लग्न करण्याचें पुष्कळ वेळां टाळण्याची प्रवृत्ति दिसून येते. श्रीमंताची लाडांत वाढलेली नाजूक मैना गरिबांच्या घरात गोवऱ्या लावतांना थैमान घालील ही भीति व्यक्त करण्यांत येते. परंतु ही भीति हमखास साधार असेलच असें म्हणतां यावयाचें नाहीं. उलट लग्नापूर्वी सामान्य परिस्थितींत वाढलेली मुलगी लग्नाच्या आधारांवर एखाद्या सुखवस्तु तरुणाला नकोजीवसें करून सोडणारच नाहीं असा निश्चित भरंवसा देतां येणार नाहीं.

परिस्थिति कशीहि असो, विवाहाचें यशापयश माणसाच्या हृदयावर

अवलंबून असतें यांत तिळमात्र शंका नाहीं. गरिबाची मुलगी, किंवा श्रीमंताची मुलगी, कोणत्याहि परिस्थितींत वाढलेली मुलगी स्वत: सुखी राहून दुसऱ्यालाहीं सूख देईल कीं नाहीं हें तिच्या मनावरच शेवटीं अवलबून राहतें. वेणूताईच्या मनाची पालटत जाणारीं स्थित्यंतरें अवलोकन करण्यासारखीं होती. खेड्यांत आजवर जीवन व्यतीत करणाऱ्या मुलीला लग्नाच्या निमित्तानें पुण्यासारख्या शहरीं राहायला मिळणाऱ्या कल्पनेंत कमालीचा आनंद भरलेला होता. आबासारख्या मॅट्रिक पास झालेल्या उमद्या तरुणाची प्रथम तिच्या मनावर एकदम छाप पडली. खेड्यातल्या आपल्या इतर सोबतीणीपेक्षां आपलें नशीब जास्त बलवत्तर आहे असें तिला वाटूं लागलें. गांवांतल्या मोडकळीस आलेल्या इनामदारांच्या मैनेचा विवाह एका खेड्यांत झाला. मैना दुसऱ्या एका इनामदारांच्या मोडक्या घराचा वासा ठरली. आता मरेपर्यंत मैनेची खेड्यांतून सुटका होणें शक्य नव्हतें. मैना जेव्हां जेव्हां माहेरा येई तेव्हां तेव्हां ती वेणूला आपली कर्म कटकट खुलासेवार सागत असे व शेवटी दु:खभार हलका करण्यासाठीं तिच्या गळयांत गळा घालून तब्बल तासभर रडून घेत असे. मैनाचें हें उदाहरण डोळयापुढें ठेवून वेणूनें मनाशीं खूणगांठ बांधून ठेवली कीं आईवडिलांनीं जर आपल्याला एकाद्या खेड्यांतच द्यायचा बेत केला तर आपण परसांतल्या विहिरीचा तळ गांठायचा—पण लग्नाला म्हणून संमति द्यायची नाहीं. परंतु वेणूच्या सुदैवानें तसला प्रकार घडून यायचा नव्हता. वेणूच्या मनाप्रमाणें तिला शहरी स्थळ मिळालें. त्यांतून इंग्रजी परीक्षा दिलेला नवरा. शिवाय घरांत माणसें फक्त सासूसासरा व नवरा अशीं तीनच. आणखी काय पाहिजें होतें?

परंतु सुखाला लालचावलेलें माणसाचें मन अमुक एका विशिष्ठ मर्यादेवर थांबेल ही कल्पनाच हास्यास्पद ठरेल. वेणूचें मन खेड्याच्या वातावरणांतून पुण्यासारख्या शहरी वातावरणांत आलें तरी शांत होईना. थोडासा परीचय वाढल्यानंतर तिनें आबाला विचारलें—

" पुण्यापेक्षां मुंबई गांव फार मोठें आहे असें मी भूगोलांत वाचलें आहे तें खरं आहे का? "

भूगोलाच्या पुस्तकांतून दिलेलीं वर्णनें जरीं खरीं असलीं तरीं तीं पुष्कळ

वेळां यथातथ्य कल्पना देऊं शकत नाहींत. मुंबई मोठी आहे हें खरें आहे. परंतु त्याचबरोबर तें बकालीं वस्तीचें गांव आहे इत्यादि खुलासा आबानें केला. वेणूच्या पुढील भाषणावरून तिचा रोख त्याच्या लक्षांत आला. "मग तुम्ही येवढें शिकलेले म्हणतां अन् पुण्यांतच कशाला राहतां ? मी ऐकलं आहे कीं मुंबईंत किती तरी सोयी असतात. आपल्या-सारख्या शिकलेल्या लोकांनीं मुंबईंत राह्यला काय हरकत आहे ?"

"अग पण, मुंबई काय फुकटची आहे ? आपल्या खिशांत पैशाची सोय असली तरच मुंबईच्या सोयींचा आपल्याला फायदा होईल. बरं पण, हा विषय काढण्याचं कारण तरी काय ?" आबा आश्चर्यानें तिच्या तोंडा-कडे पाहात म्हणाला.

"नाहीं—माझं म्हणणं असं कीं मला फार फार वाटतं कीं आपण आपला संसार मुंबईंत थाटावा" लाडिकपणानें वेणू मान वेळावीत म्हणाली.

"तें सारं खरं आहे पण आपलं चार माणसांचं मुंबईला भागलं तर पाहिजे. अंकगणितांतलीं नफ्यातोट्याचीं उदाहरणें स्वतः ग्रंथकर्त्यानं मुळींच अनुभवलेली नसतात. दुसऱ्याच एकाद्या पुस्तकावरून त्यानं आंकडे उतरून घेतलेले असतात. अगदी थेट त्याचप्रमाणं भूगोलांतलीं वर्णनं हीं पुष्कळशा दुसऱ्याच्याच अनुभूतीवरून दडपलेलीं असतात. मुंबई शहर टोलेजंग असेल परंतु त्यांत राहणारे जीव तितक्याच टोलेजंग हृदयाचे असतील याला पुरावा काय ? अन् तें आपल्याला जमणारच नाहीं. आई अन् बाबा—"

"इश्श ! सासूबाई अन् मामंजींना आपल्याबरोबर कशाला न्यायचं ? तुम्हांला मेली हौसच कशी ती नाहीं. इंग्रजी शिकलेले लोक कसे ऐटींत राहतात. समोरचा लखूनाना पहानं. तुम्ही ज्या परीक्षेंत पास झाला आहांत त्या परीक्षेंत गेलीं चार वर्षं तो सारखा नापास होतो आहे. पण म्हणून सुतक्यासारखा चेहरा करून कां गांवभर हिंडायचं असतं ? लांब-सडक केस विंचरून ते चापूनचोपून बसवायला त्याला तब्बल तास लागतो म्हणून कोणसंस म्हणत होतं. का, तोंड कां फिरवलंत ?"

आबानें आपल्या पत्नीच्या स्वभावाची थोडीफार पारख हा वेळपर्यंत केलेलीच होती म्हणा. तिच्या या भोळसटपणाला हंसावें कीं सारी खरी

परिस्थिति तिला समजावून सांगावी ह्याचा अजून त्यानें पुरता विचार केलेला नव्हता. आपल्या वैचारिक भूमिकेंत व पत्नीच्या वैचारिक भूमिकेंत महदंतर आहे हें त्याला कळून आलें होतें. ज्या गोष्टींचा आपल्याला मनापासून तिटकारा आहे, नेमक्या त्याच गोष्टी वेणूला मनापासून आवडत आहेत हें पाहून त्याला अत्यंत विषाद वाटे. बाह्य डामडौल भपक्याप्रीत्यर्थ संपत्तीची होणारी उधळमाधळ आणि विशेषतः स्वतःच्या बरें दिसण्याकरण्यासाठीं वेचलेला अनाठायीं अवास्तव वेळ या गोष्टी आबानें आपल्या आयुष्यांत आजवर कधींच आचरणांत आणल्या नव्हत्या. समोर प्रत्यहीं दिसणाऱ्या मातापितरांच्या उदाहरणावरून आबा जर कांहीं शिकला असेल तर हेंचकीं बावळा वेष असला तरी हरकत नाहीं परंतु हृदय मोठें पाहिजे. वरून दिसायला कळकट चिंधी असली म्हणून आंत बांधलेलें चोख सोनें काय कसाला बरोबर उतरणार नाहीं? वेळप्रसंगी पोटाला चिमटा घेऊन पोराच्या शिक्षणासाठीं असेल नसेल तेवढें किडूक मिडूक पणाला लावणारे आईबाप पाहिले म्हणजे वारंवार त्याच्या मनांत येई कीं त्यांच्याच प्रमाणें आपणही हालअपेष्टा सोसाव्या लागल्या तरी न डगमगतां लोकांच्या कल्याणासाठीं देह झिजवावा. जन्माला आल्याचें सार्थक चार पैसे गाठी पाडून स्वतःच अत्तराचे दिवे पाजळण्यांत मुळींच नसून गोडें तेलाचीच पणती म्हणून कां होईना परंतु आजूबाजूच्या शेकडो लोकाना अंधारांत वाट दाखवण्याचें श्रेय घेण्यांतच आहे अशा तऱ्हेची विचारसरणी तो उराशीं बाळगून होता. आणि वेणूचा खाक्या त्याच्या अगदीं उलट होता. स्वतःचें नटणें मुरडणें यांत बराचसा वेळ ती घालवी. आरशासमोर उभे राहून कुंकू लावतांना तिच्या हालचालींची गंमत पाहण्यासारखी होती. खेड्यांतून वेणू प्रथम पुण्यासारख्या शहरीं आली तेव्हां तिच्या कुंकवाचा आकार चांगला चिंचोक्याएवढा होता. आजूबाजूच्या बायकांचें पाहून हळूहळू ती एकेक नवीन शिकूं लागली आणि एका वर्षाच्या अवधींत तिचें कुंकू जरीच्या टिकलीएवढें बारीक झालें होतें.

सासूच्या सूचनेकडे तिनें लक्ष द्यायचें नाहीं असेंच ठरवलें असलें पाहिजे. दहापांच वेळां सांगूनही सून ऐकत नाहीं हें पाहून उगाच वितंडवाद नको या पोक्त विचारानें सासू मूग गिळून बसूं लागली. प्रत्येक

गोष्टींत हीच तऱ्हा. उष्टीं खरकटीं करतांना ओचे वर घ्यावें ही सासूची सूचना सुनेनें कधींच मानली नाहीं. आजवर भांडीं धुण्याचीं कामें घरां-तच होत होतीं तीं मोलें देण्यांत आलीं. आईवडील घरांत पाहात आहेत या विचारानें आबानें घरांतल्या कोणत्याही बाबतींत लक्ष घातलें नाहीं. वेणूनें तक्रारीवजा कानावर घातलेल्या थातूरमातूर गोष्टींकडे त्यानें पूर्ण दुर्लक्ष केलें. पत्नीच्या वागणुकींत व बोलण्याच्या धाटणींत पडलेला फरक त्याच्या लक्षांत आला नाही असें नाहीं. परंतु योग्य शिक्षणाच्या अभावीं एवढा रासवटपणा राहणं शक्य आहे, तो आपण दोनचार वर्षांत युक्ती-प्रयुक्तीनें घालवून लावूं या समजुतीनें तो स्वस्थ राहिला.

परंतु वेणूच्या मनानें त्याच्या या मुग्धतेचा निराळाच अर्थ लावला. आबा तिला योग्य शिक्षण देण्याची संधि पाहात होता आणि वेणू आबाला चार गोष्टी समजावून सांगण्यासाठीं उत्सुक झालेली होती. प्रत्येक जण आपआपल्या परीनें दुसऱ्याला आपलें ईप्सित पटवून देण्याची परा-काष्ठा करीत होता. वेणूच्या सल्ल्याप्रमाणें आबानें मुंबईस बिऱ्हाड कर-ण्याचा बेत कधींच अंमलांत आणला नाहीं—आणि ही अढी वेणूच्या मनांत कायमची खोल रुजून बसली होती.

भरीसभर म्हणूनच कीं काय आबानें इतर लोकांच्याप्रमाणें 'हपिसर' होण्याचें साफ नाकारलें तेव्हां तर वेणूच्या मस्तकाच्या चिंधड्या उडण्याची वेळ आली. वेणूचें एक अत्यंत नयनमनोहर असें सुखस्वप्न चक्काचूर होण्याच्या बेतांत आलें. आजवर तिनें आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर एक रम्य शब्दचित्र स्वतःशींच रेखाटून ठेवलें होतें. आपला पति हपिसात जाणारा असावा, ह्या कल्पनेभोंवतीं इतर कल्पना रेंगाळणाऱ्या होत्या. साहेब हपिसांत जायला निघाले म्हणजे आपण हातांतलें काम टाकून बाहेर धांवत यायचें, हातानें विडा तयार करून लाजत लाजत तिकडे द्यायचा अन् साहेब दिसेनासे होईपर्यंत दारांत उभें राहून त्यांच्या वाटेकडे पाहात राहायचें; अन् संध्याकाळीं साहेब दमूनभागून परत आले कीं, आधीं बशीभर कांदे-पोहे अन् चहा ताबडतोब दिवाणखान्यांत घेऊन जायचें,—इत्यादि अशाच तऱ्हेची ती स्वप्नमालिका होती. परंतु साहेब आपण होऊन साहेब होण्याचेंच

जेथें नाकारूं लागलें तेथें मडमिणीनें कितीहि तयारी केली तरी त्याचा उपयोग काय ?

मॅट्रिक होऊन दोन वर्षे होऊन गेलीं तरी आबा सरकारी हपिसांत अर्जही टाकीना किंवा एखाद्या निमसरकारी संस्थेंत कुणा वरिष्ठाला भेटायलाही जाईना तेव्हां वेणूचें धाबें दणाणलें. या तिरसिंगरावाला आपण जों जों माणसांत आणण्याचे प्रयत्न करूं लागावे तों तों हा जास्तीच वेडेचार करू लागतो हें पाहून वेणूचा धीर सुटला. कांहींतरी निमित्त काढून तिनें आपल्या आईला वडिलांना चार दिवस पुण्यास बोलावून घेतलें. यापूर्वी आबाला दिवाळसणानिमित्त गेलीं दोन वर्षे माहेरीं खेचण्याचा तिनें विक्रम करून पाहिला होता. परंतु ऐन वेळी आबाचें कांहींतरी महत्त्वाचें काम निघे आणि वेणूला एकटीलाच दिवाळी माहेरीं साजरी करावी लागे. म्हणून एका खेपेस तिनें आई-वडिलांनाच पुण्यास बोलावून घेतलें. आईच्यामार्फत वेणूनें आबाला पेंचांत धरण्याचा डाव टाकला होता. त्याप्रमाणें एके दिवशीं आबाला सासूबाईंनीं प्रेमानें सूचना केली कीं, इतकं शिक्षण झाल्यासरशी आता रोजगारधंदा पाहावा हें बरं. म्हणजे म्हातारपणीं आतां वडीलधाऱ्या मंडळींचे हातपाय पूर्वीसारखे कोठवर चालतील ? अन् पुढलीही व्यवस्था ज्याची त्याला नको का पाह्यला ? आबानें शांतपणें सासूचा सल्ला ऐकून घेतला. दुसऱ्या दिवशीं सासऱ्यानें केलेला उपदेश अत्यंत लीनपणाच्या भावानें ऐकून घेतला—आणि—आणि त्या उपदेशाप्रमाणें तो मुळींच वागला नाही. वेणूनें त्याला एके दिवशीं आपल्या आईबापाच्या उपदेशाची आठवण करून देतांच तो शांतपणानें म्हणाला, " मोठ्या माणसाचा उपदेश झिडकारतांना मला अत्यंत दुःख होत आहे. परंतु माझा नाईलाज आहे."

" कां ? त्यांनीं काय वाईट सांगितल आहे तुम्हांला ? दोन पैसे तुम्ही मिळवले तर त्यावर त्यांना हक्क सांगायला यायचं नाहीं. देवाच्या दयेनं त्यांना जन्मभर पुरेल इतकी जमीन त्यांच्या वांट्याला आली आहे. तुमचा पैसा तुमच्याच घरांत राहील बरं—" वेणू म्हणाली.

" पुन्हां तूं वाकड्यांत शिरलीस. तुझे वडील आणि आई मला स्वतःच्या जन्मदात्यांइतकेच वंदनीय आहेत. मी जर उद्यां पैसा मिळवला तर माझे वडील ज्याप्रमाणें एका कवडीचीहीं माझ्याकडून अपेक्षा करणार नाहींत,

त्याचप्रमाणें तुझ्या माणसांनाही माझ्या दमडीचा लोभ होणार नाहीं हें मी तुझ्याही पेक्षां जास्त चांगलें ओळखून आहे. पण पैसा मिळवावा असं मला वाटत नाहीं—"

" जें जें तुमचं ऐकावं तें तें विपरीतच. मग गळ्यांत बाजाची पेटी अडकवून तुम्ही पुढें अन् तुमच्या पाठोपाठ मी गाणं म्हणत जन्म काढायचा तुम्ही ठरवलं आहेत कीं काय तें तरी एकदां मला कळं द्या–" वेणू त्रासिक मुद्रेनें कपाळावर आठ्या चढवून म्हणाली.

" हें बघ, तुला मी थोडंसं सांगतों. आजवर मी माझ्या जन्मदात्यांजवळ सुद्धां वाच्यता केली नाहीं ती गोष्ट तुला सांगतों. माझी खात्री आहे कीं, तूं माझं म्हणणं नीट ऐकून घेतलंस तर तुझं निश्चित समाधान होईल. ऐकून घेतेस का ? " आबाच्या आवाजांतील तळमळ पाहून वेणूही क्षणमात्र गोंधळल्यासारखी झाली. उत्तराऐवजीं ती आबाच्या तोंडाकडे पाहूं लागली. आबानें अत्यंत गंभीरपणानें तिला आपल्या मनांतील तळमळ व्यक्त करून दाखविली. आबाचें भाषण संपेपर्यंत ती मध्यें एक चकार शब्द बोलली नाहीं.

आबा सांगत होता—" आपलं लग्न होऊन दोन वर्षे झालीं असतील. ह्या वेळपर्यंत कोणत्याही सुजाण पत्नीला आपल्या पतीच्या स्वभावाची, त्याच्या बारीकसारीक खोड्यांची आणि त्याच्या मनांतील विचारांची ओळख व्हावयास पाहिजे. कांहीं मुलींना हें लवकर समजतें व कांहींना जरा वेळ लागतो. ठीक आहे. मी त्याबद्दल तुला दोष देऊं इच्छित नाही. तूं पाहतेंच आहेस कीं मला छानछोकीनें राहण्याचा मुळींच षोक नाहीं. माझे कपडे परीटघडीचे कधींच नसतात. मात्र ते अस्वच्छ न राहावें म्हणून मी रोज आंघोळीच्या वेळीं स्वहस्तानें धूत असतों. माझे कपडे अगदीं गरजेपुरतेंच शिवलेले असतात हें तूं पहातेच आहेस. माझ्या गरजा मी अतिशय कमी केल्या आहेत. सासऱ्यानें भली लठ्ठ गादी दिली असतां मी घोंगडीवर झोंपतों. याचें तुला प्रथम प्रथम फार नवल वाटलें हें मी जाणलें होतें. परंतु तुझें आश्चर्य घालविण्याचा मी सहेतुक प्रयत्न आजवर मुळींच केलेला नाहीं. स्वतः दुसऱ्याच्या गळीं एखादी गोष्ट उतरविण्यापेक्षां स्वानुभवाचें शिक्षण जास्त परिणामकारक असतें. मला वाटलं तूं अनुभवानें या गोष्टीं ओळखशील म्हणून मी बोललों नाहीं. पण आज मात्र गोष्टी अशा थराला येऊन

पोहोंचलेल्या आहेत कीं, मोठ्या नाइलाजानें मला तुझ्या आवडत्या मनोरथाना दुखवणं भाग आहे. दुर्दैवानें तुझ्या आणि माझ्या सुखी आयुष्याच्या कल्पनांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे."

बोलतां बोलतां आबा सहानुभूतीनें तिच्याकडे पाहून थांबला. वेणूनें त्याच्या डोळ्यांकडे पाहण्याचें टाळलें. थोडा वेळ थाबून आबा पुढें बोलूं लागला, " आयुष्यांत प्रत्येकाला कांहीं ना कांहीं तरी ध्येय गाठायचं असतं. ध्येयाविना आयुष्य माणसाला शक्य नाहीं. तुझं ध्येय मात्र माझ्या ध्येयापासून फार निराळं आहे. तुला ज्या गोष्टींत रममाण व्हावेंसें वाटतं त्या गोष्टी मला पोरकट वाटतात. पैसा, मानमान्यता हें तुझं ध्येय असावें. माझें तें निश्चित नाहीं. लहानपणापासून माझ्या मनावर जे अनेक ठसे उमटत गेले त्यांचें आतां असें एक हृदयविदारक ठळक चित्रं बनलें आहे कीं, त्याच्याकडे दुर्लक्ष करणें मला अशक्य आहे. तुला स्पष्टच सांगायचं तर आपलं आयुष्य स्वतःच्या सुखासमाधानासाठीं नसून इतर लोकांच्या मार्गदर्शनासाठीं आहे असं मला वाटूं लागलं आहे. तूं माझं ऐक—पैसापैसा करून जिवाचा आटापिटा करण्यांत पुरुषार्थ नाहीं. पैसा कुणाला पुरला आहे? पैशानं कुणाला स्वास्थ्याची जोड करून दिली आहे? कुबेरालासुद्धां पैशाचीं स्वप्नं पडत असतील आणि बिचारा मध्यरात्रीं घामाघूम होऊन जागा होत असेल. पैशाची अति हाव धरणं हें माणसाचं ध्येय होऊंच शकत नाहीं. पैसा हें साध्य नसून साधन आहे ही गोष्ट आपण केव्हांही विसरतां कामा नये. माझे वडील चार आण्याच्या एकादक्षणीसाठीं उन्हातान्हाचे पावसापाण्याचे गावाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत अनवाणीं रखडत जात असतांना मी पाहिलें आहेत. त्यांना त्या पैशासाठीं किती लाचारी करावी लागत असे याचे चित्र मी विसरूं शकणार नाहीं. भटजीचा धंदा काय प्रतिष्ठित नाहीं? जगांतले इतर धंदे जर चालतात तर एका भिक्षुकानें समाजाचें काय घोडें मारलें आहे? त्यालाही बिचाऱ्याला स्वतःला जगायचं आहे, आपल्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्तींना जगवायचं आहे. आणि मौज ही की, भटजीवर उपहासास्पद कोटी नाहीं असा एक ग्रंथसुद्धां सांपडायचा नाहीं. मी या गोष्टी तुला आकसानें सांगत नाही. तुला माझी भूमिका स्पष्ट कळावी म्हणून इतका विस्तारानें बोलतों आहे. पैसा हें माझ्या आयुष्याचें

ध्येय होऊं शकत नाहीं. याचें कारण म्हणजे पैशापोटीं लाचारी निर्माण होत असते ती मला नको आहे. मला उभा जाळला तरी मी पैशाकरतां तोंड वेंगाडणार नाहीं. अर्थात् मी जें कार्य करायचं ठरवलं आहे, त्या कार्या-करतां पैसा जरूर घेईन. पण मला स्वतःला चैनीला पैसा नको. चरितार्थ चालवायला जेवढा म्हणून पैसा अगदीं जरूरच असेल तेवढा मी केव्हांही मिळवूं शकेन.”

आबाचें लांबलचक भाषण ऐकून वेणू थोडा वेळ स्वतःशींच विचार करीत उभी होती. आबाचें म्हणणें तिला संपूर्णतया पटलें हा मात्र तिच्या मुग्धपणाचा अर्थ नव्हता. या वेड्याला असल्या चमत्कारिक वेडापासून कसें परावृत्त करावें हाच विचार प्रामुख्यानें तिच्या मनांत घोळत होता. क्षण-भरच नजरेला नजर भिडल्यासारखें करून ती म्हणाली, “मग तुम्ही करायचं ठरवलं आहे तरी काय?”

“तें आजच कशाला सांगूं? ओघाओघानें तुला दिसेलच कीं.—” आबा किंचित् हंसल्यासारखे करून म्हणाला.

वेणू आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागली—!

## —२—

थोड्याच महिन्यानीं आबाचें आश्वासन खरें ठरूं लागलें. गांवच्या महारापोरांच्या शाळेंत आबा रोज रात्रीं तास दोन तास शिकवायला जाऊं लागला हें समजतांच वेणूनें पगार किती म्हणून अधीऱ्या मुद्रेनें प्रश्न टाकला. का होईना एकदाची गाडी रुळावर येऊं पहात आहे या कल्पनेनें वेणूला जरा हायसें वाटलें; परंतु 'हौस म्हणून जात असतों' हें उत्तर आबाकडून येतांक्षणींच वेणूचा चेहरा खरकन् उतरला. ज्या गोष्टींत एक छदामाचीही प्राप्ती नाहीं त्या गोष्टीं करण्यांत आपल्या पतीला काय पुरुषार्थ वाटतो हें कोडें तिला अजूनही छळीतच होतें. या बाबतींत तिनें पुन्हां आबाची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला. तिला चडफडत माघार घ्यावी लागली. एका सच्छिल ब्राह्मणाच्या घरांत वाटेल तसल्या माणसांचा विटाळ बेधडक कालवला जातो ह्या मुद्यावर तिनें आपल्या सासूचें मन बिथरविण्याचा प्रयत्न केला परंतु तेथेंही तिला यश आलें नाहीं. माया वेडी असते म्हणून म्हणा किंवा पोराच्या वागणुकींत कांहीं अर्थ असेल या समजुतीनें म्हणा म्हातारीनें सुनेचें बोलणें मनावर घेण्याचें साफ नाकारलें. आबाच्या वडिलांनीही अशाच अर्थाचे उद्गार काढले. "मुली, आतां आमचं काय राहिलं आहे ? तुम्ही आतां कर्ते सवरते झालां आहांत.

तुम्हाला कोणतं चांगलं,कोणतं वाईट आहे सारं कांहीं कळं लागलं आहे आतां आम्ही म्हाताऱ्या माणसांनीं तुमच्या भानगडींत लक्ष घालणं बरं नाहीं.बापाचा जोडा मुलाच्या पायाला येऊं लागला कीं बापानं ओळखायला पाहिजे." आबाच्या वडिलानी हें असें म्हटलें तेव्हां वेणूनें आपला पवित्रा बदलला.

"पण तुम्ही आता ज्या ठिकाणीं एकादष्णीला जाणार त्या ठिकाणीं जर हें कळलं तर लोक तुम्हाला बोलावतील?" वेणू म्हणाली.

"मुली, लहान तोंडीं मोठा घास घेतलाच आहेस तर सांगतों तुला. मी आतां किती दिवस भिक्षुकी करणार आहे? अन आतां भिक्षुकींत राम राहिला आहे का? या शहरात गड्ण्यापेक्षां खेड्यांतलं जोसपण (जोशीपण) शतपटीनं चांगल म्हणण्याची वेळ आली आहे. भटाभिक्षुकाला बोलावल्या-शिवाय खेडेगांवीं कार्य होत नाहीं पण शहरांत अलीकडे रजिष्टर लग्नं व्हायचीं प्रथा पडल्यापासून आम्हाला विचारतो तरी कोण? मुली, जग फार झपाट्यानं बदलतं आहे अन् तें ओळखण्याची अक्कल माझ्या मुलांत आहे याची मला खात्री आहे."

चोहोंबाजूनें कोंडलेली मांजरी जशी निर्वाणीचा उपाय म्हणून नखें बाहेर काढतें त्याप्रमाणें वेणूनें खूप आदळ आपट करून पाहिली. एक दिवस तिनें अजिबात अन्नग्रहण केलें नाहीं. डोकें दुखण्याच्या सबबीवर जी ताणून निजली ती उठेचना.सर्वांनी तिला खाण्याचा खूप आग्रह केला.स्वतः आबानें आपल्या हातानें ताट वर नेऊन दिलें. परंतु वेणूनें रागाच्या भरांत तें ताट कोपऱ्यांत सारून ठेवलें. आबाशीं तिनें खूप वितंड वाद घातला. संतापाच्या भरांत त्याला फाड फाड बोलून घेतलें आणि शेवटीं आक्र-स्ताळीपणानें स्वतःच्याच हातानें आपलें कपाळ बडवून घेतलें.

आबाचा सोशीकपणा वाखाणण्याजोगा होता. पत्नीच्या आरडण्या ओरडण्याकडे त्यानें लक्ष पुरवलें नाहीं—आणि स्वीकृत कार्यापासून तो रेसभरही ढळला नाहीं. जणुं काय हें असें होणारच याचा अंदाज त्यानें या पूर्वीच बांधून ठेवला होता. एकाद्याला मोहापासून दूर करावयाचें तर तो थोडीबहूत हरकत घेणारच. वेणू सीध्या मार्गानें आपलें ध्येय आपल्याला गाठूं देणार नाहीं हें मात्र त्याला त्या दिवशीं पुरतेपणीं कळून आलें. वेणूची ही आदळ आपट म्हणजे पुढच्या बेबनावाची पुसटती छटा होती.

यापुढें कांहीं दिवस वेणूनें अबोल्याचें व्रत धरलें. आबाशीं तर एका शब्दानेंही बोलावयाचें नाहीं हा निर्धार तिनें मनाशीं कायम केला. सासू-सासऱ्याशी कारणपरत्वें मोजकेंच बोलण्याचा तिनें ठराव केला. हा तिचा निर्धार पुष्कळ अंशीं सिद्धीस जाण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच मात्र ती गडबडून गेली. अबोल्याच्या पोटीं तिची एक लाडकी कल्पना होती कीं या शस्त्रानें तरी आबा घायाळ होऊन वठणीवर येईल. घरांतल्या घरांत नवराबायकोनें एक अवाक्षरही काढावयाचें नाहीं हा प्रकार कोठवर चाल-णार? आबा कांहीं दिवसानी खात्रीनें नाक मुठींत धरून शरण येईल ही तिची खात्री होती. आणि हें शस्त्र तिनें आजवर कितीतरी वेळां स्वतःच्या घरीं अत्यंत यशस्वीतेनें पाजळलें होतें. परंतु त्यांत एक गोष्ट ती विसरली होती. ती म्हणजे ही कीं आई वडिलांची एकुलती एक मुलगी, पुष्कळशी लाडांत वाढलेली म्हणूनच आई वडील तिचें म्हणणें विनातक्रार मान्य करून घेत असत. परंतु दुसऱ्याच्या घरीं तें कोण चालूं देईल? घरची अरेरावी सर्वत्र सारख्याच प्रमाणांत कशी गाजवतां येईल? आपल्या या राखीव शस्त्राला कोणीच जुमानीत नाहींत हें पाहून ती जास्तच चिडली.

त्यात भरींत भर म्हणूनच कीं काय तिलाच सासू सासऱ्यांना शरण जाण्यासारखें एक नवीन कारण घडून आलें.

गेलें तीन चार महिने आपल्या प्रकृतींत कांहींतरी बदल झाला असावा अशी तिला खात्रीलायक शंका वाटूं लागली. रोज सकाळीं अलीकडे अंथरुणांतून उठ-तांना तोंडाला कमला तरी चिकटा आल्यासारखें तिला वाटूं लागलें. तोंडाला जी मळमळ सुटायची ती अंग धुईतोंपर्यंत जायची नाहीं. अंग जड झाल्यासारखें वाटत होतें. कशांतही उत्साह वाटूं नये, कुणाशीं बोलूं नये आणि कांहीं करूं नये असल्या विचित्र गोष्टी तिला भंडावून सोडूं लागल्या. तशांत आपण घरांत इकडून तिकडे वावरत असतां सासूबाई आपल्याकडे बारीक नजरेनें कां पहात असतात हें तिला नीटसें उमगेना. तशांत काम पडलें तर वाड्यांत हिंडायला गेले असतां बरोबरीच्या मुली आपल्याकडे पाहून कांहीं तरी अपसांत कुजबुजत, खाणाखुणा करून हंसतात याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटें. कुणी आपल्याकडे पाहून हसायला लागले कीं आपल्या नाकाला कांहीं काळें तर लागलें नसेल या शंकेनें ती लगबगीनें घरांत येऊन

आरशांत पाही. कांहीं नाहीं. मग हें लोक हसतात कां? मात्र आंत येताना ती लगबगीनें येत असे त्या श्रमानें तिच्या कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागत, किंचित् श्वास जोरानें चालू होई व छातींत धडधडल्यासारखें होई. हे असें कां होत आहे याचा तिला थोड्या दिवसानें खुलासा झाला.

" अग, हें असंच व्हायचं पहिलटकरणीला ! त्यांत भिण्यासारखं कांहीं नाहीं. तुझं तरी फार सोपं. आबाच्या वेळेला तर माझा जीव राहतो कां जातो अशी अवस्था माझी झाली होती. तापानं अन् ओकाऱ्यानं जीव नुसता हैराण झाला होता. त्यांतून अन्नावरची वासना अजिबात उडालेली." वेणूनें हा सासूच्या तोंडचा खुलासा ऐकतांच डोळे मिटून घेतले. होय! तिला आनंद झाला होता ! आपल्या आयुष्याला आता निराळेंच वळण मिळणार या सुखसमाधींत ती मशगुल होऊन गेली होती. आणि आपला अबोला ती अजिबात विसरून गेली. मैत्रिणीच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष होणाऱ्या चेष्टा अनुभवीत असतां तिचें सारें शरीर आनंदानें महीरून जाई. वरकरणी आपल्याला असल्या चेष्टा खपत नाहींत असें दर्शविण्याची पूर्वापार चालत आलेली स्त्रीवर्गाची सलज्ज भूमिका तिनें यथातथ्य पार पाडली परंतु तिला मनापासून वाटें कीं अशीच चेष्टा सगळ्यांनीं करावी. विशेषत: आबानें आपली गंभीरमुद्रा सोडून आपल्याशीं खेळत राहावें असें तिला मनापासून वाटें. आणि आबानेंहि पण सवड सापडेल तव्हां तिच्याशीं खेळत बसण्याचें नाकारलें नाहीं.

आतां आबाच्या हालचालीवरून तिचें लक्ष उडालें. आणि तें उडणें अगदीं क्रमप्राप्त होतें. एकुलत्या एक मुलाची बायको, तिचे डोहाळे पुरविण्यास सासू सासरा पुढें येणार नाहींत म्हणजे काय गोष्ट आहे? गरिबीच्या पद्धतीनें कां होईना परंतु झोपाळ्यावरचीं डोहाळ जेवणें झालीं, चांदण्यांतलीं झालीं, बागेंतलीं झालीं-कोणताही प्रकार म्हणून बाकी राहिला नाहीं. या धांदलींत गुंग झालेली वेणू पतीच्या हालचालीकडे लक्ष देईनाशी झाली हें रास्तच होतें. स्त्रीच्या आयुष्यांत हा काळ मोठा बहारीचा असतो यांत शंका नाहीं. मैत्रिणीच्या ताळतंत्र सुटलेल्या गप्पा ऐकतांना कोण आनंद वाटतो जिवाला ! किंचित् डोळे मिटून मागें रेलल्यासारखें व्हावें कीं भोवतीं हा मुलींचा तांडा ! काय झालं? कांहीं दुखलं, खुपलं कां?

ए नको गडे, तूं आमच्या धांगडधिंग्यांत कशाला येतेस? तूं आपली दुरूनच पहा कशी. आतां तूं राणी आहेस. सिंहासन सोडून तूं आमच्यांत येऊन मिसळावं हें शोभेल का तरी? आणि नंतर हशा पिकला नाहीं तर नांव कशाला!

वेणूचें जरी दुर्लक्ष झालें असलें तरी आबा आपल्या कर्तव्यापासून मुळीच माघारीं आला नव्हता. इतके दिवस रात्रीं तास दोन तास तो बाहेर जाई परंतु आतां दुपारींसुद्धां जेवण झाल्याबरोबर तो बाहेर पडे. एकादेवेळीं तो घरींच असला कीं अनेक लोक त्याच्याकडे येत आणि तास न तास त्यांच्या गप्पा चालू असत. वेणूनें सहजच कौतुकानें प्रश्न केला असतां तितक्याच खेळकरपणानें आबानें उत्तर केलें कीं, "तुम्हां बायकांची चंगळ असते. तुम्ही आम्हाला गोत्यांत आणून टाकतां अन् आपण खुशाल जेवणं झोडीत बसतां!"

"इश्श! कांहीं तरीच काय बोलणं!" म्हणून म्हणत वेणूनें असें कांहीं तोंड मुरकलें कीं क्षणमात्र आबासुद्धा जाग्यावर खिळून उभा राहिला.

आबाच्या विचारांचा कानोसा वेणूला आला होता. कुठेंतरी खेड्यांत जाऊन लोकशिक्षण देण्याचा प्रयत्न करण्याचा त्याचा विचार तिच्या अर्धवट कानांवर आला होता. कॉंग्रेसच्या 'खेड्यांत चला' या आदेशानुसार कांहीं मंडळीं हा ग्राम सुधारणेचा प्रयत्न करीत होती. त्यांत आपल्या नवऱ्यानें भाग घेऊन स्वतःच्या आयुष्याची माती करून घ्यावी हें वेणूला पटणें शक्य नव्हतें. परंतु ही वेळच अशी होती कीं वेणूला प्रत्यक्ष आडकाठीं आणतां येत नव्हती. आपला विरोध वेळप्रसंगीं शब्दानें व्यक्त करण्यापलीकडे तिनें फारसें कांहीं केलें नाहीं. इतक्या गोष्टी थराला आल्याच तर आपण कांहींना कांहीं तरी करून आबाला त्याच्या या मूर्खपणापासून परावृत्त करूंच करूं या दृढ विश्वासानें ती कांहीं काळ गाफील राहिली. परंतु ह्या गाफीलपणांचें प्रायश्चित तिला भोगावें लागावयाचें होतें.

एके दिवशीं आबानें वेणूला आपल्या बेताची निश्चित रूपरेखा सांगून टाकली. आपल्या या नवीन बेताचें कोयनेल वेणू सुखासमाधानानें गिळणार नाहीं ह्याची त्याला खात्री होती म्हणूनच प्रत्येक वाक्य तो तोलून मापून वापरीत होता. आबा तिला सांगू लागला—

" मॅट्रिक होऊन तीन वर्षे मी इकडे तिकडे करण्यांत घालवलीं. तुलाही माझी निष्क्रियता पसंत पडली नाहीं. तेव्हां आतां उद्यापासून मी कार्याला सुरवात करणार आहे. उद्या माझा बाविसावा वाढदिवस आहे. जन्मदिवसाचा मुहूर्त चांगला असतो असें म्हणतात–"

" पण उद्यांपासून तुम्ही काय करायचं ठरवलं आहे ? अन् ही कपड्यांची बांधाबांध कशाकरतां ? " वेणू आश्चर्यानें म्हणाली.

" वा: ! शाहणीच आहेस कीं. अग, विंचवाचं बिऱ्हाड पाठीवर नको? " आबा हसून म्हणाला.

" हंसूं नका. मला सगळं नीट सांगा. तुम्ही कुठं जाणार आहांत ? काय करणार आहांत ? अन किती दिवस परगावीं राहणार आहांत ? "

" बापरे ! प्रत्यक्ष यम धर्मालासुद्धां इतके प्रश्न सुचायचे नाहींत. रागवूं नकोस. तुला चेष्टासुद्धा समजत नाहीं. अग, मी तुला मागें सांगत नव्हतों कां, त्याप्रमाणं मी साक्षरता प्रसार करण्यासाठीं कांहीं दिवस खेड्यांत जाऊन राहणार आहे."

" मला वाटलंच होतं कीं शेवटीं तुम्ही असा माझा गळा केसानं कापणार म्हणून. तुम्हांला जर स्वतःच्या आयुष्याची ही परवड करून घ्यायची होती तर माझ्याशीं लग्न तरी कां केलंत ? मी साफ सांगतें मी जीव गेला तरी पुन्हां खेड्यांत पाऊल टाकणार नाहीं अन् तुम्हालाही असलीं थेरंथेरं करूं देणार नाहीं. तुमच्यापुढें जीव हसडून प्राण देण्याचीच काय ती बाकी राहिली आहे." वेणू त्वेषानें म्हणाली.

थोडा वेळ आबा स्वतःशींच विचार करीत उभा होता.

" पण मी खेड्यांत जायला निघालों यांत बिघडलं कुठं ? तुझं त्यांत काय अकल्याण होणार आहे ? " आबा समजावणुकीच्या सुरांत म्हणाला.

" तें तुम्हाला लाख वेळा मी सांगितलं तरी समजणार नाहीं. खेड्यांत जाऊन पुन्हां जनावरांची काडी वैरण, त्यांचा गोठा साफ करणं, रानशेण्या गोळा करीत रानोमाळ हिंडण अन् वर्षाला दोन सुतडे नेसून मिरवणं माझ्याच्यानं मुळींच जमणार नाहीं. खेडवळ माणसाशीं आजवर झाला एवढा परिचय बस्स् आहे; अन् माझ्या मैत्रिणींना मी तोंड तरी कसं दाखवूं ? "

" बरं—आतां आपला विचार विनिमय अन् सल्ला मसलत पुरे झाली. उद्या मी इथून जाणार आहे हें निश्चित " आबा निश्चयानें म्हणाला.

" मग बाहेरचा एक धोंडा आणा, तो माझ्या टाळक्यांत मारून माझा जीव घ्या अन् मग माझ्या नावानं अंघोळ करून तुम्हाला बारा वाटेनं जिकडं जायचं असेल तिकडं खुशाल जा. काय हो, तुम्ही जाणार म्हणता अन् इथें माझी काय वाट ? " वेणू संतापानें म्हणाली.

" हें बघ, असा त्रागा करण्यांत काय फायदा आहे ? तुला मी इथें ठेवून जातों म्हणजे कुठें रानांत एकटीला सोडून जातों आहे असा का त्याचा अर्थ आहे ? घरांत आईला अन् आण्णाना मी सर्व कांहीं सांगून जातों आहे. माझ्या गैरहजेरीत तुझें यत्किंचित् न्यून ते पडू देणार नाहींत. किती झालं तरी ते माझे जन्मदाते आहेत. शिवाय तुझ्या आई वडिलांना मी कालच पत्र टाकलं आहे. दोनचार दिवसांत ते इथें येऊन थडकतील. तुझ्यापेक्षां मला जास्त काळजी आहे."

" ठीक आहे येऊं दे. सगळ्यांना इथं जमवलं आहेत तें छान केलं आहेत. आतां साऱ्या नातलगांना टाहो फोडून विचारीन कीं हे माझा असा छळ करतात तें कशाच्या जोरावर ? माझी एक एक गोष्ट यांना पसंत पडत नाहीं म्हणजे काय ? मला यांच्या गळ्यांत एवढ्यासाटींच बांधलंत काय ? त्यापेक्षा शिवारांत विहिरी काय थोड्या होत्या ? तुम्हाला जड वाटलेली लेक विहिरींच्या पाण्याला खास जड वाटली नसती—"

" तूं जरा हळू बोल. हें जें तूं काय बेदरकारपणानं बोलत आहेस तें हळूं बोललीस तरी मला ऐकूं येईल कीं. लोकांची उगाच झोपमोड कां ? "

" मी वाटेल तेवढ्या मोठ्यानं बोलेन. मला कुणाची बंदी आहे ? ज्याला ऐकवत नसेल त्यानं आपले कान फोडून घ्यावेत नाहींतर कापसाच्या गुडद्या कानांत अडकावून घ्याव्यात. मीं मोठ्यानं बोलणार–बोलणार, बोलणार–" तारस्वरांत आवाज चढवून वेणू म्हणाली.

काय यावर उत्तर देणार ? वेणूच्या रागाची मर्यादा संपून तिचा संताप झाला. नंतर संतापाची जागा बेभानपणानें घेतलेली दिसत होती. युक्ती प्रयुक्तीनें आतां तिच्याशीं बोलण्याची सोय उरली नव्हती. आबा मुकाट्यानें खालीं मान घालून आपल्या सामानाची आवराआवर करूं लागला.

बेभान झालेल्या माणसाच्या तोंडीं लागण्यांत काय शाहणपणा? ठरल्या-प्रमाणें आबा दुसऱ्या दिवशीं सकाळीं आईबापांच्या पायावर डोकें ठेवून मार्गस्थ झाला. वेणूच्या अंगाचा तिळपापड उडाला होता. आबा घरांतून जातांना ती खालींसुद्धां आली नाहीं. सासूनें तिला हाक मारलेली तिनें ऐकली होती परंतु हाकेला ओ देण्याचेंसुद्धां तिनें टाळलें. शेवटीं आईनें आबाला दोन दशम्या स्वतः हातानें करून बांधून दिल्या. आईचें हृदय तें—तिला राहवेना म्हणून तिनें आबाला अखेरीस विचारलेंच—

"आबा, तुझ्या कुठल्याही गोष्टींत आम्ही दोघांनी आजवर हरकत घेतली नाहीं नी यापुढेंही आम्ही तुला आडवणार नाहीं. तूं आतां चांगला इंग्रजी लिहायला शिकलेला तुला बरं वाईट सारं कांहीं कळत आहे पण एक गोष्ट सारखी राहून राहून मनांत येते आहे—विचारूं कां?"

"आई, तुटकपणानं तूं आजच कां असा प्रश्न विचारते आहेस! त्यांतून तुम्हा दोघांना विचारल्याशिवाय मी आजवर एक तरी गोष्ट केली आहे का?"

"तसं नाहीं, परवां तूं सारं आम्हाला सांगितलंस, कबूल आहे. पण लग्न झाल्यावर मुलगा आईचा रहात नाहीं. त्याच्यावर बायकोची सत्ता असते. मुलीचं अन् तुझं पटत नाहीं हें आतां साऱ्या गांवाला कळून चुकलं आहे. नवराबायको कुठं भांडल्याशिवाय का असतात? मी अन् हेसुद्धां पहिल्याप्रथम असेच वर्दळीवर येत असूं. संसारांत भांड्याला भांड हें लागा-यच्चंच; पण भांड्याचा नाद आपण लागलीच दाबून धरायचा असतो." आई म्हणाली.

"पण आई, आतां तं सारं पाहते आहेस. मीं आतां कसं वागावं हें तूंच सांगेनास. एका मूर्ख आणि लहरी मुलीच्या कलानं वागून माझ्या आयुष्याचा मी विचका करून सोडावा अन् आजवर उराशीं बाळगलेल्या विचारांना मूठमाती द्यावी असं का तुझं सांगणं आहे?"

"तसं मी तुला का सांगेन? मुलाच्या ध्येयाच्या आड येणारीं माता-पितरें हीं त्यांची पूर्वजन्माची सूडकरीच म्हणावी लागतील अशानं. पण असं वाटतं कीं, मुलीची सुटका झाली म्हणजे मग तिची समजूत काढून तिला बरोबर नेलं तर नाहीं का चालायचं?"

" आई, तें शक्य नाहीं असं मला वाटतं. तिचा स्वभाव दिवसेंदिवस जास्तच हेकेखोर बनत असलेला तुम्हीं पाहतांच आहां. त्यांतून आज तीन वर्षें जी माझ्या विचाराशीं समरस होऊं शकली नाहीं, ती उद्यां दोनचार महिन्यानीं एकदम पालटेल हें मला पटत नाहीं. आई, जे स्वभाव मुळांतच भिन्न आहेत ते कधींही एक होणं शक्य नाहीं. तिच्या सुटकेची तुम्ही इथें असतांना मी कशाला उगाच काळजी करीत बसूं ? तूं आहेस–अण्णा आहेत अन् शिवाय तिचे आईबापही दोनचार दिवसांत येतील. त्यातून माझी गरज लागलीच तर अण्णांच्या जवळ मी आपला पत्ता देऊन ठेवतों आहे. बरं, मी जाऊं आतां ? स्टँडवर लौकर गेलं पाहिजे मला—" आईच्या पायावर डोकें टेकवून आबा जाण्यासाठीं तयार झाला. डोक्यावर रुमालाची वळकटी कशीबशी ठेवून बाहेर आलेले वडील पाहतांच आबानें हसत मुखानें त्यांच्या पायांवर डोकें टेकवलें.

" कुठेंही रहा बाबा पण सुखांत रहा म्हणजे झालं—" वडील सद्गदित कंठानें म्हणाले.

" एवढा आशीर्वाद, अण्णा, तुमचा माझ्या डोक्यावर असतांना मला काळजी करण्याचं काय कारण आहे ?" आबा हंसत हंसत घराबाहेर पडला.

चार दिवसांनी वेणूचे आईवडील येऊन ठेपले. आईच्या गळ्यांत मिठी मारून वेणू एक दिवस धाय मोकलून रडत होती. लेकीचे अवसान पाहून माय माउलीनेंही जरा चढ्या सुरांत आपलें दुःख वाड्यांतील लोकांना जाहीर करून टाकलें.

आबाच्या आईवडिलांना मेल्याहून मेल्यासारखें झालें. लोकांना तोंडादेखलं बोलून विस्तवांत तेल टाकण्याचें कार्य मनापासून आवडत असतें. कुणी आबाच्या हेकटपणाला नांवें ठेवावींत, कुणी वेणूच्या आयुष्याचे धिंडवडे उडाल्याबद्दल सहानुभूति प्रकट करावी, कुणी आबाच्या आईबापांची बाजू उचलून धरावी असा उलट सुलट प्रकार एक आठवडा भर चालू होता.

—आणि एके दिवशीं अकस्मात वेणूच्या पोटांत कळा येऊं लागल्या ! अजून पुरते दिवस गेले नव्हतें म्हणून प्रथम कोणी फारशी चौकशी केली

नाहीं. सुमारे चौदा तासांच्या घालमेलीनंतर वेणू अपुऱ्या दिवसाची बाळंतीण झाली. आणि दुर्दैवाची गोष्ट कीं मुलगा होऊन तो पांच सहा तासावर जगला नाहीं. अतिश्रमानें वेणू मुलगा गेला तेव्हां शुद्धींत नव्हती. वेणूची प्रसूति अति जड ठरली. घरच्या माहितगार बायाबापड्यांच्या हातून कार्य निभावणार नाहीं असा अंदाज येतांच डॉक्टर आणण्यांत आला. खर्चाला कोणीहि मागें पाहिलें नाहीं—परंतु वेणूच्य गेल्या सात आठ दिवसाच्या हट्टीपणामुळें आणि आततायीपणामुळें तिला अतिशय त्रास सहन करावा लागला. वेणू शुद्धीवर आली आणि जेव्हा तिला मुलाच्या निधनाची हकिकत तिच्या आईनें भीतभीत सांगितली तेव्हां वेणूनें पुन्हां डोळे गरकन् फिरवले. आणि पुन्हां डॉक्टर आणण्यासाठीं धावपळ सुरू झाली. वेणूला नंतर सडकून ताप भरला. या साऱ्या गडबडींत आबाला कळवण्याचें कुणाच्याच लक्षांत राहिलें नाहीं. आणि कळवून तरी काय उपयोग होता ? आबा लगोलग येऊन काय करूं शकला असतां ? परंतु एवढें मात्र निश्चित कीं आबाचा हलगर्जीपणा वेणूनें मनांत ठेवून दिला !

## —३—

दहा वर्षांचा काळ निघून गेला. वेणूचीं आणखी तीन बाळंतपणें झालीं. आणि प्रत्येक खेपेस पहिली खेप फार कमी त्रासाची असें म्हणण्याची पाळी आली.

आबानें दहा वर्षांत जगाकडून बरींच भलीं बुरीं बोलणीं सहन करून घेतलीं होतीं. कॉंग्रेसच्या साक्षरताप्रसाराच्या ध्येयानें भारून जाऊन आबानें प्रथम धडाडीनें पुढें पाऊल टाकलें खरें परंतु पुढें त्याला आपली चूक कळून आली. अर्थात् ही चूक कळून यायला दहा वर्षांचा काळ जावा लागला.

आबा ध्येयवादी तरुण होता. ध्येयाच्या दिशेनें तनमनधनें करून चालत राह्यचें एवढें साधेंसुधें तत्त्वज्ञान त्याला पाठ होतें. मार्गांत अनेक संकटें येणारच. त्या संकटाना न भीतां, न चाचरतां अव्याहतपणें आपलें कार्य सुरू ठेवण्याचें त्याला माहित होतें. हिंदुस्थानांत अडाणी लोकांचा बहुसंख्य भरणा आहे. हें समजावून सांगायला एकादा गणीतीच बोलावला पाहिजे अशांतला भाग नाहीं. आबाच्या मनाला ही रुखरुख लागून राहिली होती. तो स्वतःच्या कुवतीप्रमाणें विचार करायला शिकला होता. राजकारणाचा आखाडा रंगविणारा एकादा कार्यकुशल नेता ही

भूमिका त्यानें स्वतःकडे कधींच घेतली नाहीं. उलट चार सामान्य लोकां-पैकींच तो स्वतःला एक समजत होता. आणि सामान्य लोकांच्या दृष्टीनेंच तो हिंदुस्थानांतल्या वेळोवेळीं पालटणाऱ्या राजकारणांतील रंगाकडे कौतुकानें पहात होता. आपल्याला स्वतःला काय वाटतें याची शेखी दुसऱ्या कोणा-जवळसुद्धां मिरवली नव्हती.

मागच्या पिढींत जे जे समाज सुधारक होऊन गेले त्यांचीं चरित्रें त्यानें वाचून काढलीं होतीं. त्यांचें कार्य त्यानें सूक्ष्मपणानें अवलोकन केलें होतें. त्याची खात्री झाली होती कीं गेल्या पिढींतल्या कर्त्या पुरुषांनीं समाजांतील मूठभर पांढरपेशा वर्ग थोडाबहुत जास्त शिकवून सोडला होता. यापेक्षां जास्त भरीव कामगिरी त्याच्या हातून झाली नव्हती. शहरांतून नोकरी-धंद्याच्या निमित्तानें वस्ती करून राहिलेला मूठभर शिक्षित वर्ग दोनचार परीक्षा जास्त देऊं लागला होता. सालोसाल मॅट्रिकला बसणाऱ्या विद्या-र्थ्यांची संख्या झपाट्यानें फुगत होती. शाळा कॉलेजांच्या इमारती नवीन नवीन उठत होत्या. आणि शिक्षणाचा प्रसार झाला असें सर्वजण समजत होते. विश्वविद्यालयानें आपल्या कामाचा व्याप अवास्तव वाढवून ठेवला होता. आणि या सर्व गोष्टींचा परिपाक म्हणूनच कीं काय बेकार पदवीधर गल्लोगल्लीं शहरांतून खालीं मान घालून हिंडतांना प्रत्यही दिसत होते. अशा या बेकार पदवीधरांनीं एखादी राजकारणाची तत्कालीन लाट आली कीं रिकामा वेळ घालवायला साधन म्हणून त्या चळवळींत भाग घ्यावा आणि ती लाट ओसरून गेली कीं पुन्हां नोकरीसाठीं अर्ज खरडण्यासाठीं बाजारांतून कागद विकत आणावेत हा प्रकार सर्रास चालू होता.

आणि शिक्षणाचा प्रसार केवढा झाला म्हणून राज्यकर्त्यांनीं स्वतःच्या पाठी थोपटून घ्याव्या !

मुलांचें शिक्षण वाढलें इतकेंच नव्हे तर मुलींचेंसुद्धां शिक्षण प्रगत झालें आहे हें सरकारी रिपोर्टावरून ध्यानांत आलें असतें. तीस वर्षांपूर्वी एखादीच मुलगी कॉलेजांत भीतभीत प्रवेश करणारी आढळून येई, त्या-ठिकाणीं आज गोकुळांतील कुंजवन सजल्याचा भास होऊं लागला. मुला-मुलींना सहशिक्षण मिळूं लागलें—आणि अनेक भानगडी उपस्थित झाल्या ! किती अभिमानाची गोष्ट आहे, नाहीं ? कोणत्याही समाजशास्त्र-

झाला गौरवास्पद वाटण्याजोगींच ही परिस्थिति होती यांत शंका नाहीं, समाजाची प्रगति आणखी कोणती व्हायची बाकी राहिली होती ?

हें सर्व वरकरणीं दिसायला छान होतें. आणि तें तसें छानही वाटलें असतें परंतु हिंदुस्थानांतील मूठभर शहरें म्हणजेच हिंदुस्थान असा कांहीं प्रकार घडून आला असता तर मग कांहींच हरकत नव्हती. शहरात शिक्षणाची प्रगति म्हणजेच हिंदुस्थान देशाची प्रगति असें एकादें सोयीस्कर समीकरण कुणीं बसवलें असतें तर ठीक झालें असतें. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं शहरांची मर्यादा ओलांडली म्हणजेच खरा देश सुरू होतो. अफाट देशांत ठिकठिकाणीं पांगलेली खेडयांतील जनता यांच्याकडे कुणाचेंच लक्ष गेलें नव्हतें. त्याच्या अडचणी कोणत्या आहेत, त्यांना काय पाहिजे आहे आणि त्यांच्यासाठीं काय केलें पाहिजे याचा विचार कुणीच मनापासून केलेला दिसत नव्हता. नाहीं म्हणायला मधून मधून एकादा वाचिवीर आरडाओरडा करून उठे, त्वेषानें हाताच्या वळलेल्या मुठी टेबलावर आपटून ग्रामीण जीवनांविषयीं काहीं तरी बडबडे. लोक त्याचें व्याख्यान छान झालें असें समजून घरोघरीं जात आणि मूळ मुद्दा पूर्ववत तसाच खितपत पडून राही. मधेंच एकादा महाभाग केव्हांतरी खेडयांत फेरफटका मारून येई आणि शहरातल्या लोकांना सांगे कीं आपण यांच्याकरतां कांहीं तरी केलें पाहिजे. चार कळकळीचे लोक खेडयाची सुधारणा करण्याच्या महत्त्वाकांक्षेनें खेडयांत जाऊन थोडीशी टुरटूर करीत आणि स्वतःच्या उद्योगधंद्याला म्हणून पुन्हां शहरांत माधारीं येत. त्यामुळें खेडयांतील जनतेंत एक प्रकारचें तात्कालिक औत्सुक्य पसरे परंतु परीटघडीचे कपडे घातलेला हा गावठीसाहेब आपल्यांत लुडबुड करतो हें न आवडून ते लोक जास्तच साशंक बनत. शहरी मनुष्य खेडयांत जाई तो तेथील लोकांवर उपकार करतो आहोंत या भावनेनें जाई. आणि मनुष्य स्वभावच असा कांहीं चमत्कारिक आहे कीं आपल्यावर उपकार करायला कुणी आला आहे असा नुसता वास लागायचा अवकाश, कीं तो ताबडतोब बिथरतो. उपकाराचा यांत काय प्रश्न होता ? उपकार कोण आणि कुणावर करणार ?

याचा परिणाम साहाजिकच असा होई कीं शहराचें राजकारण बरेचसें एकांगीं होऊं लागलें. खेडयातील माणसाची मूलतः हीच भावना होऊन

बसली की या शहरी लोकांची कांहींतरी कुलंगडीं असतात आणि त्यांत हें लोक मोठ्या हिकमतीनें आमच्यासारख्या गरिबांना गुंतवून घेतात. एकदोन असले ग्राम सुधारणेचे प्रयोग फसलेले आबानें डोळयानें पाहिले होतें. दहा-पंधरा माणसें एकाद्या शेतावर सुटीच्या दिवसांत येत, कांही ओबडधोबड ताली रचून ठेवीत आणि जातांना सबंध जागा म्हणजे कचऱ्याच्या पेटी-सारखी घाण करून निघून जात; मधून मधून मॅजिक लॅटर्नच्या साहाय्यानें गांवकऱ्याना रोगराई, पीकपाणी, जमिनीची लागवड, मशागत रशियांत कोणत्या पद्धतीने केली जाते याची माहिती दिली जाई. गाव स्वच्छ कसा ठेवावा याचें प्रात्यक्षिक म्हणून चार उत्साही लोक हातांत झाडू घेऊन सबंध गांव स्वच्छ करून दाखवीत. हें सर्व त्या त्या परीनें ठीक होतें. परंतु या सर्व व्यवहारांत एकच बाजू चुकत होती ती ही कीं ज्या अज्ञ जनतेला आपण हे अमृताचे कुंभ पाजीत होतों ते कुंभ पचविण्याची त्याची मान-सिक तयारी होती कीं नाहीं याचा फारच थोड्यांनी तपास काढला होता. जनतेच्या पोटांत शिरून, म्हणजे त्यांच्यातलेच आपण एक होऊन या गोष्टी करायला पाहिजे होत्या.

—आणि याच गोष्टी कॉंग्रेसच्या साक्षरता प्रसाराच्या बुडाशीं असाव्यात असें आबाला वाटत होतें. जनतेंत मिसळून त्यांना लिहायला वाचायला शिकवले, त्यांच्या हातांत वर्तमान पत्रें पोहोंचतील अशी व्यवस्था केली, आणि जगांतील इतर देशांत होणाऱ्या घडामोडींचें ज्ञान त्यांना झालें म्हणजे रोगाचें समूळ उच्चाटण झालेंच पाहिजे असें त्याचें ठाम मत बनलें होतें. अनुकरणप्रिय मनुष्यजात एकदां साक्षर झाली कीं ती झपाट्यानें प्रग-तीच्या मार्गावर आलीच पाहिजे. स्वतःच्या जमिनीचा मगदूर वाढून चार पैसे मिळवावेत असें कोणता शेतकरी म्हणणार नाहीं? कर्जापायीं घराण्याचें वाटोळें झालें तरी चालेल असें कोण म्हणेल? एकमेकाचें सहाय्य घेऊन सुपंथ धरण्याची कोणाला इच्छा होणार नाहीं?

परंतु हें सर्व घडवून आणायचें तर शिकलेल्या लोकांनीं प्रथम थोडेसें खालीं यायला पाहिजे. शेतकऱ्याच्या मनांत अकारण वा सकारण आपल्या-विषयीं निर्माण झालेली अढी आपण आपल्या हातानें आधीं दूर केली पाहिजे. त्याच्या परंपरागत चालत आलेल्या संशयी वृत्तीला घालवून दिलें

पाहिजे. बाबारे ! मी तुझाच आहे. तुझ्यांतलाच आहे आणि तुझ्यांतला म्हणूनच तुझ्याजवळ राहीन असें त्याला पटवून दिलें पाहिजे. शेतकऱ्याला साक्षर करतांना तो साक्षर व्हायला तयार झाला हा त्याचा आपल्यावर फार मोठा उपकार आहे असेंही वेळप्रसंगी त्याला वाटायला लावलें तरी हरकत नाहीं. कांहींही झालें तरी देशांतल्या बहुसंख्य लोकांचा अडाणीपणा घालवला पाहिजे. त्यावाचून राजकारणांतला कोटलाही डाव यशस्वी होणें शक्य नाहीं.

—अर्थात् आबाच्या या विचाराप्रमाणें त्यानें कॉंग्रेसच्या 'खेड्यांत चला' या घोषणेला सक्रिय पाठिंबा दिला, स्वतःच्या घरादाराची त्यानें काळजी केली नाहीं. खेडयांतील जीवनाविषयीं कमालीचा तिरस्कार वाटत असल्यामुळें ठाई ठाई विरोध करणारी स्वतःची पत्नीही त्यानें जुमानली नाहीं. पैशाविषयीं आणि मानमरातबीविषयीं तो प्रथमपासूनच विरक्त होता. आबानें आपल्या ध्येयाशीं सुसंबद्ध वाटणारा हा कॉंग्रेसचा मार्ग तात्काळ जवळ केला.

परंतु व्यवहारांत नेहमीं होतें काय कीं तत्त्व उदात्त असतें परंतु त्या तत्त्वाचें पालन करणारे पाईक दुबळे पडतात. गेल्या दहा वर्षांत आबानें तीन चार वेळां ज्या लोकांशीं सहकार्य केलें त्या लोकांचा त्याला तितकासा चांगला अनुभव आला नाहीं. जनता साक्षर करणें हें ध्येय त्याला एकदम मान्य होतें परंतु हें ध्येय गांठण्यासाठीं जे मार्ग अवलंबिले गेले ते त्याला पसंत पडले नाहींत. पुष्कळवेळां कॉलेजांतून शिकणारे अर्धे कच्चे सुशिक्षित लोक त्याच्याबरोबर कामाला असत. त्या कॉलेजवीरांना हा महात्माजींचा उपक्रम म्हणजे एक सुट्टीचा गंमतीचा कार्यक्रम वाटत असे. आणि त्या दृष्टीनें अवडक चवडक दामाडू पद्धतीचें उडत दान दिल्यासारखें होई. साक्षरता प्रसार म्हणजे आबाच्या दृष्टीनें पोरखेळ नव्हता. पिढ्यान् पिढ्या अंगवळणीं पडलेल्या कोत्या समजुती दूर करायच्या म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. कॉलेजांत ज्या पद्धतीनें शिक्षण दिलें जातें त्या पद्धतीनें अडाणी लोकांना नुसतीं व्याख्यानें ऐकवून काय उपयोग ? आणि त्यांना जर एकादी गोष्ट सांगून आयत्यावेळीं आठवली नाहीं तर त्यांच्यावर चिडून काय फायदा ? 'दगड आहांत

लेकानो तुम्ही' हें शिफारस पत्र ऐकल्यावर कोणता स्वाभिमानी शेतकरी पुन्हां तुमच्या वाऱ्याला उभा राहील?

हें कार्य करायला कळकळीचीं माणसें पाहिजेत. त्याप्रमाणें आयुष्याच्या आयुष्य वाहायला तयार असणारीं ध्येयप्रवण माणसें पाहिजेत. तरच मुंगीच्या पावलानें कां होईना पण प्रगती निश्चित होईल. नुसती व्याख्यान-बाजी करून कांहींही तादृश्य फायदा होण्यासारखा नव्हता. आबानें चार-पाच ठिकाणीं हा अनुभव घेतला. या चळवळींत शिरणाऱ्या अनेक छोट्या-मोठ्या गटांचे आंखीव कार्यक्रम कागदावर वाचायला मोठे गोड होते. परंतु कार्यक्रम अमलांत कितपत उतरले हें पाह्यला जावें तर निराशाच पदरीं येई. पुन्हां त्यांत ही फंडाचीही भानगड असेच. एकादी गोष्ट हौसेनें आबानें सुचवावी तर त्याला उत्तर मिळे कीं "हा खर्च करायला फंडस् नाहींत — आणि आधीं सॅक्शन मिळाल्याशिवाय कांहीं करतां येणार नाहीं." आबा हिरमुसल्या तोंडानें तेथून दूर जाई.

एके दिवशीं त्याच्या मनानें घेतलें कीं हें कार्य आपण स्वतःच आपल्या जबाबदारीवर शिरावर घेतलें तर? गेल्या दहा वर्षांत त्याच्या बऱ्याच लोकांशीं कारणपरत्वें ओळखी झाल्या होत्या. अशाच एकाद्या ओळखीच्या सधन माणसाला गाठून त्याला आपलें मनोगत समजावून सांगितलें तर? एकाद्या संस्थेमार्फत साक्षरता प्रसाराचें कार्य चालविण्याचें ढोंग पत्करण्या-पेक्षां स्वतःच्या हिंमतीवर मुंगीच्या पावलाइतक्या सावकाशीनें कां होईना परंतु कार्याचा गाडा पुढें ढकलायचा हा त्याचा दृढ निश्चय झाला होता. एक दोन वर्षें एकाद्या संस्थेमार्फत काम करावें व त्या संस्थेच्या झब्बू वर्गाच्या मर्जीतून उतरतांच चंबुगवाळें आटपून पुन्हां पुण्याची वाट धरावी हा प्रकार तिनदां झाला. चवथ्यांदां नशिबाला कौल लावून घेण्याची आबाची इच्छा नव्हती. कारण संस्था आली कीं नियम आले. आणि केवळ नियमांचीं बंधनें पाळीत बसण्यांत आबाला आपण काहीं महत्त्वाची कामगिरी बजावली असें प्रामाणिकपणानें वाटेना. उदाहरणच द्यायचें तर सूत कातण्याच्या नियमावरून आबाच्या संस्था चालकांनीं जी अरेरावी गाजवली ती त्याच्या मतें अक्षम्य होती. शिक्षणांत राजकारण असें विना-कारण घुसडून देणें त्याला मान्य नव्हतें. सूत काढण्याच्या तो विरुद्ध

नव्हता. मुलांनीं सूत काढलें म्हणजे देशांत धरणीकंप होतील अशीही कांहीं पेन्शनर रावबहादुरी कल्पना त्यानें मनांत आणली नव्हती. परंतु इतकें सूत काढलें तरच मुलाला अमकी गोष्ट शिकवावयाची किंवा अमूक सहलीला न्यावयाचें अशा तऱ्हेचा दंडक फाजील [illegible] अंमलांत आणला जावा हें त्याला साफ नामंज़ूर होतें. सूत काढण्याचा नियम म्हणजे तुरुंगांतली चक्की पिसण्याची शिक्षा होती ? मुलाच्या कलानें गमतरमत जर शिक्षण द्यायचें नाहीं, मुलांच्या नैसर्गिक आवडी ध्यानांत घेऊन जर त्याना ज्ञानदान करायचें नाहीं तर तें शिक्षण चिरपरिणामकारक कसें होऊं शकेल ! शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रांत राजकीय हूकूमशाही काय कामाची ? शिक्षणाचें मूलभूत ध्येय हेंच असायला पाहिजे कीं लिहितां वाचतां येऊं लागल्यावर स्वतंत्र बुद्धीनें मुलाला सत् आणि असत् याच्यातील भेद कळूं लागला पाहिजे. श्रेयस कोणतें आणि प्रेयस कोणतें यांतील अंतर त्याला समजलें पाहिजे. परिणामी हितकारक गोष्टी आज त्रासदायक वाटल्या तरी आपण आचरणात आणल्या पाहिजेत आणि परिणामीं नुकसानकारक परंतु आज मौजेच्या वाटणाऱ्या गोष्टींपासून आपण सर्वथैव अलिप्त राहिलें पाहिजे हें ज्ञान मुलाला जें शिक्षण देईल तेंच शिक्षण आपण मुलांना प्रथम दिलें पाहिजे. यांत हिंदी उर्फ हिंदुस्थानी इतकें आलेंच पाहिजे किंवा इतके पेळू पिसलेच पाहिजे अशी सक्ती ठेवून कसें भागेल ? नियमांचा अर्थ कोशाच्या साहाय्यानें लावीत बसण्यापेक्षां व्यवहाराच्या दृष्टीनें लावणें आबाला पसंत पडत असें. आणि त्याच्या या वृत्तीमुळें त्याचें इतरांशीं जमणें अशक्य होऊन बसलें होतें. तरी पण आबा निराश झाला नाहीं. हातीं घेतलेलें कार्य तडीस नेण्याची त्याची उत्कट इच्छा होती. परंतु तें कार्य आतां निराळ्याच मार्गानें करण्याच्या विचारांत तो होता. तो मार्ग शोधून काढण्याच्या खटपटींत तो चूर होता.

वेणूनें आबाचा नाद सोडून दिला होता. आबावर जळफळणें, चिडणें, आरडाओरड करणें इत्यादि निदर्शनें ती पूर्वीच्याच हौसेनें मधून मधून करीत असे परंतु आबा आपल्या मताप्रमाणें कधीकाळीं वागेल ही कल्पना तिनें अजिबात सोडून दिली होती. आबानें जाणूनबुज़ून आपल्या आयुष्याचें वाटोळें केलें हा मंत्र जपण्याचा तिचा नित्याचा आवडीचा खेळ

होऊन बसला होता. कांहीं कांहीं माणसें आपले विफल झालेले प्रयत्न पाहून सुद्धां एक प्रकारचा त्यात आंबट आनंद मानून घेतात ना, त्याप्रमाणें वेणूचें झालें होतें. आबानें आपल्या आयुष्याची वाताहात कशी केली हें ऐकणाऱ्या लोकांना ती मोठ्या खुषींत येऊन रंगवून सांगण्यांत परमावधीचा आनंद मानी. त्याचप्रमाणें आबाचें कुणाशीं न पटून तो परत आला म्हणजे तिला जो असुरी आनंद होई तो अवर्णनीयच होता. पतीच्या यशामधें आनंद आणि अपयशांत दुःख मानण्यांत गौरविलेली ही आर्य स्त्री अगदीं उलट वागत होती. आबाला ठेच बसली कीं वेणूला समाधान होई. आणि तो मोठ्या हुरूपानें नवीन कामगिरीसाठीं घराबाहेर पडे तेव्हां तिला वैतागाचा झटका येई. थोडक्यांत सांगायचें तर पती हा आपला सर्वांत जवळचा सखा वाटण्याऐवजीं सात जन्माचा वैरी असावा असें तिनें ठरवून टाकल्या सारखें दिसत होतें.

आणि भरींतभर म्हणूनच कीं गेल्या दहा वर्षांत वेणूचीं आणखी तीन बाळंतपणें झालीं आणि तिन्हीही खेपेस पहिल्या प्रकारचीच थोड्या फार फरकानें उजळणी गिरवण्यांत आली. एकच मुलगा जास्तींतजास्त म्हणजे सुमारे दोन महिने जगूं शकला. त्यामुळें वेणूच्या औदासिन्यांत आणखीच भर पडली होती. नवोढेच्या औत्सुक्यानें प्रत्येक खेपेस ती होणाऱ्या बाळासाठीं अंगडींटोपडीं, दुपटीं, चौघड्या जमवून ठेवी आणि मूल गेल्यावर त्या साऱ्या बाळलेण्यांना कवटाळून चारचार दिवस धाय मोकलून रडत बसे. आबाला ह्या गोष्टीपासून अतिशय वाईट वाटे. परंतु तो तरी सहानुभूतीचें चार शब्द तिला ऐकवण्यापलीकडे जास्त काय करूं शकला असतां? आणि हे त्याचे सहानुभूतीचे शब्द तापल्या तव्यावर पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें वेणूला तापदायक वाटत. तिनें अजून बोलून दाखवलें नव्हतं परतु तिच्या मनांत तो दुष्ट विचार वारंवार येई. तो म्हणजे हाच कीं आपल्या दुःखाबद्दल आबाला मुळींच दया वाटत नसून उलट त्याला अत्यंत आनंदच वाटत असला पाहिजे. नुसते तोंडा देखलें वाईट वाटल्याचे चार शब्द उच्चारून काय ती फसणार होती?

आबांच्याविषयीं अशा तऱ्हेची विचित्र अढी मनांत बाळगून असल्यामुळें वेणू आबाबरोबर गेल्या दहा वर्षांत एकदांही त्याच्या कार्यक्षेत्राच्या

ठिकाणीं गेली नव्हती. जणूं कांहीं असलें कांहीं आबा खेड्यांत जाऊन करीत असेल याची तिला कल्पना नव्हती अशाच थाटानें ती बोलत असे. आबानेंही तिच्या मनाचा कल पाहून तिला एकदांही आपल्याबरोबर नेण्याची इच्छा प्रगट केली नाहीं. परंतु दोन वर्षांपूर्वी तो प्रश्न नाइलाजानें सर्वांच्यापुढें दत्त म्हणून उभा राहिला. एकेक प्रसंग असे एकामागून एक येत गेले कीं एवढा धीराचा आबा पण तो सुद्धां चकित झाल्यासारखा झाला.

सुरवात वेणूच्या आईनें केली. रानामध्यें बेपत्ता झालेली घरची गाय शोधण्यासाठीं म्हणून वेणूची आई गेली होती. गाय सांपडली. तिला धरण्यासाठीं म्हणून घाईनें दोराचा फांस तिच्या मानेभोंवतीं टाकला अन् गाय बिथरली. वेणूच्या आईला छातींत बराच मार लागला. मालकिणीला शिंगानें भोसकून गाय चौखूर उधळली. शेजारच्या विठाबाईनें हा प्रकार पाहतांक्षणींच आरडाओरडा करून गुराख्याची मुलें जमा केली आणि म्हातारीला बेशुद्धावस्थेंत तिच्या घरीं कशीबशी आणून पोहोंचती केली. मिरजेच्या इस्पितळांत म्हातारीला नेण्यांत आलें आणि तेथेंच तिनें पोरीच्या नांवानें जपमाळ ओढीत प्राण सोडला. वेणू त्यावेळीं बाळंतपणाच्या दवाखान्यांत चवथ्या मृत आपत्याला कवटाळून ढसढसा रडत होती. मुलाच्या मरणाचें दुःख विसरण्यास सुद्धां दैवानें वेणूला उसंत मिळूं दिली नाहीं. आईचें शोकजनक वृत्त समजतांच वेणू बेशुद्ध पडली.

पंधरावीस दिवसांनीं आबाच्या आईनें आंथरूण धरलें. थंडीपडशाचा ताप असेल या नेहमीच्या चालढकली न्यायानें म्हातारीनें घरांत कुणालाच कळूं दिलें नाही.. ताप अंगावर काढण्याची तिनें शिकस्त केली. परंतु जेव्हां छातींतून भाले खुपसल्याप्रमाणें दुखूं लागलें तेव्हां तिचा निरुपाय झाला. अण्णांनीं पत्नीची ही अवस्था पाहून आबाला बोलवून घेतलें. डाक्टरांच्या परीक्षेनें निदान ठरलें. आबाच्या आईला डबल न्युमोनिया झाला होता. आईला वाचवण्यासाठीं आबानें आपली सर्व पुण्याई पणास लावली. परंतु यांतहीं त्याला यश आलें नाहीं. आबाची आई पुन्हां अंथरुणावरून उठली नाहीं. मरतांना तिनें डोळेसुद्धां उघडून पाहिलें नाहीं. आबाच्या वडिलांना पत्नीच्या मृत्यूनें वैराग्याचा झटका आला. सबंध

जन्म म्हाताऱ्यानें पत्नीच्या समाधानावर कसाबसा काढला होता. पत्नीच्या गोड शब्दावरच काय तो बिचारा जगून होता. पत्नी गेल्यामुळें त्याला आपल्या डोक्यावरचें छत्र उडाल्यासारखें झालें. सुमारें एक महिनाभर एकलकोंडेपणानें घरांतल्या घरांत अण्णा कसेबसे वावरत होते. परंतु एक महिना झाला नाहीं तोंच त्यांनीं आबाला आपला निश्चय जाहीर केला. राहिलेलीं चारदोन वर्षे तीर्थयात्रा करीत घालवावयाचा वडिलांचा बेत ऐकून आबा पराकाष्टेचा कष्टी झाला. आईचा आधार तुटल्याचें दुःख विसरलें नाहीं तोंच वडिलांनींही हा असा तडाखा लगवावा हें पाहून त्याला एक दोन दिवस सुचेनासें झालें. परंतु वडिलांची विमनस्क अवस्था तो उघड्या डोळ्यानें पाहूं शकला नसता. वडील निघून गेले तें कोठें गेले हें सुद्धां विचारण्याचें त्याला भान राहिलें नाहीं.

वेणूचा आजार कमी चिंतनीय नव्हता. बाळंतपणात कांहींतरी घोटाळा झाला असावा. डॉक्टरणीच्या हातून आळसानें म्हणा किंवा दाईच्या हातून निष्काळजीपणानें म्हणा वेणूचें बाळंतपण नीटसें पार पडलें नव्हतें. बाळंतपणाच्या इस्पितळांत पंधरा दिवस ती आजारीच होती. कमरे-खालचा भाग गळून गेल्यासारखें तिला वाटत होतें. मधूनमधून ताप येतच होता. हातापायाच्या काड्या उरल्या होत्या. मनगटांत भरलेल्या वांगड्या थेट कोपरापर्यंत सरकत होत्या. नाहीं म्हणायला डोळे मात्र पहिल्यासारखे पाणीदार होते. याशिवाय वेणूमध्यें पूर्वीची कोणतीच आठवण शिल्लक राहिली नव्हती.

ताप हटण्याची चिन्हें दिसेनात. आबा रात्रंदिवस तिच्या डोक्याशीं बसून होता. डॉक्टरांनीं सांगितलेलें पथ्यपाणी तो अत्यंत कसोशीनें पार पाडीत होता. आणि एके दिवशीं रात्रीं ताप बेसुमार चढला. कोलन-वॉटरची बाटली खलास झाली तेव्हां आबानें मिठाच्या पाण्याच्या घड्या तिच्या डोक्यावर ठेवल्या तरी वेणूची अस्वस्थता कमी होईना. जिवाची सारखी तगमग होऊं लागली. आणि रात्रीं दोनच्या सुमारास वेणूला वाताचा झटका आला. काय वाटेल तें बोलून घेतल्यावर वेणू अंगावरचे कपडे भिरकावून देऊं लागली. खोलींभर धांवणाऱ्या वेणूला आवरतां आवरतां आबाला पुरेवाट झाली.

वेणू यमाच्या हातून मोठ्या शर्थीनें वांचली. आबानें तिला काळाच्या जबडयातून बळेंबळें ओढून काढलें. परंतु एक गोष्ट अतिशय वाईट झाली. वेणूच्या दोन्ही पायावरून वारें गेल्यामुळें ते अधू झाले. दोन महिन्याच्या दीर्घ मुदतीनंतर वेणू उठून उभी राहण्याचा प्रथम प्रयत्न करूं लागली तेव्हां तिच्या लक्षांत आलें कीं आपल्याला पूर्वीसारखे उभे राहतां येत नाहीं. या अभूतपूर्व घटनेवर तिचा प्रथम विश्वास बसेना. आपल्याला धड उभे राहतां येत नाहीं हें तिच्या मनाला पटेचना. सर्व बळ एकवटून तिनें उभे राहण्याचा प्रयत्न केला. आणि तिच्या पायांनीं तिला दगा दिला. वेणू धाडकन् जमिनीवर कोसळली.

आबानें वेणूला जगवलें खरें परंतु वेणूला आतां जगावेसें मुळींच वाटत नव्हतं. उलट पतीनें आपल्याला वाचवलें तें आपला आणखी सूड उगवण्यासाठींच वाचवलें अशी तिच्या मनाची समजूत होऊन बसली. परंतु यांतूनही बरी होईन आणि आबाचा नक्षा उतरवीन हा तिचा निर्धार कायम होता.

## —४—

वेणू अंथरुणांत उठून बसूं लागली. बसल्या बसल्या ती घरसंसार पूर्वीच्याच अरेरावी पद्धतीनें चालवूं लागली. सैपाकपाणी वेणूच्या हातून होणें अशक्य आहे हें पाहून आबानें आपली लांबची एक विधवा मावस चुलत बहीण मोठ्या मिनतवारीनें बोलावून घेतली. आणि थोड्याच दिवसांत स्वतंत्रपणें कुठल्यातरी खेड्यांत जाऊन आपलें अर्धवट राहिलेलें कार्य सुरूं करायचें हा विचार त्यानें वेणूला हलकेंच ऐकवला. वेणूनें आबाचें म्हणणें साद्यंत सांगून होईपर्यंत एक चकार शब्द काढला नाहीं.

"तूं काहींच बोलत नाहींस?" आबानें तिला सर्व सांगून झाल्यावर म्हटलें.

"बारा वर्षं मी बोललें त्याचा काय उपयोग झाला आहे? काय थोडी बोललें असेन? तुम्ही सगळे मास्तर लोक शाळेच्या नांवानं संबंध जन्मांत जेवढं तोंड वाजवीत नसाल तितकं मी एकटी बारा वर्षांत बोललें. पण तुमचा गुण तुम्ही सोडला आहेत कां? सगळ्यांना निर्दाळून बसलांत—" नेहमीच्या चिडखोरपणानें ती म्हणाली.

"तो मुद्दा राहूं दे. पण आतां असं पहा. लढाई सुरूं होऊन दोन वर्षं झालीं आहेत. दिवसेंदिवस शहरांत राहणं अतिशय खर्चाचं होऊन बसलं

आहे. तुझ्या आजारापायीं अतोनात खर्च आधींच मी केलेला आहे. यापुढें दूधदुभतें वगैरे गोष्टी शहरांत जमायच्या नाहींत. तेव्हां मी म्हणतों तसं आपण करूं या. हें बिऱ्हाड मोडून टाकूं अन् वळूज्याला मी जाणार आहे. तिकडं सगळींजणं जाऊं. परिस्थिति कठीण आहे. ती साऱ्या जगाला कठीण आहे. आपण एकटेच कांहीं धारेवर धरले गेलों नाहींत. तेव्हां अशा या बिकट परिस्थितींत एकमेकाला धीर देत सर्वांनीं एके ठिकाणीं असलेलं बरं, म्हणून मी म्हणतों." आबा म्हणाला. वेणूचा खालचा ओठ थरथरूं लागला. आबाला झणझणींत उत्तर द्यायची तिची ही पूर्वतयारी होती. थरथरणाऱ्या ओठाला दातानें टवका काढीत ती तिरस्कारानें म्हणाली--

"अशी मला पेंचांत धरतां काय? माहेरीं आई नाहीं अन् सासरीं तुमच्याशिवाय मला आतां सत ना गत अशा चिमट्यांत पकडून शेवटीं तुम्ही मला माझ्या मनाविरुद्ध खेडेगांवांत नेऊन जाळणार आहांत! तुमच्या मनासारखं पान पडलं आहे. तुमचा आनंद गगनांत मावत नसेल. वेठीला धरलेल्या बैलाप्रमाणें खालीं मान घालून तुम्ही मला वाट फुटेल तिकडे नेणार आहांत. दरवेशाच्या अस्वलाप्रमाणें नाकांत लोखंडी नळी अडकावून दारोदार माझा खेळ कां तुम्ही करीत नाहीं? स्वतःच्या अकलेनं नाहीं तरी निदान बायकोच्या चार उड्यामुळं तरी तुम्हाला चार दिडक्या मिळवतां येतील. तुमचा डाव मी चांगला ओळखून आहे. तुम्ही तोंडानं बोलत नाहीं. पण तुमच्या पोटांतलं पाप मी ओळखून आहे, समजलांत--"

"समजलों! हें असलं तुझं मुलखावेगळं बोलणं मला बारा वर्षांच्या अनुभवानं पाठ झालं आहे. पण मला सांग कीं आहे ह्या स्थितींत मी म्हणतों त्या व्यतिरिक्त अन्य मार्ग आपल्याला मोकळा आहे का? नसत्या गोष्टी उकरून काढण्यांत काय हशील आहे? त्या पेक्षां—"

"तर—तर—! नसत्या गोष्टी काय? शेळीचा गळा कापतांना तिनं शोकसुद्धां करूं नये! तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले तर तुम्ही धर्माचे अवतार तिला बजावणार कीं, बाई! वाईट वाटून घेऊं नकोस. या मर्त्य जगाच्या तडाक्यांतून आम्ही तुला मुक्त करतों आहोंत. तुझ्यावर उपकारच आहेत आमचे. पाया पड आमच्या आधीं."

" पहा. पुन्हां तूं मुद्दा सोडलास. कुठली शेळी अन् कुठला धर्माचा अवतार ! " उद्विग्नतेनें मान हालवून आबा म्हणाला. वेणूनें उसळून म्हटलें,

" मला तुम्ही शेळी समजतां आहां काय ? भूल आहे तुमची. तुमच्या बोलण्यानं अशी फसायला मी कांहीं बोळयानं दूध पीत नाहीं. तुम्हाला बरी सापडली आहे धर्माची बायको. घ्या वाटेल तशी वाकवून. देशाला शिक्षण द्यायला निघाले आहेत. जगाला सुधारण्याच्या ऐवजीं आधीं आपलं स्वतःच घर सुधारा म्हणावं."

" म्हणजे काय करूं ? सांग न. तुझा सल्ला ऐकण्याजोगा असला तर मी ऐकायला तयार आहे." तिच्या बोलण्याची गंमत वाटून आबा मध्येंच म्हणाला.

" तुम्ही ऐकणार ? अन् माझं ? बायकोचं ऐकलं तर तो हिटलर कां फिटलर तुमचं नरडं धरायला धावून येईल कीं. अहाऽऽऽहा ! काय पण साळसूदपणाचीं शहाजोग बोलणीं ! मी फसणार नाहीं. गेलीं बारा वर्षं तुम्ही मला छळून घेतलं आहेत पण आतां मी तुमच्या म्हणण्याप्रमाणं जीव गेला तरी वागणार नाहीं. तुम्ही माझ्या जिवावर उठलेले आहांत हें मी ओळखून आहे. मी आजारीपणांत मेलें असतें तर तुम्ही एक हजार एकशे आठ सत्यनारायण बांधले असते––" वेणू चिडून बोलत होती.

" बापरे ! एक हजार एकशे आठ वेळेला कडोसरीला काय सुपारी अडकावून घेतली असती ? छट् कांहीं तरींच ?" आबा हसत म्हणाला.

" तुम्ही हंसणारच. तुमच्या मनांतली आवडती गोष्ट मी बोललें तेव्हां तुम्हाला आनंद झालाच पाहिजे. पण लक्षांत ठेवा, मी तशी मरणार नाहीं. मी हाडाची चिवट आहे. माझा तुम्ही छळ मांडलेला आहेत त्याचा बदला घेतल्याशिवाय मरायची नाहीं. बायका म्हणजे केर पुसण्याचें फाटकें पोतें ही आजोबाच्या वेळची कल्पना आतां विसरा बरं कां ! मलाही चार गोष्टी आतां नीट समजूं लागल्या आहेत. त्या समोरच्या शारदाबाई पहा ! नवऱ्याची तिसरी बायको आहे. पण नवरा पहा कसा मुठींत ठेवला आहे. इतकंच पाणी प्या. बरं आहे, राणीसाहेब ! इतकाच भात खा, आज्ञा प्रमाण सरकार–!" शेवटचीं काल्पनिक वाक्यें बोलत असतां वेणूच्या चेहेऱ्यावर उमटलेले विकार पाहून आबाला मोठी गंमत वाटली. इतकी

भोळी मुलगी पण नादिष्टपणापायीं वाया गेलेली पाहून आबाला खरोखरीच वाईट वाटत होतें. कोणतीही सरळ गोष्ट आपण सांगितली म्हणूनच पटवून घ्यायची नाहीं या विचित्र वागणुकीपुढें करणार तरी काय ?

" अग, शारदाबाई नवऱ्याला मुठींत ठेवीत असतील तर तूं मला चिमटींत ठेव. माझी तयारी आहे. तुझ्याच म्हणण्याप्रमाणें बायकांना केर पुसण्याचें फाटकें पोतें मी इतके दिवस समजत आलों असं घटकाभर धरून चालूं. पण आपल्या वागण्यानं ती माझी कल्पना तूं खोडून काढ कीं—" आबा म्हणाला.

" मग मी सांगतें कीं जगाच्या उठाठेवी आधी बंद करा पाहूं. इथं कुठंतरी सरकारी नोकऱ्या हल्लीं पैशाला पायलीभर मिळूं लागल्या आहेत म्हणून परवांच कोणीतरी मला म्हणत होतं. सुखासमाधानानं चार पैसे मिळवा अन् सुखानं चार घास गिळून मला मरूंद्या. " वेणू आपल्या बोलण्याचा आबाच्या मनांवर काय परिणाम झाला असेल हें अजमावण्याच्या हेतूनें बारीक नजरेनें त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली.

" तें शक्य नाहीं. थांब, उगीच माथं फिरल्यासारखं करूं नकोस. तुला कितीदां सांगितलं आहे कीं ही गोष्ट सोडून तूं वाटेल तें बोल. ज्या कार्यासाटीं माझा जन्म झाला आहे असं मला प्रामाणिकपणानं वाटतं आहे तें तूं मला सोडायला सांगते आहेस. तें सोडल्यावर मग माझ्या जगण्याचा उपयोग तरी काय ? " गंभीरपणानें आबा म्हणाला.

" झालं तर ! मी तुम्हाला पूर्वेला चला म्हणून म्हणतें अन् तुम्ही तोंड फिरवून पश्चिमेकडे धांवत सुटलांत तर माझ्या बोलण्याचा अर्थच कुठें राहिला ? तें कांहीं नाहीं मी म्हणतें तेंच खरं आहे. तुम्हाला माझी ब्याद नकोशी झाली आहे. माझ्या मनाविरुद्ध वागून मला सतावून सोडायचं हेंच तुमचं कार्य आहे. चिडून जाऊन शेवटीं मी गळ्याला फास लावून आत्महत्या करावी हेंच तुमचं ध्येय आहे. पण सांगून ठेवतें. तुम्ही फसाल बरं. तुम्हाला वाटत असेल तितकी भोळी मी नाहीं."

" पण हें बघ, माझ्या प्रश्नाचं एक सरळ उत्तर दे. माझ्या बरोबरीनं खेड्यांत राहून माझ्या कार्याला मदत करावी असं तुला कां वाटूं नये ?"

" माझे पाय मोडून टाकलेच आहेत तुम्ही. आतां खेड्यांत नेऊन

शेवटीं माझा निकाल लावा म्हणजे सुटलांत. माझे वडील सोमवारी किंवा मंगळवारीं इथं येणार आहेत. तुमच्या सगळ्या कारवाया मी त्याना पत्रानं कळवल्या आहेत. तुम्हाला काय ? मी मेलें तर दुसरी कराल. नवरा नाहींतरी वाटच पाहात असतो. चार मुलं झालेली बायको वागवण्यापेक्षां नवीन एकादी नगरभवानी जवळ करण्यासाठीं नवरे टपलेलेच असतात. पण बापाला बिचाऱ्याला माया तोडवत नाहीं. ते आल्यावर मी त्यांच्या मार्फत इथल्या एकदोन डॉक्टरांना माझी प्रकृति दाखवणार आहे. शारदाबाईनीं मला मदत करण्याचं आश्वा-सन दिलं आहे. इथं जमलंच तर बरं, नाहींतर मुंबईच्या डॉक्टरांना प्रकृति दाखवावी लागेल असं शारदाबाई म्हणत होत्या---माझा जीव कांही वर आलेला नाहीं. तुमच्या नादानं आजवर खूप नाचलें तेवढं पुरें झालं !"

वेणूचे वडील आले. पुण्यांतील चारदोन डॉक्टरानी वेणूची प्रकृति पाहिली. प्रत्येकानें प्रथम खूप आशा दाखवली. कोणत्याहि डॉक्टरचें तें एकच एक काम असतें. आशा दाखवून रोग्याला झुलत ठेवायचा आणि स्वतःच्या खिशांत भरपाई करीत बसायचं हा डॉक्टरांचा धंदाच आहे. रोगी बरा झाला तर डॉक्टराच्या औषधानें आणि निकाली निघाला तर त्याच्या दुर्दैवानें हें पिढ्यान् पिढ्या अंगांत भिनलेलें सनातन तत्त्व डॉक्ट-रांच्या पाठीशीं उभें आहे. तोंडावर डॉक्टर या व्यक्तीला कोणीही फैलावर घेऊं शकत नाहीं. वेणूच्या दुर्दैवानें एकाही डॉक्टरला यश मिळालें नाहीं. वेणूचे वडील आणि आबा दोघेही घटकाभर एकमेकाच्या मनांत जागा असलेला विरोध बाजूस सारून वेणूच्यासाठीं डॉक्टरांच्या घरीं धांवपळ करीत होते. घरांत होते नव्हते तेवढे सर्व सोन्याचे डाग आबानें मोडून टाकले आणि डॉक्टरांचीं घरें भरलीं. वेणूच्या वडिलांनीही आपली पुंजी उदार मनानें वेणूच्यासाठीं उधळून टाकली. परंतु वेणूचे पाय अधू झाले होते, ते मुळींच सुधारले नाहींत. पुण्यांतील डॉक्टर अपुरे पडत आहेत असें दिसून येतांच मुंबईचे डॉक्टरही मदतीस घेण्यांत आले. तेवढ्यासाठीं वेणूला मुंबईस नेण्यांत आली. मुंबईत राहण्याची वेणूची हौस अशा रीतीनें फिटायची होती. दिवस मोठ्या झपाट्यानें जात होते, पैसेही त्याच वेगानें हातावेगळे होत होते परंतु वेणूचे दुखणें हट्टीपणानें जाग्यावरच अडून होतें.

दीडएक वर्ष अशारीतीनें धांवपळ करूनसुद्धां कांहींच तादृश्य फायदा झाला नाहीं हें पाहून वेणूचे वडील एके दिवशीं म्हणाले--“ वेणू, तूं आतां तरी माझं म्हाताऱ्याचं ऐकणार आहेस कां ? झाला एवढा प्रकार पुरें झाला. सगळ्या डॉक्टरांची औषधं झालीं, वैद्याचीं तेलं झालीं अन् भस्मं झालीं. आम्हाला जेवढं शक्य होतं तेवढं जावईबापूंनी आणि मी करून पाहिलं आहे. जावईबापूंच्याविषयीं तुझा कांहींतरी गैरसमज झाला असावा असं मला अलीकडे वाटूं लागलं आहे. दीड वर्षभर मी बारकाईनें पाहतों आहे पण तूं म्हणतेस त्याप्रमाणं त्यांचं वागणं दुष्टपणाचं दिसत नाहीं.”

“ अहो ते त्यांचे दाखवायचे दात आहेत. तुम्हाला त्यांचे चावायचे दात कसे दिसतील ? ध्या म्हणावं, अखेरीस तुमच्या मनासारखंच झालं. मी मरणार हें निश्चित झालं. आतां मी काही बरी होणार नाहीं. त्यांना तेंच पाहिजे आहे. मी त्यांची बायको आहे. मी त्यांना पुरी ओळखून आहे.” वेणू तळमळून बोलत होती.

“ आतां आम्हां वयस्थांना जें दिसत आहे तें मी बोलणार. तूं काय वाटेल तें म्हणालीस तरी तुझं तोंड तुझ्या स्वाधीनचं. पण सगळ्या डॉक्टरांचं म्हणणं जें पडलं तें तर तुला ऐकायला पाहिजे कां नको ? प्रत्येकाचं म्हणणं हेंच पडलं कीं अंगांत शक्ती आल्याशिवाय अन् अंगांत भरपूर ताजं रक्त खेळल्याशिवाय पायाच्या शिरांत जोम वाटणार नाहीं. स्वच्छ हवा पाहिजे. मोकळी हवा पाहिजे. खायला पौष्टिक अन् वेळच्या वेळीं गेलं पाहिजे. ह्या सगळ्या गोष्टी आतां शहरांत मिळणं शक्य आहे कां ? तूंच विचार कर. लढाईचे दिवस. महागाई कोण चालली आहे ? उद्यां लहान्या पोरांना दूध मिळण्याची पंचाईत. माणसांनी माणसं फाडून खावीं असला विचित्र योग आला आहे. तेव्हां मी म्हणतों तूं आपला हेका सोड आणि जावईबापूंच्याबरोबर ते कुठें वळुंजाला जाणार म्हणत होते तिकडेच जा. ”

रक्त निघेपर्यंत वेणूनें खालचा ओठ दातानें दाबून धरला. पराजय होता ! शेवटीं इतक्या धावपळीनंतर शरणागति होती ती. आबाला शरण गेल्यावाचून आतां दुसरा मार्ग उरला नव्हता. जी गोष्ट आपण प्राण गेला तरी मान्य करणार नाहीं असें तिनें आबाला आजवर निक्षून सांगितलें होतें

ती गोष्ट आज ती आबाला कोणत्या तोंडानें मान्य आहे म्हणून सांगणार ? शेवटचा आधार म्हणून तिनें वडिलांवर विश्वास टाकला होता. त्यांनींही कळकळीनें हेंच सांगितलें. शेवटीं खेड्यांत जन्म आणि खेड्यांत मृत्यु हेंच का आपल्या नशिबांत लिहून ठेवलें होतें ? इतक्या करारीपणानें आपण वागलों त्याची हीच का परिणती ?

विचारासरशीं तिनें समोरच्या तडकलेल्या आरशांत पाहिलं. कपाळावरची कुंकवाची टिकली आरशांत पाहतांक्षणींच आपली असाह्यता तिला अत्यंत तीव्रतेनें जाणवूं लागली. या कुंकवानें आपल्याला दगा दिला. स्त्रीच्या जन्माला येऊन कुणाच्या तरी नांवानें हा लाल टिळा आपण लावून घेतला हाच काय तो आपला अपराध. आणि या अपराधाबद्दल आपण यत्किंचित् जबाबदार नसतांना देखील आपल्या आयुष्याची कोण ही परवड ! आपल्या मनाप्रमाणें एकही गोष्ट आपल्याला करतां येऊं नये ? शेवटचा आधार म्हणून ज्याच्यावर आपण सारा विश्वास ठेवला त्या आपल्या पित्यालादेखील आपलें म्हणणें खोटें वाटावें अन् एका त्रयस्थ माणसाचें म्हणणें खरें वाटावें ? आपण एक यकश्चित स्त्री आहोंत ही बोचणी वेणूला असह्य होती. जर पुरुषाचा जन्म आपल्याला लाभला असता तर जगांतलीं कोणती शक्ति आपल्या मनोरथांना खेचूं शकली असती ? आपण आपल्या मर्जीनुरूप काय वाटेल तें केलं असतं तरी आपल्याला आडवें जाण्याची प्रत्यक्ष आपल्या वडिलांचीसुद्धां प्राज्ञा नव्हती. आणि हें आज काय होऊन बसलें आहे ? बारा वर्षं आपण नशिबाशीं उभा दावा खेळलों होतों. कुणालाही शक्य झालं नसतं इतकं काहूर आपण उठवलं होतं, त्राग्यानें कित्येक वेळां आपण उपाशींतापाशीं झोपीं गेलों होतों. त्या सगळ्या धडपडीचें हेंच का फळ ? जगांत न्याय नाहींच कां ? अन् असलाच तर तो स्त्रीला मिळूंच शकणार नाहीं कां ?

आतां आपल्याला तोंड दाबून धरावें लागेल. आबानें मनांत आणलें तर तो आपल्यावर सूड उगवूं शकेल. त्याला आपण आजवर एक क्षणाचेंही सुख मिळूं दिलें नाहीं ही जाणीव तिला होती. आणि म्हणूनच तिला आतां शरण जाण्याची कल्पना सुसह्य नव्हती. परंतु या साऱ्या विचारांतून वेणू एकच गोष्ट जमेस धरीत नव्हती. आबा आपला यापुढें अतोनात छळ करील या

तिच्या वेड्या कल्पनेला खरोखरी मुळींच आधार नव्हता. तिचेंच मन तिला खात होतें. जगाकडे पाहण्याची दृष्टि सामान्य माणसांची तरी निदान आत्मानुभूतीपरच असते. अमुक प्रसंगांत आपण काय केलें असतें या दृष्टीनें आपण जगातील व्यक्तीविषयीं ठोकताळे बांधीत असतों. वेणूची भीति तसं पाहिलं तर निराधार होती. पण तें तिला पटणें शक्य नव्हतें.

वेणूनें माघार घेतली. याचा अर्थ ती गोडीगुलाबीनें आबाशीं वागूं लागली असा मुळींच नव्हे. कथाकादंबऱ्यांतून माणसांचें स्वभाव अचानक पालटल्याचीं दृश्यें पहायला सांपडतात. परंतु सत्यसृष्टींत दिसून येईल कीं, माणसाचा स्वभाव हा त्याच्या जन्माचा सोबती असतो. वेळप्रसंगीं तो आपल्या जन्मजात स्वभावाला थोडीशी मुरड घालायला नाइलाजास्तव तयार होईल. परंतु केव्हांना केव्हां तरी मूळचें पाणी वर उसळी मारल्याशिवाय राहाणार नाहीं. वेणूनें आबाच्या म्हणण्याला अनुमति दिली ती पुढील शब्दांतच—“ तुम्हांला मोठा आनंद झाला असेल कीं शेवटी तुम्ही माझी जिरवलीतच. पण तुमचा तो भ्रम आहे. अजून मी बरी होईन. आणि बरी झाल्यावर पुन्हां तुमचा तमाशा पाहीन तरच नांवाची वेणू. न्या, वाटेल त्या नरकांत मला न्या. तुमचीं बाईल झालें आहे खरी. हा जन्म तरी निदान तुमच्या मूर्खपणानें वाया गेलाच आहे. मरण्यासाठीं मी देवाच्या दारांत धरणं धरून बसणार आहे. खेड्यांत चला नाहीं तर एखाद्या मसणवटींत चला. सध्यां तरी निदान तुम्ही जिंकलं आहे. ”

वेणूच्या या बाष्कळ बडबडीकडे आबानें पूर्ण दुर्लक्ष केलें. आपल्या आयुष्यात आपल्याला पत्नीपासून दोन गोड शब्द मिळण्याची त्याची अपेक्षा केव्हांच वठून गेली होती. आतां त्याला फक्त वेणूचा विरोध नको होता. तिच्या सहकार्याची त्याला कधींच अपेक्षा नव्हती. यापुढें शक्य तितकें गोडीनें घेण्याचा त्यानें निश्चय करून टाकला. वेणूचा विरोध अशा चमत्कारिक प्रसंगानें नाहींसा होतांच त्यानें सुटकेचा एक दीर्घ श्वास सोडला, आणि वळुंजें गांवीं जाण्याची तयारी करण्यास सुरवात केली. शहरांतलें बिऱ्हाड आतां मोडणेंच भाग होतें. कुणाचीं देणीं वगैरे काय होतीं नव्हतीं तेवढीं त्यानें सासऱ्याच्या मदतीनें फेडून टाकलीं. बरोबर नेण्याची आवश्यकता

नसलेलें सामान विकून टाकलें, व एके दिवशीं सकाळीं त्यानें वाड्यांतील मंडळींचा अखेरचा निरोप घेतला.

मोटारींत बसल्यावर वेणूच्या वडिलांनीं हलकेच वेणूच्या कानांत सांगितलें, "आतां तरी त्यांच्या मर्जीनं वाग, माझा आतां भरंवसा नाहीं. त्याच्याशिवाय तुला जवळचं असं कोणी राहिलं नाहीं. झाला एवढा पोरखेळ आतां पुरे झाला. नीट डोळे उघडून पाहशील तर तुलाही त्यांचा चांगला स्वभाव कळून येईल—"

वेणूनें मनांत खूणगांठ बांधली कीं जन्मदातासुद्धां आपल्यावर उलटला आहे! मोटार हालली तरी तिनें वडिलांना साधा नमस्कारसुद्धां केला नाहीं— !

## —५—

तिन्ही बाजूस डोंगरांचें नैसर्गिक कुंपण असलेलें खेडें आबानें आपल्या कार्यासाठीं पसंत केलें होतें. वळुंजें गांव सुमारें शंभर उंबरठयाचा गांव असेल. सातारा जिल्ह्याच्या हद्दींत हें गाव असल्याचा सुगावा सरकारी कागदपत्रांतूनच एकाद्याला लागला असता इतक्या आडवळणांत हें गांव वसलें होतें. खुद्द साताऱ्याची तरी काय हीच रड आहे. जिल्ह्याचें ठिकाण म्हणून मिरवणाऱ्या शहराला रेल्वेचा रस्ता पकडायला आधीं बारा मैलाची वाट तुडवावी लागत आहे वळुंजाची तर याही पलीकडे उडी होती. मद्रास सदर्न मराठा नांवाचा लोहमार्ग आपल्या गांवापासून पस्तीस मैलाच्या अंतरावर पसरलेला आहे हें त्या गांवच्या कित्येक लोकांच्या गांवीहीं नसेल. मोटारीची सडक सुद्धां सात मैलावरून जात होती. जगाशीं पूर्णपणें फटकून असणारें हें गांव आबानें पसंत करण्यांत तशींच कारणें होतीं.

शहरच्या आसपास असणारीं गांवें शहरच्या दळणवळणानें थोडीफार सुधारलेली असतात. निदान त्यांच्यांत अशिक्षितपणाचें प्रमाण तारतम्यानें कमी असतें. कामधंद्यानिमित्त कर्तीसवरती माणसें मधूनमधून शहरांत जात येत असतात आणि त्यांच्यामुळें खेडयातील इतर जनता बाहेरच्या जगाशीं अगदींच तुटल्यासारखी राहात नाहीं. परंतु रोग घालविण्यास सज्ज झालेल्या

वैद्यानें वरवर औषधयोजना करण्यापेक्षां त्या रोगाची पाळेंमुळें हुडकून काढून तीं नाहींशी केली पाहिजेत ह्या विचारानें आबानें या दूरच्या गांवाकडे प्रथम लक्ष दिलें. गेल्या दहावर्षांत तो एक दोनदां या बाजूस फिरकला होता. त्यावेळीं त्यानें आपल्या सहकाऱ्यांना या गावाची आठवण करून दिली होती. परंतु आकड्यांच्या घालमेलीवर पूर्ण विश्वास असलेल्या त्याच्या सहकाऱ्यांनीं त्याची ही सूचना अव्यवहार्य म्हणून फेटाळून लावली होती. जिल्हा कॉंग्रेस कमेटीला इतक्या दिवसांत इतकीं डोकीं साक्षर केलीं हा रिपोर्ट सादर करण्याची त्यांना जास्त घाई होती. मोठाल्या जुन्या देवळांतून सालोसाल भिंतीवर शिपाई प्याद्यांचीं चित्रें ज्या हिशेबानें काढवून घेण्यांत येतात त्या हिशेबानें खेडुतांना झटपट साक्षर करण्याकडे त्या मंडळींचा ओढा होता. देवळांतील चित्रें शंभर डोईस बारा आणे असल्या माफक दरांत चितारायचीं असतात. तेव्हां चितारीही त्याच वेगानें आणि आस्थेनें आपली कामगिरी उरकीत असतो. अमका रंग नाहीं, किंवा अमूक ब्रश नाहीं असल्या फुसक्या कारणासाठीं तो बहाद्दर आडून बसत नाहीं. काळा रंग नसला तर कोळशावर तो भागवून नेतो, किंवा ब्रश नसेल तर अंबाडीच्या दसड्यांवर राजी असतो. ह्या कामचलाऊ पद्धतीप्रमाणें आबाच्या सहकाऱ्यांना थोड्या खर्चांत जास्तींत जास्त खेडूत साक्षर केलें अशी टिमकी वाजवून घ्यायची होती. आबाला हें पसंत नव्हतें. रंगसफेती करून वेळ मारून नेण्याकडे त्याचा कल नव्हता. भाडोत्री कामगिरीवर त्याची श्रद्धा नव्हती.

हें एक कारण झालें. दुसरें एक कारण होतें. वळुंजें गांवांत राहणें परक्या इसमाला प्रथम गैरसोयीचें वाटलें असतें. शहरापासून तें गांव फार दूर फेकल्यासारखें होतें. पुण्यामुंबईचीं वर्तमानपत्रें गावांत असलेल्या एकुलत्या एक मारवाड्याच्या दुकानीं पुड्यासाठीं रद्दीच्या स्वरूपांत आणलेली पाह्यला मिळत असतील. सर्व कांहीं कबूल. वेळप्रसंगीं डॉक्टरांची मदत लागली तर पंचवीस मैलावर सातारा शहर होतें त्या ठिकाणीं धावल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. मोटारच्या सडकेपर्यंत सात मैलच रस्ता तुडवावा लागत होता परंतु त्या सात मैलाच्या वाटचालींत चार ओढे ओलांडावे लागत होतें. ओढ्यांना पुलाची सोय नसल्यामुळें एकादे वेळीं पूर आला तर तो ओसरेपर्यंत मधेंच

कुठें तरी अडकून पडावें लागे. उन्हाळ्याच्या दिवसांत तेंच ओढे निर्जल झालें कीं पाण्याविना तडफडत वाळवंट तुडवीत जावें लागे. इतक्या दीर्घ खटाटोपानंतर डॉक्टरचें मन वळवून एकाद्यानें डॉक्टरला बगलेंत मारून आणलेच तर त्या वेळेपर्यंत बहुतेक रोगी ओढ्यावर नेऊन जाळलेलाही असायचा. कापडचोपड इत्यादि गरजेच्या वस्तु माणकूशेटनें गांवाला वाटेल त्या भावानें पुरवण्याचा मक्ता पत्करला होता, इतक्या अडचणी होत्या, कबूल. परंतु या गैरसोयी दृष्टिआड करून आबानें हें ठिकाण पसंत केलें याचें कारण खुद्द त्या गावाभोंवताली असलेली रम्य वनश्री. तिन्ही बाजूस डोंगर खडे असल्यामुळे वळुंजें गांव वाटीच्या तळाशीं बसल्यासारखें वाटत होतें. किंवा याही पेक्षां आबाची चांगली कल्पना म्हणजे सभोंवतालीं उंच उंच लोखंडी गजांचा पिंजरा आणि आंत एका कोपऱ्यात एका सिंहाचें पिलू बेदरकारपणानें डारा-डूर झोपीं गेलें असावें अशी त्या गांवची रचना होती. उन्हाळ्याच्या दिवसांत सूर्यानें बारा डोळे उघडून पृथ्वीवर आग पाखडायला सुरवात केली कीं भोंवतालचा डोंगर पळसांच्या' पानांनीं आणि करंवदांच्या हिरव्या मखमालींनीं मोठ्या डौलात डोलूं लागे. चैत्री ऊन कितीही कडक पडलें तरी उंचउंच वडाच्या पिंगटसर मऊमऊ पानांना कोण खेळावेसें वाटें. दुपारीं दोन तें चार पर्यंतचा वेळ उलघालीचा जाई परंतु त्यानंतर डोंगर पाखाडी-वरून शीळ घालीत येणारा वारा दिवसाचा सारा शीण विसरायला लावण्यास समर्थ होता. लांबवर उन्हें तळपत असलेलीं दिसत असतांना डोंगराच्या आडोशामुळें वळुंजें गांव सावलींत अंग चोरून विसाव्याला बसलेलें आढळून येई. आंब्यांच्या झाडांना मोहोर येऊन त्यांवर डोंगरांतील अनेक पक्षी विहार करायला येऊन घटकाभर टेकत त्यावेंळीं क्षणमात्र देहभान हरपल्यासारखें आबाला होऊन जाई. निसर्गाची खुली मांडलेली ही अपार दौलत डोळयानें पाहून आबा त्या गावावर एकदम खूप होता.

याशिवाय आणखी एक कारण होतें. डोंगराच्या काठाकाठानें मैलाशेन मैलांच्या अंतरावर वळुंज्याप्रमाणें आणखी अशींच सहासात खेडीं होतीं. या गांवाच्या हद्दींतला मनुष्य त्या गावांत पाणी पिऊन येण्याइतकीं तीं जवळ जवळ होतीं. आबाच्या दृष्टींनें हा एक फायदाच होता. सहा सात खेडीं मिळून चार पाचशें उंबरठा सहज भरला असता. हळूहळू ती सारी खेडीं

आपल्या कार्यक्षेत्रासाठीं निवडण्याचा त्याचा विचार होता. आणि सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे त्या गांवचे इनामदार बाळासाहेब हे होय!

बाळासाहेब ही व्यक्ति प्रथमदर्शनीं अगदींच सामान्य वाटण्याजोगी होती. इतकेंच नव्हें तर ही मूर्ति बावळट असावी कीं काय असाही संशय निर्माण झाला असता. पुण्यामुंबईच्यासारख्या रस्त्यावरून अनेक वेळां बाळासाहेब हिंडत असतील. त्यांना पाहून टांगेवाले आणि व्हिक्टोरियावाले कुठला आला आहे येडप्या म्हणून अनेकवार हंसले असतील. गिरगांवरोड किंवा लक्ष्मीरोडवर आरास मांडून बसलेल्या एकाद्या दुकानांत बाळासाहेब कामानिमित्त शिरले असतील. काय विकत घ्यायचं याचं त्याना घटकाभर विस्मरण झाल्यामुळें ते गोंधळल्यासारखे होऊन पुन्हां दुकानाबाहेर पडण्यासाठीं माघारे वळले असतील आणि ही त्यांची संभ्रमावस्था टाचणीनें दांत उकरणाऱ्या एकाद्या बनेल दुकानदारानें पाहून त्यांना 'काय पाहिजे रावसाहेब!' म्हणून खोट्या विनयानें हटकलें असेल. मनाचा उडालेला गोंधळ लपविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत बाळासाहेब नको असलेली एकादी वस्तु केवळ दुकानदारापुढें आपली शोभा नको या विचारानें विकत घेऊन पुन्हां रस्त्यांत येऊन उभे राहिले असतील. कमालीचा भिडस्तपणा अंगीं असल्यामुळें शहरांत ज्याच्याकडे उतरले असतील त्याला थाप देतील कीं आतांच जेवून आलों आहे. आणि शहरी आदरातिथ्याच्या कल्पनेला मान तुकवून जर यजमानानें फारसा आग्रह केला नाहीं तर हा म्हातारा खुशाल उपाशींच झोपला असेल. टांग्यानें स्टेशनवर जायचें असेल तर बाळासाहेबांनीं भीतभीत टांगेवाल्याला 'अहो टांगेवाले' या किताबानें अनेकवार गौरविलें असेल. थोडक्यांत सांगायचं तर शहरामध्यें बाळासाहेबांना कुणींहि वळुजें गांवचे इनामदार म्हणून ओळखलें नसतें. बाळासाहेबांची मूर्ति दिसायला खरोखरीच बावळट होती. असल्या दैवदत्त देणगीवर शहरांत त्यांचें एकदिवस भागलें नसतें. आणि म्हणूनच कीं काय बाळासाहेब होतां होईतों शहरांत पाऊल टाकायला तयार होत नसत. मुलीच्या म्हणजे अरुणेच्या आग्रहाखातर ते आजवर चारदोन वेळां मुंबईस गेले होते. परंतु प्रत्येक खेपेस हाच अनुभव. जेव्हां म्हातारा आपला जुनाट वाडा डोळ्यानें पाही

तेव्हां त्याचें भडकलेलें माथें ठिकाणावर येई. शहरी संस्काराचे, शहरी-वातावरणाचें व बाळासाहेबांचे विळ्याभोपळ्या इतपत सूत होतें. त्यांना अजून शहरांतल्या बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाला नव्हता. सकाळीं संध्याकाळीं वारुळांतून हुसकावून लावलेल्या मुंग्या जशा दाटीवाटीनें रानोमाळ हिंडत असतात त्याप्रमाणें शहरांतील माणसं इतक्या गर्दीनं, लगबगीनं जातात तरी कुठें ? जेव्हां पहावं तेव्हां शहरांतला प्रत्येक मनुष्य आग-विझवायला निघण्याच्या घाईत. आणि परत आल्यावर वणवा विझवल्याइतका दमलेला. असल्या या गर्दीच्या आयुष्याचा त्यांना मनापासून तिटकारा होता. वळुंजें गाव त्यांना प्रिय होतें आणि गांवालाही पण ते प्रिय होते.

'घोडा घोडा' म्हणून घाबरलेल्या ऋषीकुमाराप्रमाणें शहराला दचकणारा हा म्हातारा आपल्या वाड्यांत, वळुंजें मुक्कामीं व्यवहाराला पक्का होता. वडिलार्जित इनामदारी उपभोगीत असतां सावकारीचा धंदा मोठ्या कसोशीनें बाळासाहेबांनीं आजवर चालवला होता. व्यवहाराला पक्का ह्याचा अर्थ बाळासाहेब अन्यायानें, जुलमानें लोकांच्या मुंड्या मुरगाळून पैसा मिळवीत होते असा मात्र घ्यायचा नाहीं. बाळासाहेब सावकारी करीत असतांना दुसऱ्याच्या घरादारावर नांगर फिरवीत होते असें आजूबाजूच्या पंचक्रोशींतल्या कोणाही शेतकऱ्यानें कबूल केलें नसतें. सावकारी करायची परंतु ती डोळयांत तेल घालून. त्यांनीं आजवर कधी कुणाला निपटून घेण्याचें कर्म केलें नव्हतें. किंवा उ[illegible] आपली दौलत उधळण्याचाही बेत केला नव्हता. त्यांनीं परोपकार केला असेल परंतु तो त्यांची मेहेरबानगी म्हणून. वेळप्रसंगीं कठोर होऊन त्यांनीं एकदोघांच्या डोळ्याचीं टिपेंही पाहिलीं असतील, नाहीं असें नाहीं. परंतु कांहीं झालें तरी कपटानें लोकांचा पैसा घशांत घालण्याची खोटी बुद्धि त्यांनीं दाखविली नाहीं. जशास तसें या न्यायानें त्यांनीं सावकारी पाहिली.

परंतु सावकारी हा बाळासाहेबांचा दुय्यम धंदा होता. त्यांचा विशेष आवडीचा व्यवसाय म्हणजे वाड्याच्या मागच्या बाजूस पसरलेली दोनतीन एकर जमीन. साध्या [illegible]णें त्या जमिनींत खपणें त्यांना मनापासून आवडत असे. गांवाच्या हद्दींत त्यांची या जमिनीशिवाय आणखी पुष्कळ

कोरडवाहू शेती होती. तिचें उत्पन्न सालोसाल भरगच्च येत असें. परंतु त्या शेतीकडे त्यांनीं स्वतः लक्ष दिलें नाहीं. वाड्याच्या मागची जमीन त्यांनीं स्वतःच्या प्रयोगासाठीं राखून ठेविलेली होती. वाड्यांतील दोन नोकर आणि स्वतः ते या जमिनींतील काय लागेल ती उलथापालथ करीत असत. अरुणेची आई हयात होती तेव्हांपासून बाळासाहेबांना हा छंद जडलेला होता. पत्नीची आवड पुरवण्यासाठीं बाळासाहेबांनीं अनेक तऱ्हेतऱ्हेचीं फुलझाडें दूरदूर ठिकाणाहून कलमें आणून तयार केली होती. त्याचप्रमाणें अरुणा लहान असतांना तिनें फळें भरपूर खावींत ह्या विचारानें भारून जाऊन त्यांनीं अनेक प्रकारचीं फळझाडें त्या जमिनींत लावलीं होतीं. फुलझाडांच्या कोणत्याही कॅटलॉगबरहुकूम बी आणवून त्यांचा प्रयोग आपल्या जमिनींत करण्यामध्यें बाळासाहेबांचा सारा आनंद साठवलेला असे. पत्नीवारल्यावर बारा वर्षांची अरुणा मुंबईला तिच्या मावशीकडे धाडण्यांत आली. घरांत दुसरें कोणी राहिलें नाहीं. बाळासाहेबांनीं वयाच्या पन्नासाव्या वर्षीं दुसरें लग्न करण्याचें साफ नाकारलें. आतां हा बागेचा षोक कोणासाठीं असा विचार क्षणमात्र बाळासाहेबांच्या मनाला चाटून गेला परंतु लगेच त्यांनीं ठरवलें कीं मुंबईला अरुणेला इथून आपण फुलें आणि फळें करंड्यांतून पुरवायचीं. आणि सुटींत अरुणा घरीं आली कीं तिला मळा दाखवून खूष करायची.

आजतागायत गेलीं दहा वर्षें लेकीला दर आठवड्याला एक फुलाची व एक फळांची करंडी बाळासाहेब एकाद्या व्रताप्रमाणें न चुकतां धाडीत आले होते. त्याच्यांतच त्यांना परब्रह्म सापडल्याचा आनंद मिळत होता. आणि त्याचकरतां ते आपलें एकाकी जीवन मोठ्या आनंदानें जगत होते. पोरीवर त्यांनीं आपली सारी माया वाहिली होती. सुटींत महिनाभर अरुणा वळुंजाला आली कीं इनामदारांची धावपळ पुसूं नका. नव्या नवऱ्याच्या उत्साहानें गुडघ्याला बाशिंग बांधल्यागत त्यांची गर्दी उडून जाई. अरुणेला आणण्यासाठीं ते स्वतः घरची बैलगाडी जुंपून मोटारीच्या रस्त्याच्या कडेला तास दोन तास आधीं हजर होत. अरुणा मोटारींत दिसली कीं त्यांच्या डोळ्यांत अक्षरशः अश्रु गोळा होत. उपरण्याच्या टोकानें डोळ्यांच्या कडा

कोरड्या करून ते बैलगाडीकडे नुसतेच बोट करीत. स्वतःच्या वाचाशक्ती-वरचा विश्वास यावेळीं त्यांचा पार उडालेला असे. जेव्हां गाडींत बसल्यावर अरुणा एकाद्या लाडीक पोपटासारखी बडबड करण्यास सुरवात करी तेव्हां त्यांना बोलण्याचा धीर होई. अरुणा येण्याच्या आधीं आठ दिवस तिची खोली नोकरांकरवी झाडून, सारवून तयार ठेवलेली असे. जुन्या तसबिरी गोवरीच्या कोरड्या राखेनें घासून साफ केलेल्या भिंतीवर लटकवण्यांत येत. तिचें कपाट ऊन पाण्यानें धुवून, उन्हात वाळवून पुन्हां जागच्याजागीं लावून ठेवण्यांत येई, सर्व तयारी स्वतः बाळासाहेबांच्या देखरेखीखालीं उरकण्यांत येई. अरुणा वाड्यांत आल्याबरोबर बाळासाहेब तिला प्रथम चहासुद्धां न घेऊं देतां सकाळींच तोडलेलीं फळें झाडाखालीं बसून खाण्याच्या इराद्यानें मागच्या बाजूस ओढून नेत. आणि मग महिनाभर बाळासाहेबांना अरुणेच्या आगमनामुळें कशाचीही आठवण राहात नसे. अरुणा परत जाण्यास निघाली कीं बाळासाहेबांची चर्या एकदम उतरून जाई. त्याचे डोळे भरून येत, आणि आवाज कापरा व जड येई.

अरुणा नेहमीं त्यांना म्हणे, " नाना, इतकं तुम्हांला वाईट वाटतं तर तुम्हीच कां माझ्याबरोबर मुंबईला येत नाहीं हो ? मलासुद्धां इथून गेल्या-वर आठ दहा दिवस कसं चुकल्याचुकल्यासारखं होतं. तुम्ही तरी चला नाहींतर मीच आपली इथ येऊन राहतें. कसलं आलं आहे डोंबल्याचं शिक्षण कुणास ठाऊक ! "

बाळासाहेब पोरीकडे पाणावलेल्या डोळ्यांनीं पाहात तिच्या केसांवरून हात फिरवीत म्हणत, " अरु, तुझ्या आईची फारफार आवड होती तूं खूपखूप शिकावंस म्हणून. ती स्वतः बिचारी मराठी वाचायलासुद्धां शिकली नव्हती. ती गोष्ट तिच्या मनाला लागून राहिली होती. मी तिच्या-जवळ कबूल केलं होतं कीं तूं अडून बसेपर्यंत मी तुझ्या शिक्षणाला हरकत घेणार नाहीं. तुला गेलं पाहिजे. अन् मला इथंच राह्यलं पाहिजे. नोकरांच्या विश्वासावर एवढी मोठी जमीन सोपवून जाणं हिताचं नाहीं. अन् तुला पोरीला सांगून समजणार नाहीं पण एक गोष्ट लक्षांत घे कीं ज्या घरांत तुझ्या आईबरोबर मी वयाचीं पंचवीस वर्षे काढलीं त्या घराला आतां लाथ

मारणं मला जमणार नाहीं. आमची दोघांचीं हाडं एका ठिकाणींच पडलीं पाहिजेत. हा वेडे ! त्यांत रडण्यासारखं काय आहे ? खेड्यांत राहून मी काय लगेच मरणार आहे वाटतं ? बघ, अजून माझे दंड बघ कसे पिळदार आहेत ते. वेळेला दीडशेर दूध लागतं मला अजून बरं का— "

अरुणा निघून गेली कीं ती पुन्हां केव्हां परत येणार याचा हिशोब स्वतःशींच करीत बाळासाहेब प्रत्येक दिवस मोजून काढीत.

आबाची ओळख अरुणेनें बाळासाहेबांना करून दिली. दोन वर्षांपूर्वीं आबा आपल्या शरपंजरीं पडलेल्या आईच्या समाचारासाठीं मोटरनें साताऱ्याहून पुण्यास जात होता. वाटेंत मोटर थांबली. आणि एक वीस वर्षांची मुलगी मोटरमधें बसवून एक बावळटसा दिसणारा म्हातारा डोळे पुशीत बैलगाडीकडे वळला हें दृश्य आबानें सहजच पाहिलें. आपल्या स्वतःच्याच विचारांत गढून गेल्याकारणानें प्रथम त्याला या दृश्याचें कांहींच वाटलें नाहीं. परंतु पंधरावीस मिनिटांनी त्यानें सहजच त्या मुलीकडे पाहिलें. अजून ती मुलगी तोंडाला रुमाल लावून खिन्नमनानें मागें धांवणाऱ्या शेताकडे पाहात असलेली त्याला दिसली. तिचे डोळे रडूनरडून लाल झालेले दिसत होते. नाकाचा शेंडा लालबुंद पडलेला होता. वाऱ्यानें उडणारे केस सावरण्याचा ती मुळींच प्रयत्न करीत नव्हती. एकंदर प्रकार आठवून आबाच्या मनामधें लख्ख प्रकाश पडला. सहानुभूतीच्या सुरांत तो सहज म्हणाला, " तुमचे वडील पोंहोंचवायला आले होते वाटतं— "

" होय ! " एवढेंच कसेंबसें म्हणून अरुणेनें डोळयांना रुमाल लावला. आबाला तिच्याविषयीं आदर वाटूं लागला. अलिकडच्या काळांत पितृभक्ति हा एक ढोंगाचा प्रकार बनत असल्याचें तो डोळयानें पाहत असतां ह्या मुलीनें एवढें मनाला लावून घ्यावें याचें त्याला आश्चर्य वाटलें.

शिरवळ स्टँडवर गाडी अर्धापाऊण तास ड्रायव्हरच्या मर्जीनुरूप उभी होती. थोड्या वेळानें अरुणा आपलें दुःख तात्पुरती विसरली. आणि आबाच्या प्रश्नाला मनमोकळेपणानें उत्तरें करूं लागलीं. आबाच्या कार्याची माहिती ऐकून तिला त्याच्याविषयीं आदर वाटूं लागला. तिनेंही त्याला कांहीं प्रश्न विचारले, व गाडींत मोकळेपणानें बोलतां येणार नाहीं म्हणून

तिनें पुण्यास ज्या ठिकाणीं ती दोन दिवस उतरणार होती तिथला पत्ता त्याला देऊन ठेवला. आबानें पुण्यास तिची गाठ घेतली व आपण जर वळुंजें मुक्कामीं आपलें कार्य सुरू करण्याचें ठरविलें तर इनामदारांची कांहीं मदत मिळेल काय असा रोखठोक प्रश्न टाकला. अरुणेनें त्यावेळीं निश्चित असें कांहींच उत्तर दिलें नाहीं. परंतु वडिलांना विचारण्याचें आश्वासन दिलें. पुढें प्रश्नोत्तरें होऊन एका वेळेस अरुणेनें बाळासाहेबांची व त्याची समक्षच वळुंजे मुक्कामीं गाठ घालून दिली. आणि बाळासाहेबांचा होकार मिळाला म्हणूनच आबानें वळुंजें गांव पसंत केलें.

## —६—

योगायोगानें गोष्टी घडून आल्या असें म्हणणें रास्त होईल. आबानें आपल्या पूर्वीच्या सहकाऱ्यांसमवेत हा गांव पूर्वी पाहिला होता हें खरें आहे. परंतु अरुणेशीं बोलाचाली होईपर्यंत हाच गांव आपल्याला बरा आहे असें त्यानें निश्चित ठरवलें नव्हतें. त्याचप्रमाणें अरुणेला एकाएकी साक्षरताप्रसाराचें हें आबाचें कार्य पसंत पडलें यांतही कांहीं आधीं ठरवा-ठरवीचा कसलाच प्रकार नव्हता. त्यांतून गेलीं आठ वर्षें मुंबईला शिक्षणा-निमित्त काढलेलीं असल्यामुळें खेड्याविषयीं तिच्या मनांत इतकी आपुल-कीची भावना वास करीत असेल असा तर्क केला तर तीही खोटी ठरेल. वळुंजें गांव तिला आवडे कां तर तिचे नाना त्या ठिकाणीं राहात होते म्हणून. या भावनेव्यतिरिक्त तिला खेड्याविषयीं फारसें प्रेम वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. तिच्या मनांत आबाविषयीं कांहीं नाजुकशी भावना निर्माण झाली असावी अशीं एकाद्यानें शंका घेतली तर तीही अस्थानीं ठरणारी होती. ज्या परिस्थितींत तिची आणि आबाची प्रथम भेट झाली त्या परि-स्थितींत नाजूक भावनांना घर करायला अवसरच नव्हता. परंतु आबाच्या-विषयीं तिच्या मनांत पहिल्याच भेटीला आदर निर्माण झाला हें निश्चित. स्वतःच्या सुखाला तिलांजली देऊन दुसऱ्यांना मदतीचा हात पुढें करणारा

मनुष्य केव्हांही आदरणीयच वाटावा यांत नवल काय होतें? घटकेच्या प्रवासांत मोठ्या आपुलकीनें आपल्याला काय हवें नको याची चौकशी करणारा आबा कदाचित् ती विसरूनही गेली असती. त्याप्रमाणें ती दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत आबाला विसरलीही होती. परंतु संध्याकाळीं आबा तिची गाठ घ्यायला पुण्यास तिच्या उतरण्याच्या ठिकाणीं हजर झाला तेव्हां तिला आबाच्या कळकळीचें कौतुक वाटूं लागलें. पुढें आबाचीं पत्रें मुंबईला येऊं लागली तेव्हां तिनें परस्पर वडिलांची गांठ घालून देण्याचा आपला मानस त्याला पत्रानें कळवला. त्याप्रमाणें वडिलांची गांठ तिनें एकदां घालून दिली व ती अंग झाडून मोकळी झाली.

बाळासाहेबांनी आबाचें म्हणणें कां मान्य करावें? राजमान्य राजश्रीया विराजित असे त्या गांवांतले एकमेवाद्वितीयम् बाळासाहेब होते हें खरें आहे. बारा वर्षांतून एकादा मामलेदार वळुंज्याला अडमडायला आलाच तर त्यांच्याच घरीं उतरत असे. सरकारी फॉरेस्ट गांवापासून दोन मैलावर लागत होतें. कामानिमित्त एकादा रेंजर त्या गावाकडे झुकलाच तर इनामदारांच्याच घरीं आपली पडशीं टाकून देत असे. त्याचप्रमाणें मोठ्या सडकेवर एकाद्या मुंबईच्या शेटची मोटार श्वास लागून बंद पडलीच तर इनामदारांची बैल-गाडी बोलावण्यांत येई. चारदोन तास विसावा घेऊन मग तो थेट रस्त्याला लागायचा. हें सर्व जरी सत्य असलें तरी बाळासाहेबांनीं गांवचें पुढारीपण पत्करण्याचें आजवर टाळलें होतें, इतरांची सुधारणा करीत बसण्याचा रिकामा छंद त्यांनीं स्वतःच्या मागें कधींच लावून घेतला नव्हता. एकादा शेतकरी आठ दिवसाच्या धावत्या पोस्टमननें आणून दिलेला मुंबईच्या मुलाचा 'कागूद' त्यांच्याकडे घेऊन आलाच तर ते त्याला सरळ धोंडोपंत मास्तरकडे पिटाळून देत. दुष्टबुद्धीनें नाहीं परंतु इतरांत मिसळण्याची त्यांना इच्छाच होत नसे. असें असतां बाळासाहेबांनीं आबाच्या विनंतीवरून गांवचें हें अप्रत्यक्षरीत्या येणारें पुढारीपण कां स्वतःवर लादून घेतलें?

खरं सांगायचं तर जगांतल्या ज्या अनेक गोष्टींना कारणपरंपरा देण्यास मानवी मन असमर्थ ठरतें त्यांतलीच हीही एक गोष्ट आहे असें म्हणावें लागेल. त्यांतून कारण उकरून काढायचें म्हटलें तर अरुणेची मध्यस्ती हें एक देतां येईल. अरुणेनें जर आबाच्या कार्याची तरफदारी केली नसती

तर बाळासाहेबांनीं आबाच्या कार्यांत लक्ष घातलें असतें कीं नाहीं हें सांगणें जरा जडच गेलें असतें. आणखी एक कारण सांगतां आलें असतें. आबा-सारखा तीस बत्तीस वर्षे वयाचा एक शहरांतला तरुण साक्षरताप्रसाराच्या मृगजलापाठीमागें धांवत खेड्यांत येतो याचें त्यांना नवल वाटलें. आज ते डोळयानें पहात होते. वळुंजें गांवांतील एकादा पोरगा सातार्‍यांत जाऊन चार अक्षरें पढला कीं थेट पुण्यामुंबईची वाट धरीत असे. एकाद्या गिरणींत म्हणा, अगर रेल्वेंत म्हणा अशाच कसल्या तरी उद्योगांत आपलें शिक्षण वायां घालवीत असलेलीं शेतकर्‍यांचीं मुलें ते डोळ्यांनीं पाहात आले होते. आणि हा शहरांतला शिकलेला मनुष्य खेड्यांत वस्ती करायला येतो म्हणजे नदी डोंगरावर चढूं लागल्याप्रमाणें त्यांना आश्चर्यकारक वाटलें. आबाच्या-विषयीं त्यांचा प्रथम ग्रह चांगला झाला हें मात्र निश्चित. त्यामुळेंच आबाला आपलें पाय वळुंजांत घट्ट रोवायला मिळाले.

आबा आपल्या खटल्यासह अरुणेच्या सूचनेवरून बाळासाहेबांच्या वाड्यांत उतरला. पुढच्या सोप्यांत सारें सामान एका कोपर्‍यांत लावून आबानें स्वतःला बसण्याउठण्यापुरती जागा झटकून साफ केली. वेणूसाठीं एक खाटलें आंतल्या बाजूस अरुणेनें लावून दिलें. बाळासाहेबांच्या वाड्यांत बर्‍याच वर्षांनीं माणसांची हालचाल सुरू झाली. दुपारचीं जेवणें उरकल्या-वर बाळासाहेबांनी आबाला माडीवर आपल्या खोलींत मुद्दाम बोलावून नेलें. बोलतां बोलतां बाळासाहेबांनीं आबाला आपल्यापासून कोणत्या प्रकारची मदत पाहिजे आहे असा सरळ प्रश्न केला. आबानें नम्रपणानें बोलण्यास सुरवात केली—

" प्रथम स्पष्टच खुलासा करतों. मला सुरवातीस तुमच्याकडून शंभर रुपये मिळावेत. थांबा, माझं ऐकून घ्या. हे पैसे मी कर्ज म्हणून वापरीन. दर महिन्याला पांच रुपये ह्या हप्त्यानें ते मी परत करण्याची हमी देतों. माझ्या कल्पनेप्रमाणें सगळ्या गोष्टी घडून आल्या तर एक वर्षाच्या आंत मी आपली सगळी रक्कम चुकती करूं शकेन. तुम्ही सावकारी करतां असं मी ऐकलं आहे. म्हणून म्हणतो कीं, व्याजाचा दर माझ्या कार्याकडे पाहून जबर नसावा."

बाळासाहेबांनी आपाद मस्तक आबाला न्याहाळून पाहात उत्तर केलें,

"तुम्ही व्यवहाराचें सडेतोड बोलणें करतां आहांत म्हणून म्हणतों कीं व्याजाचा प्रश्न मागाहून पाहूं. मुळांत मी तुमच्यापासून व्याजाची अपेक्षाच करीत नव्हतों. पण तुमची तयारी आहे तर मी तरी चार दोन टक्क्यावर कां पाणी सोडूं? बरं, आणखी काय?"

"या गांवात लोकलबोर्डाची शाळा आहे असं मी ऐकतों आहे. माझ्या कामामुळें त्या शाळेवर परिणाम होणार नाहीं असें मला वाटतें. परंतु जर यदाकदाचित् तसा योग आलाच तर मला विरोध होईल काय? कोणत्याही कारणानें एकदां बसलेली घडी पुढें मोडली जाऊं नये ही माझी इच्छा आहे."

बाळासाहेब थोडावेळ स्वत:शींच विचार करीत होते. अंमळशानें का कोणास ठाऊक त्यांचें डोळे कसल्यातरी सुप्त कल्पनेनें चमकूं लागले. बोलावें कीं न बोलावें याचा त्यांना बराच वेळ निर्णय घेतां आला नाहीं. शेवटीं संयमन करून ते एवढेंच म्हणाले, "हें पहा. विरोधाच्या बाबतींत मी तुम्हांस एवढेंच सांगूं शकेन कीं तुमच्या कामगिरीवर सर्व कांही अवलबून राहील, परंतु तुम्हाला त्या बाबतींत चिंता करण्याचें कारण नाहीं. मी असें कां म्हणतों त्याचा तुम्हाला थोड्या दिवसांनी प्रत्यक्षच अनुभव येईल. खेड्यांतल्या लोकलबोर्डाच्या शाळा म्हणजे काय तंत्र असतें हें आम्ही तोंडानें सांगितलें तर तुम्हाला खरं वाटणार नाहीं. तुम्ही त्यांत एकदां शिरलात म्हणजे तुमची जन्माची करमणूक झाली नाहीं तर नांव कशाला? पण मास्तर, तुम्हाला सकाळपासून विचारीन विचारीन म्हणतो पण हा वेळ पर्यंत मला धीरच झाला नाहीं. तुम्हाला राग येत नसेल तर एक नाजूक प्रश्न विचारूं कां?"

"बाळासाहेब, तुमच्या प्रश्नाचं-उत्तर देतांना मी कांहीं लपवून ठेवतों आहे असा तुम्हाला चुकून वास लागला तर तुमच्या नोकरांकरवीं आत्तांच्या आत्तां माझें सामान वाड्याच्या बाहेर बेलाशक फेकून द्या—" आबा गंभीर मुद्रा करून म्हणाला.

"इतकी तुमची तयारी आहे तर विचारतोंच. काय हो, तुम्ही मॅट्रिक झाला आहांत म्हणून आमची अरू सांगत होती. इतपत इंग्रजी शिकलेल्या माणसांना टोपलंभर कागदाचीं भेंडोळीं पगार म्हणून सरकार द्यायला तयार आहे असं मी ऐकलं आहे, युद्धाच्या भाऊ गर्दीत सरकारला माणसांची

खूप गरज आहे. आणि आजवर बेकार म्हणून गांवभर भटकणाऱ्या लोकांना ही राजापुरची गंगा उपटल्यासारखी वाटत असतां तुम्ही हें खूळ काय डोक्यांत घेतलं आहे? यांत तुम्हाला काय मिळणार आहे? मास्तरकीची नोकरी म्हणजे कुंभाराच्या गाढवासारखी असते, कष्टापायीं जीव जायचा अन् पुन्हां काटयांचा खुराक आहेच वरून. म्हणून म्हणतों कीं ज्या उद्योगांत तुम्हाला जन्मभर हातां तोंडाशीं गांठ घालावी लागेल तो उद्योग तुम्ही धरतां कशाला?" बाळासाहेब म्हणाले.

"मला पैसा मिळणाऱ्या नोकरीपेक्षां यांतच जास्त समाधान वाटतें. बाळासाहेब, मी ही तुम्हाला एक प्रश्न विचारतों, न रागावता उत्तर द्या. तुम्ही गांवचे सावकार आहांत. इनामदार आहांत. तुम्ही आजवर खूप पैसा हातांत खेळवला असला पाहिजे. मला सांगा, आपण इतका पैसा मिळवला या कल्पनेंत तुम्हाला पूर्ण समाधान मिळूं शकतें का?" आबाचा प्रश्न ऐकून बाळासाहेब एकदम मोठमोठयानें हसूं लागले.

"छान! छान! आपल्याला ही तुमची प्रश्नानें प्रश्न उडवण्याची युक्ति एकदम मान्य आहे. मास्तर, खरं सांगायचं तर मला तुमचं म्हणणं एकदम मान्य आहे. पैसा आज मिळेल अन् उद्यां जाईल पण मनुष्य प्रसंग विसरूं शकत नाहीं हें खरं आहे. मनाचं समाधान कांहीं निराळयाच गोष्टींत असतं. पण मला आणखी एक शंका आहे. मी माझ्या मनाचं समाधान अन्यतऱ्हेनं मिळवूं शकलों पण तुम्ही तें मिळवूं शकाल काय? निदान तुम्हाला तसं वाटतं का? मी काय म्हणतों, आलं का लक्षांत? ज्या उदात्त हेतूनं प्रेरीत होऊन तुम्ही ही उडी घेतली आहे, तो हेतु तुमचा सिद्धीस जाईल का? आपला देश म्हणजे कांहीं दहापांच कोसाचा पट्टा नाहीं कीं दहापांच हजार माणसांचा जमाव नाहीं. देश अफाट आहे. एक खंडच आहे कीं हो! आणि शेकडा नव्वदाच्यावर माणसं लिहूं वाचूं शकत नाहीं. आतां मला सांगा आभाळ फाटलेलं दिसत असतां तुम्ही आपल्या हातांतली टीचभर छत्री कुणाकुणाच्या डोक्यावर धरल्याचं समाधान मानूं शकाल?"

बाळासाहेबांच्या प्रश्नावर थोडावेळ विचार करून आबानें उत्तर केलें, "बाळासाहेब, तुमचा हा प्रश्न बिनतोड आहे. मी एकटा चाळीस कोटी

लोकांना साक्षर करूं शकेन असं म्हणणं म्हणजे सायकलवरून सूर्य लोकाची सफर काढायला निघण्याइतकं मूर्खपणाचं आहे. पण असं पहा, सायकल-वरून सूर्य लोक गाठूं शकतां येत नाहीं म्हणून सायकल फेकून देणं हेंही तितकंच मूर्खपणाचं होईल, नाहीं कां? माझी महत्वाकांक्षा इतकी पल्लेदार नाहीं, हें मी कबूल करतों. कामाचा पसारा अफाट आहे म्हणून कामाला आरंभच करावयाचा नाहीं हें मला पटत नाहीं. उलट मी असें म्हणेन कीं एकदां आपण कुठेंतरी सुरवात केली कीं इतरांच्याही मनांत येतं. त्यांनाही कार्य पुढें चालवण्याची बुद्धि होतें. आणि अशा रीतीनं सुताला सुत लागत आज ना उद्या केव्हांना केव्हांतरी कार्याला निश्चित रूपरेखा आणणारा एकादा महात्मा जन्माला आल्याखेरीज राहात नाहीं. टोलेजंग इमारत उभी करा-यची म्हटली म्हणजे पायासाठीं शेकडो, हजारों दगड खड्ड्यांत लोटावें लागतात. ते दगड जमिनींत दडतात. भव्य इमारतीकडे कौतुकानें पाहात असतां पायाचे दगड आपण पाहात नाहीं. परंतु ताजमहाल काय पाया-शिवायच बांधला गेला असेल?"

"म्हणजे तुम्ही पायाचे दगड होण्याचा मान पत्करूं इच्छितां? त्यांत तुम्हाला समाधान वाटेल?"

"कुणाला तरी पायाचे दगड म्हणून प्रथम आपलें आयुष्य वेचलेंच पाहिजे. आतां ओघानंच आलं म्हणून जरा मोकळया मनानं बोलून घेतों. आपल्या देशाची सध्यांची परतंत्र अवस्था कोठवर कायम राह्यची आहे? प्रत्येक पिढीनं जर मागच्या पिढीप्रमाणं स्वतःच्या पोळीवर तूप ओढून घेण्याची कृत्ति गिरवली तर देश यावच्चद्रदिवाकरौ स्वतंत्र होण्याची आशा आहे कां? तेव्हां देशाचें स्वातंत्र्य हें ध्येय कधींही दृष्टिआड करून चाल-णार नाहीं. तें ध्येय गाठण्यासाठीं कोणत्या ना कोणत्या तरी पिढीनं आपल्या आयुष्यावर पाणी सोडायला तयार झालेंच पाहिजे. प्रत्येक पिढी जर स्वतःची कातडी बचावण्याचा उद्योग करूं लागली तर कार्य मुळींच प्रगत होणार नाहीं. स्वातंत्र्याच्या ध्येयासाठीं कोणत्या ना कोणत्या तरी पिढीनें येलगार करायलाच हवा. मी सुदैव समजतों कीं तो मान आपल्याकडे घेण्याची मला सुबुद्धि सुचली. आणि देशाला उर्जितावस्था आणून द्यायची ठरवलं तर चाळीस कोटी जनतेची एकमुखी मागणी पुढें यायला पाहिजे. एका

खंडातील यच्चावत् लोकांची एक मागणी म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. त्या मागणीचा अव्हेर करतांना प्रत्यक्ष परमेश्वरालासुद्धां विचार करावा लागेल. पण आपल्या देशांतल्या सगळ्या जहाल, मवाळ चळवळींचं होतं काय कीं एकजण एक मागतों तर दुसरा त्याचं डोकं दाबून टाकून तिसराच पंथ काढतो. देशांतील मूठभर सुबुद्ध लोकांची ही तऱ्हा तर खेड्यांतील बहु-संख्या अडाणी लोकांची कांहीं निराळीच तऱ्हा. त्यांना बिचाऱ्यांना अजून काय मागायचं याचाच पत्ता नाहीं."

"खरं आहे आहे तुमचं म्हणणं. आमचा शेतकरी जन्मभर स्वत:च्याच विवंचनेंत इतका बुडालेला असतो कीं आपल्याला काय घ्यायचं आहे तेंच त्याला माहीत नसतं—"

"खरंच ! माझं अगदीं तेंच म्हणणं आहे. जन्मभर दारिद्य आणि त्या-पासून उद्भवणाऱ्या सतराशे साठ विवंचना, आपल्याला हातींपायीं बांधून टाकणारं दारिद्य कां निर्माण झालं, तें घालविण्याकरतां आपण सालोसाल इतकें मरत असतां देखील तें कां जाऊं नये याचा विचार करण्याची कुवत त्यांच्या अंगीं नाहीं. मी म्हणतों त्यांना विचार करायला लावलं पाहिजे. त्यांचा अडाणीपणा आपण आधीं घालवला पाहिजे, निरक्षरपणा, अडाणी-पणा, या पापामुळें लोकांच्यांत अनेक दुर्गुण शिरलेले आहेत. अडाणी माणसाला स्वार्थ फार तत्परतेनं कळून येतो. आणि त्याचमुळें एक वीतभर जमीनीसाठीं तो पाठच्या भावाचाही खून करण्यास मागेंपुढें पाहात नाहीं. बाळासाहेब, मला वाटतं लोकांना आपण शहाणं करायचा प्रयत्न करावा. या पिढींत नाहीं तर निदान पुढच्या पिढीला तरी कळून येईल की मानव जातीचं खरं कल्याण स्वार्थाकरतां तरफडण्यांत नसून स्वार्थत्यागाकरतां तयार राहण्यांत आहे. स्वार्थसाधूपणा हा मनुष्य जातीला लागलेला कलंक आहे."

बाळासाहेब टक लावून आबाच्या चेहेऱ्याकडे पाहात होते. अरुणा त्यांना सांगत होती त्या म्हणण्याचा त्यांना प्रत्यय येत होता. हा अगदींच धोंडोपंत मास्तरासारखा मास्तर नव्हता. याच्या मनांत कसलेंतरी रान पेटलेलें दिसत आहे. आपण फार तर बोलत नाहींना या कल्पनेनें शरमिंदा होऊन आबा मधेंच थांबला. बाळासाहेब मधेंच दूरवर पाहिल्यासारखें

करून म्हणाले, " तुमच्या ह्या कर्जाचा प्रश्न आत्तां निकालांत निघाला म्हणून समजा. शंभरच काय परंतु तुम्हाला जी रक्कम लागेल ती रक्कम तुम्ही माझ्यापासून खुशाल घ्या. तुम्हाला सवड मिळेल तेव्हां ती परत करा अगर नाहीं केलींत तरी माझं फारसं नुकसान होणार नाहीं याची मी खबरदारी घेईन. मी माझ्या मनांत जो आकडा तुम्हाला द्यायचा योजून ठेवला आहे तो तुम्हाला सांगणार नाहीं, तो आकडा पोहोंचेपर्यंत मी तुम्हाला आडवणार. नाहीं. मात्र मला तुमच्याशीं सावकारी करण्याची इच्छा नाहीं. रकमेचं व्याज तुम्हीच तुमच्या कार्यासाठीं देणगी म्हणून घेत चला—"

कृतज्ञताबुद्धीनें आबानें म्हाताऱ्याच्या पायावर डोकें टेकवलें. म्हाताऱ्यानें चटकन आबाला हाताला धरून उठवलें– "छेः छेः! असं काय वेड्यासारखं करतां? अहो, तुम्हीच आत्तां म्हणालात नं कीं मानवजातीचं खरं कल्याण स्वार्थत्यागांत आहे म्हणून! पुढच्या पिढीपर्यंत वाट पाहण्याची माझी तयारी नाही. आबासाहेब, तुम्ही इतक्या मोकळ्या मनानं बोलून टाकलंत त्यामुळं मलाही फार बरं वाटलं, खरं सांगू? माझ्याही डोक्यांत असले विचार कधीं मधीं येतात, नाहीं असं नाहीं. सावकारीचा माझा धंदाच आहे. कर्ज मागायला येणाऱ्या माणसांची ती दीन मुद्रा पाहिलीं कीं पुष्कळ वेळां पोटात तोडल्यासारखं होतं, आणि तारणाचा फारसा विचार मनांत न आणतां मी रक्कम देऊन टाकतों. ही खरी सावकारी नव्हे हें मी ओळखून असतो. पण पुष्कळ वेळां अशा चुका माझ्या हातून होतात एवढं मात्र खरं. सांगायची मौज ही कीं एकदोन अपवाद सोडले तर आजवर मला बुडीत खर्च म्हणून रकमा खोडाव्या लागल्या नाहींत. एकंदरीनं तुम्ही म्हणतां तेंच खरं आहे. कुणी ना कुणी तरी हा खडक फोडून घेण्यासाठीं स्वतःची बोटें चेंचून घेण्याची तयारी दाखवली पाहिजे. त्याशिवाय शहरांतली कोणतीही चळवळ पूर्णपणें कधीही यशाचा पल्ला गाठणार नाहीं. बरं तर, तुम्ही आतां निःशंक मनानं तुमच्या कार्याला लागा. तुम्हाला शाळेकरतां जागा मी मिळवून देईन. जानबा पाटलाच्या वरल्या बाजूला आमचा माणकू शेट आहे. त्याच्या भावानं मागें पुण्याहून कमाई करून आणली होती. तिच्या आधारावर एक घर बांधण्याचा त्याचा प्रयत्न अर्धाच राहिला. भाऊ

मेल्यावर त्या जागेंत माणकू शेठानं आपलं रेडकूंसुद्धां बांधलेलं नाहीं. ती जागा शाळेला द्यायला तो हरकत घ्यायचा नाहीं. तुमची कांहीं शंका असली तर सांगा—"

असल्या शकुनापशकुनावर आबाचा मुळींच विश्वास नव्हता. वेळ पडली तर मसणवटींत जाऊन सुद्धां त्यानें पोरांना शिकवण्याची तयारी दाखवली असती.

"मग जमलं. गांवातल्या लोकांची एक बैठक आमच्या वाड्यांत मागच्या बाजूला दोन चार दिवसांत बोलावून घेतों. अनायासें आंब्याचे दिवस आहेत. आमच्या बागेंतला हपूस तुम्हांला दाखवतों. आंब्याची चव घेतां घेतां साऱ्या मंडळींना तुमचा बेत सांगून टाकतों. आणखी कांहीं लागेल कां ?—"

"सर्वांत महत्वाची गोष्ट राह्यलीच. आमच्या संसारासाठीं डोक्यावर छप्पर अन् कडेला चार कुडाच्या भिंती आम्हांला दाखवून द्याल तर बरं होईल." आबा जागचा उठून म्हणाला. बाळासाहेब आश्चर्यानें त्याच्याकडे पाहून म्हणाले, "म्हणजे ? आमच्या या वाड्याच्या भिंती तुमचं रक्षण करूं शकणार नाहींत अशी तुमची कल्पना आहे कीं काय ? तें कांहीं नाहीं. आमच्या वाड्यांतच तुमचा मुक्काम ! अहो, इतके दिवस सबंध वाडा कसा मला खायला उठल्यासारखा वाटत होता. अन् वस्तीला येऊन अवघे बारा तासही भरले नाहींत तोंच तुम्ही निराळ्या बिऱ्हाडाची गोष्ट करतां म्हणजे काय चेष्टा आहे ?"

बाळासाहेबांना इतक्या लवकर दुखावणें आबाला युक्त वाटलें नाहीं म्हणून तो कांहींच बोलला नाहीं. परंतु मनांतल्या मनांत त्यानें निर्धार केला कीं चार दिवसांनी इतर गोष्टी लागी लागल्यावर स्वतःचें बिऱ्हाड स्वतंत्रच करावयाचें. एकाद्याच्या आतिथ्याचा गैरवाजवी फायदा घेणें त्याला स्वतःला तर मुळींच पसंत नव्हतें—आणि शिवाय वेणूच्याही मनाचा त्याला विचार करणें भाग होतें. वेणू कोणत्या परिस्थितींत आपल्याबरोबर यायला राजी झाली हें तो जाणून होता. ती आतां कशा तऱ्हेनें वागणार याचा त्याला बरोबर अंदाज लागलेला नव्हता. तरी पण सरळपणें ती आपल्याला कार्य करू देणार नाहीं ही शंका मधून मधून त्याच्या मनांत डोकावत होतीच. आणि याच कारणामुळें स्वतंत्र बिऱ्हाड करण्यास तो उत्सुक होता. गृहच्छिद्रें

शक्य तो दुसऱ्यांना दिसूं नये ही इच्छा असणें अगदीं स्वाभाविक होतें. त्याच प्रमाणें वेणूनें माथेफिरूपणाच्या लहरींत उच्चारलेला एकादा कडवट शब्द कुणाला दुखवण्यास कारणीभूत न व्हावा यासाठीं तो जपत होता. बाळासाहेबांना तो आपल्या पत्नीची हकीकत सांगण्यास धजावला नाहीं. परंतु वाटेनें वेणूचा स्वभाव अरुणेच्या थोडासा परिचयाचा झाला असावा असा संशय त्याला आला होता. तिच्या मदतीनें आपण या प्रकारावर पडदा पाडूं शकूं म्हणून तूर्त तो मुग्धच राहिला.

पुण्याहून निघतांना वेणूनें मोटर स्टँडवर अरुणेला प्रथम पाहिली. आबानें तिच्याविषयीं परिचयात्मक माहिती सांगतांच वेणूनें तोंड वाकडें केलें. मोटार चालू झाल्यावर वाटेनें आबा दोघींशींहि बोलत होता. परंतु वेणू कंपार्टमेंटमधल्या कोपऱ्यांत जी चिकटून बसली होती ती थेटपर्यंत तेथेंच होती. तिनें संभाषणांत मुळींच भाग घेतला नाहीं. अरुणेनें एकादा प्रश्न विचारलाच तर नाइलाजास्तव ती उत्तर करी. परंतु उत्तरांत होय किंवा नाहीं या व्यतिरिक्त तिसरा शब्द घुसूं न देण्याची खबरदारी घेई. वाटेंत मध्येंच मोटार थांबली असतां अरुणेनें ताजी मोसंबीं घेतलीं. अरुणनें दिलेलें फळ वेणूनें तसेंच्या तसेंच हातांत ठेवून दिलें. वाटेनें तिला चहाची गरज भासली नाहीं, कांहीं नाहीं. बाळासाहेबांनी आणलेल्या बैलगाडींत वेणूला मोटारींतून उचलून ठेवणें आबाचें काम होतें. परंतु वेणूनें शांतपणानें त्याचा हात मागें सारला व मोटरींतल्या एका कुळवाडणीच्या आधारानें तिनें बैलगाडींत आरोहण केलें. थोडक्यांत वेणूनें पुण्याहून मोटर सुटतांक्षणींच जी मिठाची गुळणी दातांत धरली होती ती अजून कायम होती. वडिलांच्या अखेरच्या उपदेशाचा ती स्वतःशींच विचार करीत होती. ज्याच्या पदरीं पडल्यामुळें आपल्याला हा जो पवित्रपणा आला आहे त्याचा बदला ती आतां अशा रीतीनें घेण्याचा विचार करीत होती. यापुढें कारणाशिवाय कोणाशींच एक अवाक्षर न बोलण्याचा निश्चय तिच्या मनांत घोळत होता. पायाचें दुखणें बरें होऊंदे म्हणजे पाहतें एकेकाचा तमाशा अशाच मुद्रेनें तिचे सारे व्यवहार बिनबोभाट पार पडत होते. अरुणेच्याविषयीं वेणूच्या मनांत फारसा आदर निर्माण झाल्याचें तिच्या मुद्रेवरून दिसत नव्हतें. मत्सराची छाया नव्हती हें मात्र निश्चित. इतक्या छकपक पोषाखानें मिरवणारी, कॉलेजांत शिकणारी

इनामदाराची मुलगी आबाकडे तसल्या दृष्टीनें कधीं काळीं पाहील ही कल्पना तिच्या दृष्टीनें हास्यास्पद ठरली असती. आबाचा बेंगरूळ पोषाख, त्याचें शिक्षण यावर अरुणा भाळणार नाहीं याची तिला खात्री होती. परंतु तिला अरुणेविषयीं नवल वाटलें तें मुख्यतः एकाच गोष्टीमुळें. मुंबईसारख्या सुधारलेल्या शहरांत राहणारी ही शिकलेली मुलगी आबाच्या मूर्ख विचाराशीं इतकी समरस कां व्हावी हें कोडें तिला उलगडले नाहीं. आबाच्या कार्यासाठीं ती मुद्दाम आपल्याबरोबर येते आणि स्वतःच्या वडिलांची गांठ घालून देते इतका मूर्खपणा तिला करावासा तरी कसा वाटला? बराच वेळ विचार करून वेणूनें तीं कोडीं न सुटणारीं असा शेरा मारून तशींच मनांतल्या मनांत दाबून टाकलीं. ही वरून चलाख दिसणारी मुलगी आपल्या नवऱ्याप्रमाणें आंतून बावळट असावी असाच तिनें स्वतःचा ग्रह करून घेतला. शेवटीं होतां होईतों एक अक्षर न काढतां काय काय होईल तें तें दुरून पाहण्याचा वेणूनें स्वतःशींच बेत ठरवून टाकला. मात्र त्यांतल्या त्यांत बाळासाहेब इनामदारांचा वाडा तिला बरा वाटला. आबानें त्या दिवशीं रात्रीं स्वतंत्र बिऱ्हाड करण्याची स्वतःची योजना तिला ऐकवतांच मोठ्या प्रयासानें तिनें स्वतःला आवरून धरलें. आबा आतां स्वतःच्याच कार्याविषयीं विचार करूं लागला.——

— ७ —

लोकलबोर्डाच्या शाळेचे एकमेव अधिकारी धोंडोपंत मास्तर ही व्यक्ति आबानें दुसऱ्याच दिवशीं पाहिली. बाळासाहेबांच्या इच्छेप्रमाणें आगाऊ निरोप न धाडतां शाळा सुरू झाल्यावर सुमारें तासानें बाळासाहेब, आबा आणि अरुणा तिघेजण अचानक शाळेच्या आवारांत येऊन दाखल झाले. आणि त्या ठिकाणीं दिसून येणारा प्रकार पाहताच तिघेही थक्क झाले. त्यांतल्या त्यांत आबा जास्तच विस्मयचकित झाला. बाकीच्या दोघांना थोडीफार पूर्व कल्पना असावी असें दिसलें.

"आबासाहेब, ही आमची लोकलबोर्डाची शाळा. या शाळेंत शिकून तयार होणारी भावी पिढी म्हणे इंग्रजांच्यापासून स्वराज्य हिसकावून घेणार आहे—" बाळासाहेब काठीच्या टोकानें एका पडक्या खपरेलाकडे निर्देश करून म्हणाले. आबानें त्या दिशेनें वर मान करून पाहिलें.

शाळेच्या चारी बाजूंनी कधीं काळीं दगडांची एक पुरुषभर उंचीची भिंत उभी असावी असा अवशेषावरून तर्क मानायला जागा होती. आज या घटकेला मात्र भिंतीचे मोटाले दगड विस्कळीत झालेले दिसत होते आणि त्यांतले बरेचसे दगड आजूबाजूच्या लोकांनीं आपलीं घरें बांधण्या-साठीं रातोरात पळवून नेण्याची नवल कहाणी अरुणेनें आबाला ऐकवली.

शिल्लक राहिलेल्या भिंतीवर गुडघा गुडघा गवत वाढलेलें होतें. दारांतच एक लाकडाचा भला मोठा ओंडका आडवा पडला होता त्याच्यावरून उडी मारूनच त्या भिंतीच्या आंत प्रवेश घ्यावा लागत होता. शाळेचें आवार मोठें होतें परंतु आवारांत जिकडेतिकडे गवत वाढलेलें होतें आणि त्या गवतावर दोनचार शेळ्या बें बें करीत हिंडत होत्या. ओंडक्याच्यापुढें चार हातावर एक कसला तरी खड्डा होता. कसला खड्डा आहे या कुतुहलानें आबा पुढें सरकला. त्याला हाताला धरून मागें ओढीत बाळासाहेब म्हणाले, “ विहीर आहे ती. आजवर दोन पोरं खेळतां खेळतां तळाचा ठाव घ्यायला गेलीं आहेत. दोन म्हशी आंत पडल्या होत्या. झाला एवढा अनर्थ पुरें आहे तुम्ही आपले लांबूनच पाहा. ”

विहीर आणि ती अशा उघड्या स्थितींत या विचारानें आबा चकितच झाला. जरा जवळ जाऊन त्यानें विहिरींत डोकावून पाहिलें . शेवाळें माजल्यामुळें पाणी हिरवेंगार दिसत होतें. विहिरीला पायऱ्या नव्हत्या. मुलांसाठीं पाणी दोरीनें शेंदून काढावें लागतें हा अरुणेचा खुलासा आबानें मान डोलवून ऐकून घेतला. असलें घाण पाणी पोरांनीं प्यायचें ही कल्पनाच त्याला सहन होईना. विहिरीच्या एका बाजूस घाणपाण्याचें थारोळें होतें. त्यांत इतका वेळ स्वच्छंदीपणानें विहार करणारीं डुकरांचीं पिलें माणसाच्या पावलांचा आवाज ऐकतांक्षणींच भिऊन पळून गेलेलीं आबानें पाहिलीं होतीं. आबाने आवाराकडें पाहिलें. भयाण, भकास देखावा त्याला दिसला. मुलांचें मन रमेल अशा तऱ्हेची एकही वस्तु त्याला आवारांत दिसली नाहीं. परतंत्र देशाला बालपणींच्या शाळेंत पुढील आयुष्याची तयारी अशा रीतीनें करून देणें इष्ट आहे अशीच मास्तरांची एकादी अभिनव कल्पना होती कीं काय राम जाणें. कोणत्या ना कोणत्या तरी कलमाच्या खालीं सापडून तुरुंगाचा भकासपणा पुढें सहन करावा लागेल त्याची ही पूर्वतयारी असावी बहुतेक. एका कोंपऱ्यांत वीतवीत हाडें वर आलेली. म्हैस मार्कंडेय ऋषीच्या अवसानांत डोळे मिटून समाधिस्थ झालेली दिसत होती. भोवतालीं घाण इतकी माजली असून ती काढण्याचे कोणाच्या मनांत आलेलें नव्हतें. आणि त्या स्थितप्रज्ञ जनावरास कशाचीच घाण येणें अशक्य होतें. मधेंच एकादा कावळा तिच्या पाठीवर येऊन बसे व तिच्या पाठाडावर चिघळलेल्या

जखमेला चोचीनें टोंच मारी. तेवढ्या क्षणापुरती शेपटीची चवरी फिरवून ती म्हैस पुन्हां ब्रह्मांडीं आत्मा नेल्यासारखी स्तब्ध होई.

शाळेच्या भिंती मातीच्या होत्या. काळानें आपल्या पहारी ठिकठिकाणीं भोसकल्यामुळें भिंतींत अनायासें खिडक्या निर्माण झालेल्या होत्या. इमारतीचा मुख्य दरवाजा मोडून पडलेला होता; कदाचित् दरवाजे आणि झडपा असल्या क्षुद्र आडोशामुळें ज्ञानयज्ञाला प्रज्वलित होण्यास प्रतिबंध होण्याचा संभव आहे. या भीतीमुळें या आपत्तींचें स्वागतच करण्यांत आलें असावें.

आबाला या सर्व विचित्र आणि भकास वातावरणापेक्षां जास्त जर कोणती गोष्ट विचारार्ह वाटली असेल तर ती म्हणजे मुलांच्या शाळेंत मुलांचा कुठेंच पत्ता दिसत नव्हता. जगभर आजवरची प्रचलित समजूत ही कीं शाळा चालू झाली असतां शाळेमधें मुलें हीं असावयाचीं. परंतु वळुंजें गांवच्या त्या शाळेनें मुलें हजर नसणारी मुलाची शाळा असलें एकादें वैशिष्ठ्य प्रस्थापित करण्याचा बेत केला होता कीं काय कोण जाणें. दारां-तून तिघेहीजण आंत शिरले तेव्हां एका कोपऱ्यांत दोन मुलें समोरासमोर बसून विड्या वळण्याचें कार्य करीत बसलेलीं त्यांना दिसलीं. रानांतून गोळा करून आणलेलीं टेंबुर्णीचीं पानें अस्ताव्यस्त त्यांच्या आजूबाजूस पडलेलीं होतीं, आणि पुढ्यांत एका फुटक्या तव्यांत तंबाकूचा ढीग करून तीं मुलें मोठ्या तत्परतेनें विड्या बांधीत होतीं. इनामदार आलेले दिसतांच अंगांत वीज संचारल्याच्या आवेशानें त्यांनीं आपल्या पुढच्या कर्तबगारीवर फाटक्या पोत्याचें आच्छादन टाकलें, व नुकत्याच धरून आणलेल्या बेरडाप्रमाणें मुद्रा करून ते जाग्यावर उठून उभे राहिले. दोघांची नजर एका कोपऱ्यांत मुद्दाम तयार केलेल्या तट्ट्याच्या आडोशाकडे खिळून राहिली होती.

"कायरे धोंडोपंत मास्तर कुठें आहेत?" बाळासाहेबांनीं अंदाजानें त्या तट्ट्याच्या आडोशाकडे पाहून म्हटलें. परंतु विचारलेल्या प्रश्नांना ताबडतोब सरळ उत्तर करणें त्यांना अजून कुणी शिकवल्याचें दिसलें नाहीं. अरुणेनें आवाजांत मार्दवता आणून पुन्हां तोच प्रश्न केला तेव्हां एकानें गोंधळलेली मुद्रा लपवण्याचा प्रयत्न करून गुळमुळीत उत्तर केलें. "काय बा! आतां हिथं होते आन कुठं ग्येलं काय जणूं.—" दुसऱ्यानें उत्तरा-

ऐवजीं बाहेर बाजूस फिरणाऱ्या शेळीकडे पाहून 'हर्रर्र' म्हणून कानठळ्या बसेल अशी जोराची हाक ठोकली.

आबानें त्या मुलाकडे आपादमस्तक न्याहाळून पाहिलें. विटलेली हातभर लांबीची लंगोटी आणि अंगांत सरासरी जेमतेम बेंबीपर्यंत पुरणारा फाटका, तुटका, विटका खमीस हाच त्यांचा पोषाख. एकाच्या पायाला नडगीवर कसला तरी व्रण होता. त्याच्यांतून पाणी झिरपत होतें. दुसऱ्याच्या काटकुळ्या पायावर शिरांचें जाळें विणण्यांत आलें होतें. दोघांच्याही अंगावर खंडीभर मळ साचलेला होता. रस्त्याच्या कडेला जाणाऱ्या येणाऱ्या मोटारीमुळें उडणारी धूळ अंगावर घेऊन घेऊन एकादा मैलाचा दगड जसा रापल्यासारखा दिसतो त्याप्रमाणें तीं दोन्हीं मुलें दिसत होतीं. शरिराच्या प्रत्येक अवयवांवर कसली ना कसलीतरी जखम ही होतीच. कानांचीं पाळीं ही कधीं मधीं धुवून स्वच्छ करावीं लागतात हें साधेंमुधें ज्ञान त्याच्या गांवींही नव्हतें. कानांचा उपयोग मास्तरांनां पिळण्यासाठीं किंवा स्वतःला अधूनमधून खाजवण्यासाटीं यापेक्षां दुसरा कोणता असणार अशीच त्याची प्रामाणिक समजूत असावी. डोळ्याचीं चिपडें, नाकाचें बोळकें धुण्याची मेहेनत घेतो कोण ? अन् रानांत हिंडणाऱ्या सिंहानें कधीं दात घासल्याचें कुणी ऐकलें आहे काय ? मग माणसांनीच दात घासण्याची एवढी चपळाई करून दाखवण्यांत काय शहाणपणा आहे ? वर्षानुवर्षें डोक्याला तेलाचा संपर्कही न लागल्यामुळें बाहेर चरणाऱ्या शेळींच्या पाठी आणि त्या मुलांचीं डोकीं सारख्याच प्रमाणांत चरचरीत दिसत होतीं. आबानें एकदोन सेकंदांत हा सर्व प्रकार पाहिला आणि उद्वेगानें तो दुसरीकडे पाहूं लागला.

दुसऱ्या मुलानें शेळीला घातलेली हुलकावणी म्हणजे खुणेची परवल होती. कारण त्या मुलाचा आवाज थांबतो न थांबतो तोंच तट्ट्याच्या पलीकडून कोणीतरी जोरानें खेकसलें "कायरे मारत्या, केव्हड्या जोरानें बोंबलतो आहेस ! तुझा बाप लेका वढ्यालां जायला अजून रेट अवकाश आहे कीं— ". आणि या आकाशवाणीच्या पाठोपाठ तार स्वरांतील जांभई व चुटक्यांचा आवाज हे ध्वनि उमटले. मारत्याचा अपराध आबाच्या तात्काळ लक्षांत आला. दुपारच्या प्रहरीं अंमळ वामकुक्षी घेण्यासाठीं लवंडलेल्या मास्तरला अशा रीतीनें जागें करणें हा गुन्हा कांहीं सामान्य नाहीं. परंतु मारत्यानें समोर उभ्या

असलेल्या मंडळींकडे न पाहतां रानडुकराच्या अवसानांत तट्टयाच्या आड धूम ठोकली. थोड्या वेळानें बाहेर स्वच्छ ऐकू येईल अशा बेतानें कुजबुजणें ऐकू आलें. "मग शिंच्या, आधीं कां मला उठवलं नाहींस? तुम्हा सगळ्यांना लेको, हत्तीच्या पायाशीं बांधून तळयांत बुडवलं पाहिजे. जा-जा आधीं मागच्या बाजूस पडलेलं बाकडं झाडून पुसून त्यांना बसायला दे. वेधळयासारखा पाहतोस काय माझ्याकडे? अन् सध्याला त्याच्या घरनं लिंब आणायला पिटाळ आधीं. माणकूशेटकडून साखरहि आण म्हणावं—"

धोंडोपंत डोक्याला रुमाल गुंडाळीत बाहेर आले. अचानक गाठल्यामुळें त्यांची साहजिकच तारांबळ उडालेली होती. सदऱ्याच्या गुंड्या खालवर झालेल्या होत्या, त्यामधून छातीवरचे केसांचे पुंजके बाहेर डोकावत होते. धोतराचा कासोटा अर्धवट मागच्या बाजूस लोंबत होता. रुमालाच्या वेष्टनाआड दडण्याचें पसंत न पडल्यामुळेंच कीं काय शेंडीची बट मोठ्या उत्सुकतेनें वर डोकावून पाहात होती. गर्दीमध्यें तोंडांतील चोथा कसाबसा थुंकून टाकल्यामुळें हनुवटीवर बोटबोट वाढलेल्या दाढीवर पिंगट रंगाची झाक मारीत होती. कोठल्याहि लोकलबोर्डाच्या शाळेला ललामभूत होणारा हा हिरा दंतपंक्ती काढीत बाहेर आला.

"यावं यावं, इनामदारसाहेब. अन् असे अवचित आज इकडे कुणीकडे? कुणाबरोबर तरी कळवायचं कीं नाहीं? म्हणजे चार फळं आणून ठेवलीं असतीं. स्वागताचीं गाणीं म्हणणारीं पोरं जरा तालीम घेऊन तयार ठेवलीं असतीं. आतां म्हणजे पहा. ताईसाहेब कधीं नव्हंत पायधूळ झटकायला आमच्या गरिबाच्या आश्रमांत येणार अन् त्यांना आम्ही लिंबाचं पाणी देणार. म्हणजे काय खरं आहे? शूः! ऊन म्हणजे कोण! जरा अंमळ पोरांच्या हजेरीचे तक्ते पाहात पडलों होतों बाजूला. खात्याचं काम म्हणजे असं जिकिरीचं,, विचारूं नका! बसा बसा पाहुणे. मारत्या, तो मोडका पाय भिंतीच्या बाजूला कर. एवढं. साधं ज्ञान तुला नाहीं? अन् धोंडोपंत मास्तरांचा शिष्य म्हणून मिरवतोस! लोक माझी किंमत करतीलनं—"

मारत्यानें आणून मांडलेल्या बाकावर तिघेहि जरा भीतभीतच सावरून बसले. अरुणा तोंडाला रुमाल लावून शाळेच्या आवाराकडे पाहात होती. बाळासाहेब धोंडोपंतांच्या डोक्यावरून दूर कुठेंतरी आकाशाकडे पाहात

होते. आणि आबा जमिनीकडे दृष्टि लावून पाहात होता. सरकारमान्य शाळांची ही दुर्दशा पाहून त्याला वाईट वाटलें. आहे ह्या स्थितींतसुद्धां आपल्या हाताशीं असलेल्या साधनांचा माणसांना कितीतरी उपयोग करून घेण्यासारखा आहे. परंतु इच्छाच जेथें नाहीं तेथें फळें यावींत तरी कशीं? ज्या ठिकाणीं मुलें गुरुमुखांतून उगम पावणारी गंगोत्री प्राशन करण्यासाठीं बसणार ती जागा तरी काय लायकीची होती? पायाखालची जमीन नुकतीच बॉंबहल्ल्यांत सापडल्यासारखी उध्वस्त झालेली दिसत होती. बसण्याच्या जागेला वीतवीत खड्डे म्हणजे बसणाऱ्यानें बसावें तरी कसें? खेड्यांत मातीला पैसा पडत नाहीं. हें खड्डे बुजवून मुलाच्याच हातानें त्यांवर दर रविवारीं सारवण करून घ्यायला कोण नाहीं म्हणणार होतें? निदान त्या उंचसखल मैदानांत विड्यांची विझवून टाकलेली थोटकें बाहेर फेकून द्यायला काय कष्ट पडणार होते? डोक्यावरच्या छपरांतून उन्हाचे कवडसे जमिनीवर पडत होते. तें छपरेल दुरुस्त करून घेतां आलें असतें. परंतु धोंडोपंताच्या अवताराकडे पाहून आबानें काय ओळखायचें तें ओळखून घेतलें.

"काय मास्तर, शाळा कशीकाय चालली आहे?" अरुणेनें तोंडावरचा रुमाल दूर न करतां म्हटलें.

"ताईसाहेब, हा काय प्रश्न? आज अठरा वर्षं खात्यानं मला वळुंजाहून बदलला नाहीं तें काय काम उत्तम चाललं नसेल म्हणून! गेल्या वर्षी साहेबांचा रिपोर्ट फारच चांगला आला होता. सातारा जिल्ह्यांत नमुनेदार शाळा म्हणून त्यांनी आमचा गौरव केला आहे." धोंडोपंत अदबीनें हात जोडून म्हणाले.

"तुमचा तो ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर म्हणजे आपला देशपांडेच अजून आहे कां? त्याची तुमची चांगली दोस्ती आहे." बाळासाहेब खोचून म्हणाले.

धोंडोपंताच्या मुद्रेवर समाधानाच्या लाटा उमटल्या. डाव्या हातानें दाढी खाजवीत तोंड खुलल्यासारखें करून ते म्हणाले, "कसची, कसची! इनामदारसाहेब, हीं आमच्या खात्याचीं माणसं म्हणजे बापाला बाप न म्हणणारीं. सर्पाची जात बरी पण दिपोटीची नको. मागें असाच एक दिपोटी

नुकताच पुण्याहून बदलून आला होता. त्यानं तर माझं नरडं धरण्याचा घाट घातला. पण थोडक्यांत निभावलं. अहो, एक दिवस बाळासाहेब, तुमच्या बागेंतले आंबे चांगले ओकसतोंपर्यंत खाऊन गेला अन् शेवटीं वीष ओकला. आतां हल्लींचे हे देशपाडे मनुष्य म्हणजे लाखांतला आहे. पण मी म्हणतों, सोनं गहाण टाकायचं त्याला जामीन पाहिजे कशाला ? आपलं काम चोख ठेवलं म्हणजे दिपोटी नव्हे ब्रह्मदेवाचा बाप उतरला तरी आपल्याला डर कशाची ? कामांत पकडावं अन् मग माझा कान खुशाल धरावा—"

" अन् मग आज मुलं कुठं आहेत ? आज सुटी तर दिसत नाहीं—" बाळासाहेबानी सहेतुकपणानें प्रश्न केला. या प्रत्यक्ष प्रश्नानें धोंडोपंत क्षणभर गांगरल्यासारखे दिसले परंतु अंगांतला जातिवंत मास्तर खडबडून जागा होऊन त्यांनीं उत्तर केलें—

" या कारट्यांन्या पायीं मी रंजीस आलों आहे, बाळासाहेब ! लाखवेळां मी मुलांना सांगून ठेवलं असेल कीं उन्हाळा असो नाहींतर उन्हाळयाचा बाप असो, आपली शाळा नेहमीं दुपारचीच राहणार पण यांच्या डोक्यांत तें उतरेल तर ना ! बेटे सगळे सकाळींच येऊन गेले. आतां तुम्हीच सांगा सकाळचे माझे इतर व्यवसाय सोडून शाळा करीत बसलों तर माझं भागेल कां ? तीस पस्तीस रुपयावर माझा प्रपंच चालेल का ? त्यांतून थोरला मुलगा साताऱ्याला इंग्रजी शिकायला धाडीन म्हणून म्हणतों आहे. तुम्ही येण्याच्या आधीं अर्धा तास दोन पोरांना पिटाळलं आहे मुलांना गोळा करायला. अजून आले नाहींत, केव्हां येतील हरी जाणें."

" एकंदरींत तुमचा हा पेशा कठीणच आहे, मास्तर ! आम्ही गांव-चेच आहोंत म्हणून सोडून द्या. पण हे पुण्याचे पाहुणे आमच्याकडे आले आहेत. त्यांना आपल्या गावची माहिती नाहीं. तुमच्या कर्तबगारीची यांना गंधवार्ताही असणं शक्य नाहीं. त्यांचा समज कांहीं निराळाच व्हायचा नाहीं कां ? अन् तुम्ही मारे इकडे जिवाचं रान करून पोरांना शिकवून सोडता आंहां—" अरुणा आपली मुद्रा शक्य तितकी विकाररहित ठेवून म्हणाली.

" आतां, ताईसाहेब, तुम्हीच पहा. तुमचं बोलणं आपल्याला एकदम

पटलं. माझ्या साऱ्या हयातींत ताईसाहेब, तुमच्याइतकं समजूतदार माणूस मी दुसरं पाहिलं नाहीं. मास्तरकी म्हणजे म्हारकी म्हणून लोक म्हणतात. पण मी म्हणतों म्हारकी शंभर पटींनं बरी. श्रमाचं चीज झालं नाहीं, म्हणजे असा वैताग येतो म्हणता--" धोंडोपंतांच्या बोलण्याची धाटणी ठराविक होती. चारदोन मिनिटें त्यांचें भाषण ऐकल्यावर ऐकणारा कंटाळून जाई. आबा इतका वेळ कांहींच बोलला नव्हता. धोंडोपंताचें आणखी एकादें कंटाळवाणें व्याख्यान ऐकायला नको म्हणून तो मधेंच म्हणाला, " मुलांची संख्या किती आहे पटावर ? "

" बावीस नाहीं तर तेवीस असेल बहुतेक. तसं कशाला, प्रत्यक्ष पाहूनच सांगतों कीं--" धोंडोपंत लगबगीनें आंतल्या बाजूस जाण्यासाठीं वळलेलें पाहतांच आबानें त्यांना कांहीं जरूरी नाहीं म्हणून खूण केली. ज्या मास्तराला शाळेंत बावीस कां तेवीस मुलें एवढा लहान आकडासुद्धा स्मरणांत ठेवण्याची आवश्यकतावाटत नाहीं त्याची इतर कामगिरी पाहून किंवा ऐकून तरी काय फायदा ? आणि हा मास्तर पोराच्याकडे काय डोंबल लक्ष देणार ?

थोड्या वेळानें सरबतपान झाल्यावर तिघेही शाळेंतून बाहेर पडले. कोपऱ्यापर्यंत पोहोंचवण्याचा हट्ट धरून तेथपर्यंत बरोबर आलेले धोंडोपंत नजरेआड होतांक्षणींच बाळासाहेब आबाला उद्देशून म्हणाले, " काय आबासाहेब, पाहिलीत आमचीं लोकलबोर्ड अन् त्यांच्या शाळा ! हे आमचे धोंडोपंत मास्तर. आतां तुम्हाला सवडीनं मी ह्याचे एकेक पराक्रम सागेन. माझ्यापेक्षां आमची अरू त्या कामांत जास्त तरबेज आहे. सुटींत ती इथं आली कीं महिना दोन महिने गावच्या चांभारचौकशा करण्याचा तिचा आवडता व्यवसाय असतो. काय अरू, खरं कीं नाहीं ? "

" नाना, तुम्ही माझी स्तुति करतां आहांत का निंदा करतां आहांत ? मलाही तुमच्याविषयीं खंडीभर बोलतां येईल, बरं का ! " अरुणा हसून म्हणाली.

" काय बोलतां येईल ? हेंच कीं नाहीं कीं मी गांवातल्या कुठल्याहि गोष्टींत कधींच भाग घेत नाहीं. लोक मला गर्विष्ठ म्हणतात, तुसडा म्हणतात आणि माझ्या बागेच्या नादामुळें चक्रम डोक्याचा थेरडा म्हणूनही बोलायला सोडीत नाहींत. पण मला हे आरोप एकदम कबूल आहेत कीं. तुम्हीच

पहा आबासाहेब, या धोंडोपंत मास्तरासारखीं रत्नं भेटलीं म्हणजे पुन्हां यांचं तोंड पाहावंसं वाटेल का? या असल्या अनुभवामुळें मला इतरांच्या-मधें मिसळावंसं वाटतच नाहीं. हा धोंडोपंत काय काय गंमती करीत असतो तें तुम्ही ऐकाल तर थक्क व्हाल. तीं पोरं विड्या वळीत होतीं त्या याच्यासाठीं–पोरांकडून विड्या वळून घ्यायच्या, पत्रावळी लावून घ्यायच्या, हरतऱ्हेची कामं करून घ्यायचीं हें कांहींच नाहीं. ती रोगी म्हैस पाहिलीत नं. ती याचीच. एक पोरगा तिची सारी व्यवस्था करतो. गुरुसांदीपनीला कृष्णानं लाकडाच्या मोळ्या आणून दिल्या हें पुराण ऐकवून तो पोरांकडून सर्पण आणवून घेतो. रोजच्या भाजीसाठीं एक दिडकीही खर्च करण्याचं त्याच्या मनाला अजूनपर्यंत शिवलं नसेल. रोज एका पोरानं कसली तरी भाजी आणून दिली पाहिजे हा त्याचा नियम आहे. झालंच तर, सणासुदीला पाटीपूजा हें प्रस्थ यानंच लावून दिलं आहे. गावातल्या कुणाच्याही कार्यांत याची मिळकत ठरलेली असते. आणि इतकी लाटेगंगारामी करून करतो काय तर वरिष्ठांचा एक दिवस सोडून दिला तर बाकीचे तीनशे चौसष्ट दिवस हा गांजा फुंकीत झोपा काढीत असतो. ज्या दिवशीं वरिष्ठ येतील त्या दिवशीं त्याची लगीनघाई विचारूं नका." बाळासाहेब रस्त्यानें जातांना मोठ्या खुषींत येऊन बोलत होते.

"नाना, आज आपलं चुकलंच. धोंडोपंतांना सकाळीं निरोप पाठवला असता कीं मग आपला थाट केव्हढा केला असता त्यांनीं. स्वागतपर पद्य ऐकण्याची तुम्ही संधि घालवलीत. काय तीं पोरं, काय त्यांचे आवाज अन् काय तो धोंडोपंतांचा दिमाख! आपल्याच बागेंतले मुलांकडून चोरून आणवलेले आंबे आपल्याला खाऊं घालण्याची धोंडोपंताची हिकमत या आबासाहेबांना आज तुमच्या घाईमुळें पाह्यला मिळाला नाहीं." अरुणा म्हणाली. थोडा वेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं. उन्हामुळें कपाळावर उतरणारे घर्मबिंदू टिपून काढण्यांत अरुणा गर्क झाली. बाळासाहेब स्वतःशींच कसला तरी विचार करीत होतेसे दिसले. आबा मुद्दामच कांहीं बोलत नव्हता. मास्तरानें मास्तराची अब्रू काढणें बरें नाहीं या विचारानें तो स्तब्ध होता. मात्र त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें.

"तेव्हां आबासाहेब, असल्या या प्रतिकूल परिस्थितींत तुम्हाला डोकं

वर काढावं लागणार आहे. खेड्यांतील लोकांची स्थिति सुधारली पाहिजे ह्या विचार माझ्यासुद्धां डोक्यांत अनेकवार येऊन गेला असेल. पण तें करायला गेलं तर किती अनंत अडचणी वाटेंत पडल्या आहेत ह्याची नुसती कल्पना जरी मनांत उभी राहिली तरी सारे चांगले विचार आपोआप थंड पडतात. माझी एक कल्पना आहे. पहा तुम्हाला पटली तर. माझी खात्री आहे कीं आपला सर्वांत मोठा शत्रु दुसरा तिसरा कुणी नसून आपले आपणच आहोंत. आपणच आपल्या प्रगतीआड येत असतो. परकीय सत्ता हें एक कारण आहेच म्हणा. परंतु आपलीं माणसंही कांहीं कमीं नाहींत. जामदारखान्याच्या किल्ल्या ज्याच्या हातांत त्यानंच चोरी करण्याचं ठरवलं तर कुणाकडे तक्रार करणार ? भावी पिढी तयार करण्याचं ज्याचं पवित्र कार्य त्यानं त्या पिढीला विड्या वळायला बसवलं तर काय बोलणार ? " बाळासाहेब बोलत होते. पण त्यांच्या बोलण्याकडे आबाचे फारसें लक्ष दिसलें नाहीं. धोंडोपंताच्या आतांच पाहिलेल्या गैरहिशोबी वृत्तीचें राहून राहून त्याला नवल वाटत होतें. चाळीशीच्या घरांत गेलेल्या जबाबदार माणसानें ही वागणूक ठेवावी ह्याचें त्याला सखेदाश्चर्य वाटत होतें. धोंडोपंतांच्या अंगीं कितपत दोष लावतां येईल ? वर्षांतून एकवेळ भेट देण्याच्या हेतूनें येणारे अधिकारी यांत तितकेच दोषी नाहींत का ? शिक्षणखातें बरोबर काम करीत आहे किंवा नाहीं याची तपासणी करण्यासाठीं नेमलेले अधिकारी आपलें काम कितपत जबाबदारीनें पार पाडीत होते ? कां तेही म्हणत असतील कीं मरेना कां तें शिक्षण, त्या शाळा अन् ते शिक्षक ! आपला पगार महिन्याच्या महिन्याला मिळतो आहेनं. मग नसत्या भानगडींत लक्ष घालून करायचं आहे काय ? विचारासरशी आबाच्या मनानें घेतलें कीं धोंडोपंताला आपण एकटा गाठला पाहिजे !– त्याच्या पोटांत शिरलं पाहिजे. त्याला बोलायला लावला पाहिजे. त्याशिवाय बऱ्याचशा गोष्टींचा उलगडा होणें शक्य नाहीं.



दुसऱ्याच दिवशीं सकाळीं आबा फिरायच्या निमित्तानें बाळासाहेबांच्या वाड्यांतून एकटाच बाहेर पडला आणि चौकशी करीत करीत धोंडोपंताच्या घरीं गेला. बाळासाहेबाच्या वाड्यांतला पुण्यांतला पाहुणा या नात्यानें धोंडोपंत सुरवातीस जरा बिचकतच बोलत होते. परंतु एकदां गाडी उताराला लागल्यावर सारी बंधनें आपोआप सुटतात त्याप्रमाणें ते बेलगामी भाषण करूं लागले. त्यातल्या त्यांत एका शाळकरी पोरानें नुकतीच भरून दिलेली चिलीम हातावेगळीं केल्यामुळें ते जास्तच अघळपघळ बोलण्याच्या मनःस्थितींत होते. धोंडोपंताची दोन तासांची दीर्घ मुलाखत गांजेच्या तारेंतच झाली परंतु खेड्यांतला मास्तर फारसें पुस्तकीज्ञान अवगत नसतांदेखील केवळ अनुभवाच्या जोरावर किती बोलूं शकतो याचें यथार्थ ज्ञान आबाला त्या दिवशीं मिळालें. माणसाची खरी कसोटी, त्याच्या बुद्धीच्या कार्यक्षेत्रांत अप्रतिहत संचार करूं शकते, तेथेंच लावणें न्यायाचें ठरतें. धोंडोपंत खेड्यांतला मास्तर आणि अधिकारीवर्ग ह्या विषयावर रंगून बोलत होते. अर्थात् बोलण्याचें धंदेवाईक कसब त्यांच्या अंगीं नसल्यामुळें तेल्याच्या घाण्याच्या जुंपलेल्या बैलाप्रमाणें मधूनमधून ते पुन्हां तोच तोच मुद्दा नव्य

अभिनिवेषानें उगाळीत होते तरी पण आबाला त्यांनीं आपल्या मनाचें हितगुज मोठ्या उदारपणानें ऐकवलें.

बहुतेक खेड्यांतला मास्तर निर्बुद्धच असतो. आणि मौज ही कीं आपल्या अकलेचा कांदा आंतून किती पोकळ आहे याची त्याला पूर्ण जाणीव असते. त्याची सारी धडपड इतरांना हें गुपित कळूं नये यासाठीं चाललेली असते. आजूबाजूच्या लोकांना आपल्या अगाध शास्त्राची चुणूक वेळीं अवेळीं दाखविण्याची त्याची तत्परता पाहून आपली खात्रीच होते कीं जें आपल्या जवळ नाहीं तें आहे असें दाखविण्यासाठीं हा पामर जिवाचा आटापिटा करीत आहे. आजपर्यंत जगांतल्या कोणत्या देशांतला शिक्षक आपल्या वरिष्ठांविषयीं आणि सहकाऱ्याविषयीं स्वच्छ मनानें बोलला असेल ? धोंडोपंत तरी या सर्वमान्य प्रकाराला अपवाद कां म्हणून ठरावे ? स्वतःविषयीं पोकळ बढाया हें जसें शिक्षकाच्या ठेवणीतलें पाशुपत अस्त्र आहे त्याचप्रमाणें वरिष्ठांना त्यांच्या गैरहजेरींत काल्पनिक अन्यायाच्या कल्पना उभ्या करून नाहीं नाहीं तें बोलून घेणें हें त्याचें तितकेंच प्रभावी शस्त्र आहे. एकच बाजू ऐकायला मिळाल्यामुळें आणि शिक्षकवर्गाविषयीं मेंटारांबद्दल वाटणारी सहानुभूति वाटत असल्यामुळें ऐकणाऱ्याला शिक्षकाची बाजू रास्त वाटते. परंतु हें मात्र निखालस सत्य आहे कीं शिक्षकपेशाचें पावित्र्य खुद्द शिक्षकानें स्वतःच्या मूर्खपणानें जितकें खालीं ओढलें असेल तितकें दुसरें कोणीहि ओढूं शकला नाहीं.

वळुजें गांवाला धोंडोपंत आज अठरा वर्षें नाना हिकमती करून चिकटले होते. आजवर असमाधानकारक काम या शेऱ्यामुळें त्यांना तीन चार वेळां बदलीचा हुकूम साताऱ्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें लिहून देखील ठेवला होता. धोंडोपंतानीं पाकिटांतून दहाच्या नोटा पाठवून तो हुकूम प्रत्येक वेळीं रहित करवून घेतला होता. साहेबांच्याकडे उत्तम नामांकित असे आंबे करंड्यांतून पाठविण्याचें त्याचें व्रत सोळा सोमवाराच्या व्रतांपेक्षांही जास्त कडक होतें. खोऱ्यांत पिकणारा आंबेमोहोर तांदूळ वरिष्ठांकडे धाड-ण्याचें सालोसाल कंत्राट धोंडोपंतांनीं उचललें होतें. काय गरज होती या लाचारीची त्यांना ? आधीं स्वतःच्या नेमून दिलेल्या कार्यांत कुचराई करणें अक्षम्य होतें. बरें, त्याबद्दल होणारा दंड म्हणून झालेली बदली त्यांनीं

विनातक्रार घ्यायला पाहिजे होती. आणि पुढील खेपेस कामाचा डोंगरा-एवढा उरक दाखवून पुन्हां पाहिजे तर वळुंजें गांव मागून घ्यायचा होता. परंतु हा राजरोस मार्ग त्यांना रुचला नाहीं. साहेबांपुढें लांगूलचलन करून स्वतःचें आसन स्थिर करून घेणें याच्यांतच त्यांच्या कोत्या बुद्धीनें विजयाचा आनंद मानून घेतला, आणि आळशीपणांतच पुरुषार्थ मानून स्वतःचें काम कधींही मन लावून केलें नाहीं. शाळादुरुस्तीसाठीं सालोसाल मिळणारी रक्कम कुठे गडप होई हें धोंडोपंताशिवाय दुसरा कोण सांगू शकणार? मास्तरचें जीवन अतिशय आकुंचित प्रमाणावर आधारलेलें असल्यामुळें मास्तर खाऊन खाऊन किती खाणार? बँकेचा कॅशिअर हजारों रुपयावर डल्ला मारून जन्माचें कल्याण साधण्याचा तरी साहसी प्रयत्न करून पाहील. मास्तर पोरांच्या पुस्तकाचें कमीशन खाऊन समाधानाची ढेकर देईल. दर आठवड्याकाठीं दोन आणे शेणाचे आणि शाळा सारव-ण्याचे चार पैसे असे एकंदर तब्बल बारा पैसे कडोसरीस लावताना सूर्य-लोक जिंकल्याचा आनंद धोंडोपंतांच्या मुद्रेवर झळकत असे. जानबा पाटील चिलमीचे दम मारायला शाळेंत येऊन बसले कीं त्यांच्या बटव्यांतील कापूस आणि गारगोटीवर मारायची पोलादी पट्टी यांवर त्यांचा डोळा तीनतीनदां आपुलकीच्या फाजील लाडानें फिरत असे.

धोंडोपंतानीं गेल्या अठरा वर्षांत एकाही पोराला चार अक्षरंसुद्धां शिकवलीं नव्हतीं. एखादा पोरगा फाजील उत्साहानें त्यांच्यापुढें पाटी घेऊन उभा राह्यलाच तर ते त्याला ऐसा सुनावीत कीं ज्याचें नांव तें. 'मोठा बृहपस्तीचा काकाच लागून गेलास कीं नाहीं? आतां शिकून मोठा मुंबईचा गव्हर्नर होणार कीं नाहीं तूं' असल्या उपरोधिक बोलण्यानें ते त्या कोवळ्या पोराच्या मनांत अंकुरलेली ज्ञानलालसा जागच्या जागीं नख लावून खुडून टाकीत. असल्या या विपरीत वागणुकीचा खुलासा ते सरळ शब्दांत द्यायला तयार असत. "अहो ही खेड्यांतलीं खेडवळ पोरं. फाडफाड वाचायला शिकवून हे पुढें काय भेंढ्यांना केसरी वाचून दाखवणार आहेत कां? आईबापांच्या नादा-मुळ चार दिवस इथ येऊन बसली म्हणजे मिळवली. लोक म्हणतात मी पोरांच्या कडून काम करवून घेतों, खरं आहे तें. पण तुम्हीच सांगा, गुरुची सेवा बजावल्याशिवाय सरस्वती जिभेवर उमटेल काय? जुन्या काळचे

गवई तर उस्तादानं तोंडातली तंबाकूची चूळ अंगावर थुंकली म्हणजे गुरु-कृपेचे प्रसादफळ म्हणून मानीत. खांसाहेबांचें हातपाय रगडल्याशिवाय अन् त्याचं तस्त धुतल्याशिवाय गळ्यांत ताणेची भिंगरी येईल का? सांदीपनीच्या घरीं त्याचीं वलकलं बडवलीं तेव्हां कृष्णजींना अक्कल आली अन् बाळपणीं गुरुची घरकामं केलीं होतीं म्हणून ते भगवत्गीता अर्जुनाला घडाघड म्हणून दाखवू शकले. अहो, लढाईच्या ऐन मोक्यावर इतका मोठा ग्रंथ तोंडपाठ म्हणून दाखवायचा म्हणजे काय चेष्टा आहेत, महाराज! तें कांहीं नाहीं, गुरुकृपा म्हणजे शेंड्यावरची गाभुळलेली चिंच आहे. असेल अंगांत हिंमत शेंड्यावर जाण्याची तर मिळेल, नाहीं तर बसा तसेंच आ करून——"

ही और माहिती आबानें शांतपणानें ऐकून घेतली. या अज्ञानाला पाहून हंसावं कीं रडावं हेंच त्याला उमगेना. आणि हा पढतमूर्ख कोवळ्या कोवळ्या अर्भकांना ज्ञानदान करणार! आणि हा सगळा मूर्खपणा गांवची मंडळी सहन तरी काय म्हणून करून घेत होती? धोंडोपंतानीं आपण होऊनच खुलासा केला——

"कांहीं फाजील शंकेखोर माणसं मधून मधून डोकं वर काढायला पाहातात. त्यांतल्या त्यांत आमचा वाणी माणकू शेट मोठा बेरकी आहे. तुम्ही त्याच्या बावळटपणाच्या ढोंगावर गेलात कीं त्यानं चार आण्याच्या चहाच्या भुकटी ऐवजी वाटची धूळ चारलीच म्हणून समजा. पुण्याला स्वारी मधून मधून फेरफटका मारून येते. शहरीं चवचालपणा नाहीं म्हटलं तरी थोडासा त्याला पाह्यला मिळतोच. अन् इथं येऊन मला गोष्टी सुनवायला पाहतो. पण मी त्याचं बारसं जेवून बसलों आहे. असा पालथा घातला दोनदां तीनदां कीं पुन्हां तोंड वर काढील तर नांव कशाला? त्याचा पोरगा शाळेंत येऊं लागला. चार पोरं साक्षीला उभी करून चोरीचा आळ त्याच्यावर घातला अन् मुद्देमालासहित बापापुढं उभा केला. घराण्याची अब्रू जाऊं नये म्हणून माणकू शेट झक्कत सरळ आला. तसा तो पाताळयंत्री आहे बरं का. एकदां मुलांची संख्या तिसाच्यावर गेली म्हणून परस्पर खटपट करून मला शह द्यायला एक आसिस्टंट माझ्या उरावर त्यान आणून उभा केला. वरकरणीं बहाणा मात्र हा कीं मला फार काम पडू नये. एक मिसरूड फुटलेलं

कालचं पोर पाहून मी डरतोय होय? ट्रेनिंग कॉलेजांतून दुसरं वर्ष देऊन त्याच वर्षी बाहेर पडलेलं तें अंड्यातलं पिल्लू एका वर्षांत मी दमछाकीला आणल. सुटींत तो पुण्याला पळाला तो पुन्हां तोंड दाखवायला म्हणून परत आला नाहीं."

सवतीमत्सराला दुसरा नंबर पत्करायला लावणारा हा मास्तर–मत्सर साऱ्या दुनियेला महशूर आहे. दुसऱ्या कोणत्याहि धंद्याची ही तऱ्हा नसते. दोन डॉक्टर संगनमत करून रोग्याला आपसांत लंबा करतील, दोन वकील एका टेबलावर दही मिसळ चिवडीत अशिलाला खड्यांत कसा लोटावा याचा एकमतानें खल करतील, दोन न्हावी गिऱ्हाईकाची पाण्याविना कामगिरी कशी चोख पार पाडावी याचा अपसांत विचार करतील पण दोन मास्तर एकमेकाला टांग मारून तोंडघशीं कसें पाडावें याचा विचार करीत रात्रीच्या रात्रीं अंथरुणावर तळमळत काढतील. शहरांत सुसंस्कृतपणाच्या ढोंगाआड कारवाया चालत असतील परंतु खेड्यांत या मारामाऱ्या शाळेंतल्या पोरासमोर झडत असतात. कोणत्याहि मास्तराला दुसऱ्या मास्तराचा उत्कर्ष सहन होऊं शकला तर निश्चित समजावें कीं यातला एकजण हाडाचा मास्तर नसला पाहिजे. चुकून दैवाचा फासा उलटा पडल्यामुळें मास्तरकीचा बिचाऱ्याला कलंक लागला असावा. धोंडोपंताप्रमाणेंच अनेक मास्तर आबाच्या पाहण्यांत आले होते. त्या मास्तरांना स्वतःच्या आत्मश्लाघेपुढें दुनिया तुच्छ वाटत असे. आजारीपणाच्या सबबीखालीं जास्तींत जास्त शाळेंत गैरहजेरी, कामाचा चुकारपणा झाकण्यासाटीं अनेक ढोंगाची भुलभलावणी आणि अरेरावीनें इतरांच्यापेक्षां मोठा आवाज काढून स्वतःचें म्हणणें खरें करून घेणें इत्यादि मार्गाचा अवलंब मास्तर लोक हरहमेशा करून घेतांना दिसतात. शहरांतल्या गुरुजींना जरा जपून पावलें टाकावीं लागतात कारण अधिकारी मागेच उभे असतात, व पालकवर्ग खर्च केलेल्या दीड दमडीचें शिक्षण आपल्या पाल्ल्याला आज मिळालें कीं नाहीं याची खातरजमा करून घेण्याच्या इराद्यानें शाळेच्या फाटकाबाहेर वाट पाहात उभा असतो. परंतु खेड्यांत मास्तराला दाही दिशा मोकळ्या असतात. त्याला जाब विचारणारा अधिकारीवर्ग त्याचा मित्र असतो आणि पालकवर्ग नांगराचा फाळ धरून दीड दोन मैल लांब शेतांत मरत असतो. असा हा

प्रकार अनेक खेड्यांतून वर्षानुवर्षे चालत आलेला आहे. तो बंद पाडण्याचा प्रयत्न मनापासून कोणी केला नाहीं आणि जो तसा प्रयत्न करील तो हराम ठरेल. आबाच्या डोक्यांत अनेक विचार गर्दी करून सोडीत होते. धोंडोपंत बोलतच होते—

"बरं काहो पुण्याचे पाहुणे—हो तुमचे आबासाहेब नांव नाहीं का? बरं का आबासाहेब, मला अजून तुमच्या शहरातली लफडीं उमगत नाहींत पहा! मागें दोन वर्षांपूर्वी मी पुण्याला गेलों होतों. तिथल्या मराठी ट्रेनिंग कालेजात सहज चक्कर मारून आलों. काय म्हणे हस्त कौशल्य, अन् पोरगा काय करतो तर मातीचा गणपती नाहींतर हत्ती करतो. मी म्हणतों त्यापेक्षां मला विचारा कीं. पोरांना मी हस्त कौशल्य शिकवलं आहे. मुलांना विड्या वळायला शिकवा, त्यांना पत्रावळी अन् द्रोण लावायला शिकवा, म्हशीचे गोठे साफ करायला लावा—कामांत काम अन् रामांत राम! मी म्हणतों, जीं कामं मुलांनी केल्यामुळें त्यांनाही शिकल्यासारखं वाटेल अन् बिचाऱ्या मास्तरलाही त्याचा फायदा मिळेल असलीं कामें पोरांना शिकवा कीं. म्हणे सहली पाहिजेत. पाहिजेतच. पण मास्तरांना त्याचा भुर्दंड कां? एकाद्या पोराच्या शेतांत सुगीच्या दिवसांत मी रोज हुर्डा खायला जायला नाहीं म्हणेन कीं काय! पोरांना चित्रं दाखवून शिकवा म्हणे! मी म्हणतों, कशाला रे बाबानों चित्रं? दोन थोतरींत दिल्या कीं पोराच्या डोळ्यापुढं सारीं नक्षत्रं कशीं लख्ख उभी राहत असतांना नकाशे पाहिजेत कशाला? त्यापेक्षां हा खर्च मास्तरांच्या पोरांना दूध पाजण्यासाठीं द्या कीं म्हणावं. बरंका आबासाहेब, मी साताऱ्याला सुरवातीला मुनशीबाटलीच्या शाळेंत लागलों. स्कूल बोर्डाचा नियम काय तर म्हणे मास्तरानीं शिकवण्या करायच्या नाहींत. डॉक्टरांनी इंजेक्शनं देऊन पैसे काढलेले चालतात वाटत! तारखावर तारखा पुढें ढकलून अशिलाची मुंडी वकिलानं मुरगळली तर शाहणपणा ठरतो अन् मास्तरानं मात्र शाळेंत मरावं अन् आपली हाडं पोरांना अन् त्यांच्या आईबापांना खेळायला वाटून टाकावींत वाटतं. काय न्याय आहे पहा!"

आपण कांहींतरी प्रोत्साहन द्यावें म्हणून धोंडोपंत मधेंच थांबलेले पाहतांच आबा म्हणाला — "त्यांची कल्पना ही कीं घरीं शिकवण्या केल्यावर

शाळेंत शिकवायला मास्तरांच्या अंगांत तितकासा त्राण उरणार नाहीं."
धोंडोपंत थोडावेळ नाकासमोर पाहात स्तब्ध होतें. नंतर अंगांत संचारल्या-
सारखे कळवळून ते ओरडले—

" अन् समजा, नाहीं मास्तरनं शाळेंत शिकवलं म्हणून काय मागचा
डोंगर हवेंतून उडत जाऊन पुढें येऊन उभा राहणार आहे? या शिक्ष-
णाच्या गप्पा कोणी माराव्यात? माझ्या समोर आणा एकेकाला. हडसून
खडसून विचारीन कीं बाबारे, मास्तरानं मुलांना घरीं काय किंवा शाळेंत
काय कुठें कांहींच शिकवलं नाहीं म्हणून वयाच्या सोळाव्या वर्षी त्या पोराच्या
ओठावर मिसरूड फुटायची थांबणार आहे कां? माझं तर ठरून गेलेलं
आहे. पोरं शिकवा अगर न शिकवा, पास व्हायचीं तेवढी होणार अन्
नापास व्हायची तेवढी होणारच. अहो, त्यांना पास नापास करणारे तरी
आपणच नं. झालं तर, जो पोरगा आपल्या मर्जीनं वागतो तो नापास
होईल म्हणजे काय बिशाद आहे! तुम्ही कोणतीही परीक्षा घेणारा आणा
कीं. हजार युक्त्या आहेत, राजा! मात्र डोकं पाहिजे मास्तरला."

" तुम्ही सातान्यांत होतां तेव्हां काय झालं तें नाहीं सांगितलंत!"
आबा मधेंच म्हणाला.

" हो! तें सांगायचं राहिलंच कीं. तिथं असं होई कीं शिकवणारे
आम्ही अन् परीक्षा घ्यायची हेड मास्तरांनी. मी मोठ्या हिकमतीनं
छापील प्रश्नाचा कागद आधीं पाहून ठेवायचा अन् शिकवणीच्या पोरांना
आदल्या दिवशीं संथा देऊन मोकळा व्हायचा. पोरगा नापास झाला असता
तर जानवं तोडून दिलं असतं. अहो, ह्या गोष्टी करायलाच पाहिजेत. असं
पहा—लोकांकडून रुपाया दोन रुपये महिना वाजवून घ्यायचे तर अन्नाला
जागायला नको? अगदींच एकाद्याचं हरामाचं खाणं आपल्या तरी बुवा
पसंत नाहीं. घरीं पेपराचे सुटे कागद लिहून घ्यायचे अन् दुसऱ्या दिवशीं
परीक्षेच्यावेळीं पेपराला टाचून ठेवायला बजावलं कीं झालं काम. दाम करी
काम, आमचा हा खाक्या आहे. पोरगा शिकवणीला आला कीं पास
झालाच पाहिजे. नाहीं आला कीं नापास झाल्याशिवाय दुसरी गतच नाहीं."

" वाः! अन्यायानं एकाद्या बिनशिकणीच्या मुलाला नापास केलंत तर
पालक ओरडल्यावाचून राहील कां?" आबा आश्चर्यानें म्हणाला.

" कसला आला आहे अन्याय ? पेपर गोळा करतांना मधलीं दोन पानं फाडून ठेवलीं तर कुणाच्या काकाला पत्ता लागणार आहे ? पेपर पहा. सगळया प्रश्नांचीं उत्तरं नाहींत तर परीक्षक काय कपाळ फोडणार पोराच्या पुढें ? " धोंडोपंत अभिमानानें मान डोलवीत म्हणाले.

" पण या गोष्टींचा गवगवा झाल्याशिवाय कसा राहील ? ही तुमची करामत कुणाच्याही लक्षात आली नाहीं ? " आबानें चकित होऊन प्रश्न केला.

" काय होणार ? आलं लक्षात. बडतर्फ झालों. वशिला लावून लोकल बोर्डाच्या नोकरींत रुजू झालों. मास्तरचं नुकसान व्हायला मास्तर जवळ असतंच काय मुळी ? आजवर कैक दिपोटी अन् ऑफिसर या पठ्ठयानं पचवले आहेत. आतां घाबरतो होय ? एक लक्षांत ठेवलं पाहिजे. एक लक्ष रुपये मिळण्याचा नवस फिटायला देवालासुद्धां एक पैशाची लांच पुरते तिथं हीं माणसं मागून मागून काय मागणार हो ? काय उठलांतसे ? बसानं. चहा तर घ्या आमच्या गरिबाच्या झोपडींतला. मारत्या, माणकूशेटकडून साखऱ्या—" परंतु धोंडोपंताचा आग्रह मोठ्या शिताफीनें आबानें टाळला. ऐकलेला इतिहास इतका उद्वेगजनक त्याला वाटला की यावर चहाचें पाणी पोटांत गेलें कीं नक्की पोटांत ढवळेल या भीतीनें त्यानें घाईघाईनें धोंडोपंतांची रजा घेतली.

जगांत काय घडामोडी या घटकेला घडून येत आहेत, केवढा मोठा प्रश्न विश्वाला ग्रासून टाकण्यासाठीं पुढें पुढें येत आहे आणि आमच्या या हतभागी देशांतील खेड्याचा मास्तर कसल्या फुसक्या अभिमानाच्या गोष्टी बोलून दाखविण्यांत दंग आहे हें पाहून आबाला फार वाईट वाटलें. पुढारलेल्या देशांतून शिक्षणशास्त्र किती तोलूनमापून पोरांना पुरवण्यांत येत आहे, आणि आमच्या देशांत कोण ही उपासमार चालू आहे हें चित्र त्याच्या डोळ्यापुढून जातां जाईना. सोळा सोळा वर्षांच्या पोरांना दुसऱ्या देशांतून देशासाटीं आत्मबलिदान करण्याचा महामंत्र गुरुमुखांतून प्रत्यही ऐकायला मिळत आहे आणि आमच्याकडे पोरांना विड्या वळण्याचें कार्य गुरुजी सांगत आहेत. आपल्या खेड्यांतील मुलगा देशांत चाललेल्या घडामोडीविषयीं पूर्णपणें अंधारांत असतो याचें कारण म्हणजे धोंडोपंत आणि

त्यांचे सहकारी. मानसशास्त्राचा शिक्षणांत पुरेपूर उपयोग करून घेण्यासाठीं इतर देशांतील विद्वान मंडळी रात्रंदिवस विचार करीत आहेत आणि आमच्याकडे पोरांचीं मनें कशीं मारून टाकतां येतील ह्याचे प्रयोग चालू आहेत. खेड्यांतील जनता अडाणी म्हणून आपण त्यांना हसतो आणि त्यांना अडाणी ठेवायला कारण कोण याचा मुळींच विचार करीत नाहीं.

ही स्थिति पालटलीच पाहिजे. ती पालटल्याशिवाय देशांत एकसूत्रीपणा येणें शक्य नाहीं. आणि एकसूत्रीपणा आल्याशिवाय कोणतीच राजकीय चळवळ प्रभावी होण्याची आशाच करायला नको. केव्हांना केव्हां तरी परकीय सत्तेला तोंड द्यावें लागणार हें निश्चित. त्यासाठीं लोकांचीं मनें तयार व्हायला नकोत कां? पण ही सध्यांची आंधळ्यानें दळण्याची स्थिति पालटणें सोपें नाहीं हें आबा जाणून होता. कोणत्याहि देवस्थानचे वहिवाटदार कोणत्याहि नवीन सुधारणेला कसून विरोध करतात हे त्याला माहीत होते. धोंडोपंत आणि त्यांचे सखे आपल्याला विरोध करतील हे ठरलेलेंच होतें. पुढचं मांडून ठेवलेलें आयतें अन्न हिसकावून घेतलेलें कोण बुभुक्षित उघड्या डोळ्यानें पाहून स्वस्थ बसेल? तरी पण प्रयत्न केलाच पाहिजे. वाटेल तेवढा विरोध झाला तरी गेंड्याचीं कांतडीं पांघरून पुढें झालें पाहिजे.

--दोन दिवसांनीं बाळासाहेबांनीं कबूल केल्याप्रमाणें गांवचीं चार मंडळी आपल्या बागेंतलें आबे खाण्यासाठीं म्हणून बोलावून घेतलीं. अर्थात् धोंडोपंत आलेच होते. सर्व मंडळी एका विस्तीर्ण आंब्याच्या झाडाखालीं अंथरलेल्या सतरंजीवर बसलीं होतीं. आंब्याच्या फोडी ताटांत भरून ठेवण्याचें कार्य अरुणेनें स्वतःकडे घेतलें होतें. तिला फळें निवडून देण्याचें कार्य बाळासाहेब मोठ्या कसोशीनें उरकीत होते. माणकूशेट धोंडोपंतांना आग्रह करीत होते आणि धोंडोपंत माणकूशेटच्यापुढें ताटावर ताटें सारीत होते. माणकूशेट मोठ्या मिस्किलपणानं धोंडोपंताच्याकडे अधूनमधून बारीक नजरेनें पाहात स्वःतशींच हंसत होता. बाळासाहेबांनी त्याला भावाच्या जागेविषयीं सकाळींच विचारलें होतें. धोंडोपंताविषयीं आजवर मनांत सांठवून ठेवलेला तिरस्कार आज फळाला येणार या विचारानेंच कीं काय माणकूशेट जास्तच छद्मीपणानें धोंडोपंताची विचापूस मोठ्या अगत्यानें करीत होता. गांवचे

पाटील, कुलकर्णी बाळासाहेबांच्या औदार्याची खोटी स्तुति आपसांत शर्यत लावून करीत असावेत असें दिसत होतें. आंब्यांचा एक ढीग संपल्यावर बाळासाहेबांनीं हलकेंच मंडळींचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें व मोजक्या शब्दांत अगदीं तिऱ्हाईत या नात्यानें त्यांनीं आपल्या मनोगताची मंडळींना ओळख करून दिली. समारोपादाखल ते म्हणाले, "आपल्या इथं लोकल-बोर्डाची शाळा आहे, ह्याची आबासाहेबांना जाणीव आहेच. नवीन शाळा काढावयाची म्हणजे जुन्या शाळेचे वासे उपसायचें नाहींत हें त्यांना मी समजावून दिलं आहे. त्यांनीं मला वचन दिलं आहे कीं जुन्या शाळेंतले बावीस का तेवीस विद्यार्थी ते आपल्या शाळेंत घेणार नाहींत. तीं मुलं सोडून बाकीचीं मुलं येतील तशीं घेण्याचा त्यांचा इरादा आहे. मी म्हणतों, आपण गांवच्या लोकांनीं त्यांना मदत करावी हें आपल्या हिताचं आहे. जुन्या शाळेचे नुकसान न होतां नवीन प्रयत्न होणार असेल तर आपल्याला सर्वांना आनंदच होणार आहे. माणकूशेटजींनी कृपावंत होऊन नवीन शाळे-साठीं आपल्या बंधूंची अर्धवट बांधलेली जागा द्यायचं सकाळींच मान्य केलं आहे——"

धोंडोपंतांनीं चमकून आबाकडे पाहिलें. त्याच्या डोक्यांत विजेच्या वेगानें विचार येऊन गेला कीं, हा पुण्याचा पाहुणा दोन दिवसांपूर्वी आपल्याशीं गप्पा मारायला आला होता, तो याच हेतूनें कीं काय? आणि आपण तर आपल्या धंद्यांतलीं सगळीं वर्मे याच्याजवळ बोलून चुकलों. आपल्या या गलतीचा हा पुरेपूर फायदा घेतल्याशिवाय सोडील? शक्यच नाहीं. आणि या संकटां-तून आपल्याला कोण बाहेर काढणार?

जमलेल्या मंडळींनीं आबाच्या प्रयत्नांची भरपूर स्तुति केली. लागेल ती अंगमेहेनत पुरवायला तयार असल्याची प्रत्येकानें कबूली दिली. आबाला कोण धन्यता वाटली! आपल्या कार्याची सुरवात इतक्या यशस्वीपणानें करून देणाऱ्या अरुणेकडे त्यानें कृतज्ञभावानें पाहिलें. थोड्या वेळानें सर्वजण आपआपल्या वाटेनें निघून गेले. मात्र धोंडोपंतांनीं एकवार स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटल्यासारखें करीत आबाकडे पाहून हसत हंसत मान हालवली! धोंडोपंत जागे झाल्याचें आबानें ओळखलें. खेड्यांतील शाळा-मास्तर जागृत झाला होता!

## —१—

आबाचा पहिला विद्यार्थी झिंग्या. जन्माचे वेळीं बाप झिंगून पडला होता तो मरतां मरतां वाचला म्हणून हें सकृतदर्शनीं विचित्र वाटणारें नांव पोराला मिळालें. बारा वर्षांची उमर मुलाची, परंतु वयाच्या मानानें व खेडेगांवच्या मानानें मेंदू तल्लख. आणि सगळा मेंदू चोरीच्या कामाला वाहिलेला. समजायला लागल्यापासून झिंग्या बापाच्या हाताखालीं चोरीचें शिक्षण घेऊं लागला. आई जिवंत होती तोंपर्यंत त्याला जरा बिचकल्यासारखें वाटत होतें. आईबाप दोघेही पट्टीचे चोर होते. परंतु आईला कां कुणास ठाऊक पोरगा आपल्यासारखा निघूं नये म्हणून फार वाटत असे. तिनें झिंग्याला आपण होऊन कोणत्याही कामगिरीवर धाडलें नाहीं आणि नवरा जर धाडूं लागला तर ती त्याच्या हातचा मरेमरेतों मार खाई पण पोराला जाऊं देत नसे. त्यामुळें झिंग्याला बापाबरोबर रात्रीं अपरात्रीं रानावनांतून हिंडण्याची आवड फार असूनसुद्धां आईच्या धाका-मुळें फारसें बेतालपणें वागतां आलें नाहीं. आईचा धरबंद सुटल्यावर झिंग्या बापाचा उजवा हात बनला. बापाच्या सांगीप्रमाणें सरकारी जंगलांत जाऊन सर्पण चोरून आणणें, आजूबाजूच्या खेड्यातून कुणाची कोंबडी, तर कुणाचें करडूं पोटाशीं धरून लंबे करणें, तालुक्याच्या गावीं आठवड्याच्या

बाजारांत जाऊन तेथून गर्दीत लोकांचे पैसे हातोहात पळवणें इत्यादि गोष्टी त्याला अत्यंत मामुली स्वरूपाच्या वाटत असत. बापाचें उदाहरण डोळ्या-पुढें ठेवून त्यानें आपल्या मनाशीं ठरवून ठेवलें होतें कीं आपण मोठे झाल्यावर साऱ्या साताऱ्याच्या हद्दींत धुमाकूळ घालूं. मोठमोठ्या श्रीमंत शेठसावकारांचीं घरें फोडण्याची महत्त्वाकांक्षा त्यानें कैकवेळां आपल्या बापाजवळ अभिमानानें बोलून दाखवली होती. आणि पोरगा घराण्याचें नांव उजळ करणार या समाधानानें बापानें प्रत्येक वेळां त्याचें कौतुकच केलें होतें. सक्रिय कौतुक म्हणून बापानें पोराला बारीकसारीक घरफोडीसाठीं चार वेळां आपला हस्तक म्हणून नेलेही होते. सातारा जिल्ह्यांत 'झिंग्या' हें नांव इतिहासांत अजरामर होण्याची बापाला स्वप्नें पडत होतीं आणि कदाचित् चार दोन वाटमाऱ्यानंतर अधिकाऱ्यांच्या हातीं सापडून झिंग्या तुरुंगाची वाट चालूं लागला नसता तर बापाचीं आजचीं स्वप्नें उद्याच्या सत्यकथा ठरल्या असत्या. गेल्या बेचाळीस पिढ्यांचें ऋण आपल्या कर्तब-गारीनें झिंग्यानें फेडून टाकलें असतें परंतु विधिलिखित निराळें होतें !

ज्या दिवशीं आबा आपला आश्रम सुरू करणार होता त्याच्या आदल्या दिवशींची रात्रीची गोष्ट. मध्यरात्र होईतोंपर्यंत पुढील कार्यक्रमाची चर्चा करीत वाड्याच्या मागच्या बाजूला उघड्या मैदानांत आबा आणि बाळासाहेब बसले होते. अरुणा आणि वेणू दोघीजणी आंत झोपल्या होत्या. आबा आपलीं मनोराज्यें इनामदारांना मोठ्या उत्साहानें सविस्तर सांगत होता. आणि खरं सांगायचं तर इनामदारांना झोप आली होती. बाळा-साहेब बराच वेळ आबाचें बोलणें ऐकून घेत होते. मधून मधून जागृता-वस्थेची खातरजमा करून देण्याच्या इराद्यानें एकादा फालतू प्रश्न विचारल्यासारखा करीत आणि नतर आबा उत्साहानें बोलूं लागला कीं डोळे मिटून तक्क्याला डोकें टेकवीत. ध्येयाचा निदध्यास लागल्यामुळें आबा आपल्या भापणांत रंगून गेला होता. परंतु बाळासाहेब किती झालं तरी कडेचे पोहोणारे. आबाच्या म्हणण्याप्रमाणें त्याची सारी व्यवस्था लावून दिली आतां उद्यां सकाळीं फक्त आपला ठेवणींतला रेशमी कोट अंगांत घालून नारळ फोडायचा म्हणजे आपली कामगिरी संपली ह्या विचारानें ते शांतचित्तानें डोळे मिटून घेत होते.

मधेंच एकाएकी ते ताठ उठून बसले. एकदम असे दचकल्यासारखे करून इनामदार उठून बसलेले पाहताच आबा आपला मुद्दा तसाच लोंबकळत ठेवून आश्चर्यानें त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागला. रात्र अंधारी असल्यामुळें त्याला त्यांचें तोंड स्पष्ट दिसणें शक्य नव्हतें. परंतु बाळासाहेब पुन्हां तक्क्याला टेकून आडवे झाले. मुंगी वगैरे त्यांना चावल्याची आबाला शंका आली. परंतु त्यानंतर पांचच मिनिटांनीं पुन्हां बाळासाहेब पूर्ववत उठून बसले. तेव्हां तो आश्चर्यानें म्हणाला, "काय झालं! कांहीं चावलं तर नाहीं नं—"

'थांबा हं—' म्हणून नाकावर बोट ठेवून बाळासाहेब चोर पावलानें बागेंत शिरल्याचें पाहून तर तो जास्तच घोटाळ्यांत पडला. बाळासाहेब कां निघून गेले असावे याची त्याला कल्पना येईना. अंधारांत एकटेच ते पुढें गेले आहेत तेव्हां घरांतला दिवा घेऊन आपण त्यांच्या पाठोपाठ जावें कीं काय ह्या विचारांत तो पडला. परंतु तसें करणें त्याला प्रशस्त वाटेना. कारण तसाच प्रसंग असतां तर इनामदारांनीं त्याला आपण होऊन बरोबर नेलें असतें. काय करावें हा विचार करीत आबा जाग्यावरच खिळून बसला. पांच मिनिटें गेलीं, दहा गेलीं. तरी बागेच्या बाजूनें कसलीही हालचाल किंवा आवाज त्याच्या कानावर पडला नाहीं तेव्हां मनाशीं कांहींतरी निश्चय करून आबा घरातला दिवा आणण्यासाठीं आंत जाणार तोंच एक किंकाळी त्याच्या कानावर आली. आवाजावरून त्यानें ओळखलें कीं एकाद्या पोराचा हा आवाज असावा. थोड्याच वेळांत तो दिवा घेऊन बागेच्या दिशेनें चालूं लागला. परंतु फार श्रम त्याला घ्यावे लागले नाहींत. अंधारांतून बाळासाहेब कुणाची तरी मान पकडून त्याच्याच दिशेनें येत असलेले त्याला दिसले. दिव्याच्या उजेडांत आबानें पाहिले तों त्याला दिसलें कीं एक पोरगा बाळासाहेबांनी धरून आणलेला होता. सरासरी दहा बारा वर्षांचा तो मुलगा असावा. अजूनसुद्धां पकडणाराच्या हातातून सुटका करून घेण्यासाठीं त्या पोराची धडपड चालूं होती. परंतु दोन्ही हात दाव्यानें पाठीमागच्या बाजूस बांधलेले असल्यामुळें त्याला हातांचा कांहींच उपयोग होत नव्हता. बाळासाहेबांची मानेची पकड त्यांच्या वयाच्या मानानें तरुणालाही लाजेनें खालीं मान घालायला लावण्याइतकी घट्ट होती. बाळासाहेबांनीं त्या पोराला खालीं पाडला आणि शेजारींच पडलेल्या दुसऱ्या

एका दाव्यानें त्याचे पायही बळकट बांधून टाकले. आतां मात्र दिव्याच्या प्रकाशांत त्या दोघांच्याकडे पडल्यापडल्या कुर्यानें पहाण्यापलीकडे तो पोरगा कांहींच करूं शकला नाहीं.

" हा झिंग्या शेवटीं सांपडला. इतके दिवस धरीन धरीन म्हणून म्हणत होतों तो आज अचानक सांपडला. " बाळासाहेब पुन्हां तक्क्याला टेकून बसले, आणि आपल्या आत्तांच्या चमत्कारिकपणानें निघून जाण्याचें आबाला आश्चर्य वाटत असेल याची जाणीव होऊन ते एकवार स्वतःशींच मोठ्यानें हंसून म्हणाले, " पहा, गुलाम टवकारून कसा बघतो आहे तें. याला धरण्यासाठीं आबासाहेब, गेलीं दोन वर्षे मी टपून होतों पण आज त्याचीं भरायचीं होतीं. तुम्हीं कांहीं तरी मला सांगत होतां तेव्हां मी अंमळ डुलकी घेत होतों. पानांची सळसळ ऐकल्याबरोबर मी उठून बसलों. तुम्ही शहरचे लोक याबाबतींत काहीं कामाचे नाहींत. पावलांचे आवाज आमच्या कानावर कसे नेमके येतात. कुणीतरी झाडावर चढल्याचा मला संशय आला. दुसऱ्यांदां जेव्हा तसलाच आवाज झाला तेव्हां माझी खात्री झाली. मुकाट्यानं अंधारात पाय न वाजवता झाडाजवळ जाऊन उभा राहिलों अन् स्वारी खाली येतांच प्रथम गपकन् मानगूट पकडली. झिंग्या काय बेत होता तुझा ? "

झिंग्यानें कांहींच उत्तर केलें नाहीं. आबाला हा खुलासा पुरा वाटेना म्हणून तो म्हणाला, " पण हा मुलगा आहे तरी कुणाचा ? "

" एका चोर बापाचा ! आज हा जसा सांपडला तसा एके दिवशीं याचा बाप सांपडला नाहींतर मला विचारा. अन् एकदां का याचा बाप सांपडला कीं येरवडाच दाखवतों त्याला. बाप चोऱ्या करतो अन् त्याचा पोरगा कित्ता गिरवतों. लाख वेळां या पोराला मी ताकीद देऊन पिटाळला आहे. आतां या खेपेला मात्र त्याला चावडीच दाखवतों "

" पण हें पोरगं एकटं रात्रींच चोरायला तरी काय आलं होतं ? अन् बागेंत झाडावर बसून काय करीत होता हा ? " आबा झिंग्याकडे पाहून म्हणाला.

" झाडावर बसून पाडाचे आंबे तोडीत होता अन् दुसरं काय मिळणार त्याला झाडावर ? त्या धोंडोपंताच्या शाळेंतलीं तीं पोरं अन् हा चोरटा

यांनीं मिळून माझी झाडंच्या झाडं निपटून काढलीं होतीं गेल्या वर्षी. झिंगोबा, आतां आंबे खायला उद्यां सकाळीं पाटलाच्या चावडीवर. आबा-साहेब, याला तुम्ही पायाकडनं धरा, मी त्याचं डोकं उचलतों. तुम्हाला तो चावल्याशिवाय सोडायचा नाहीं म्हणून तुम्हांला त्याचे पाय धरावे लागतील. अडगळीच्या खोलींत रात्रभर हवा खात पडूं द्या लेकाला—"

झिंग्याला खोलींत टाकण्यांत आलें व थोड्या वेळानें झोपण्यासाठीं बाळासाहेब माडीवर निघून गेले. आबानें झिंग्या ज्या खोलींत टाकला होता त्या खोलीला बाहेरून कडी लावून घेतली व पडवींत टाकलेल्या स्वतःच्या पथारीकडे प्रयाण केलं. बाहेरच्या बाजूस दोन्हीही नोकर डाराडूर झोपलेले दिसले. हातांतला दिवा बारीक करून वेणू आंतल्या बाजूस झोपली होती तिच्या उशाशी त्यानें ठेवून दिला व तो आपल्या जागेवर येऊन पडला.

पण त्याला झोप येईना! आजूबाजूस चाललेले घोरण्याचे आवाज एरव्ही त्याला बेचैन करूं शकले नसते. समोरच्या पिंपळावर टांगून घेत-लेल्या पक्षांची त्याला एरव्ही चिंता करण्याचें कारण नव्हतें परंतु आतां त्याला प्रत्येक आवाज जास्तच जागा ठेवूं पाहात होता. पिंपळपानांची साधी सळसळ सुद्धां त्याला वादळासारखी वाटूं लागली. आंतल्या बाजूनें वेणूनें झोपेंत 'आऽईऽगं' म्हणून काढलेला कण्हण्याचा आवाज त्याला किंकाळीसारखा भासला. माडीवरच्या घड्याळानें दिलेला एक ठोका त्याला पडघमच्या आवाजा सारखा वाटला. झोंपी जाण्याची जों जों करून मेहनत करावी तों तों त्याचे डोळे जास्तच विस्फारित होऊं लागले. मागच्या खोलींत कोंडलेला पोरगा त्याच्या दृष्टीसमोरून जाईना. एवढासा पोरगा मध्यरात्रीं झाडावर चढून आंबे चोरतो हा प्रकार त्याला अघटित वाटला. दुपारी तिपारीं एकाद्या पोरानें दगड मारून कैरी पाडली तर त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नसतें. लहान मुलांचा तो जन्मसिद्ध हक्कच आहे. आंब्याच्या झाडाला कितीही राखणदार ठेवले तरी पुरे पडत नाहींत हा त्याचा अनुभव होता. मोठ्यामाणसांपेक्षां कैरीचा आंबट षोक मुलांना जास्त असावा हें नैसर्गिक आहे. परंतु रात्रीं अपरात्रीं हें साहस करणारा मुलगा आबाला मोठा अजब वाटला. विचारासरशीं आबा अंथरुणावर उठून बसला. बाळासाहेब झोपीं

गेले असतील. घरांतील सारीं माणसें झोपलेलीं होतीं. काय हरकत आहे? दोन प्रश्न त्या मुलाला विचारण्यांत आपण वावगें काय करीत आहोंत?

झिंग्या अजून जागाच होता. हातपाय बांधून टाकल्यामुळें त्याचें अंग ताटकळल्यासारखें झालें असावें. मुलाचे हात तरी मोकळे करावेत हा विचार आबानें मोठ्या कष्टानें दाबून टाकला. बाळासाहेबांनी इतक्या शिकस्तीनें पकडलेला चोर जर आपल्या दातृत्वामुळें सुटून पळाला तर तें बरें दिसणार नाहीं म्हणून आबानें दुरूनच म्हटलें, " कायरे झोप येत नाहीं का? रात्रीं-च्यावेळीं घरीं निवांतपणं झोपायचं सोडून ही चोरी करण्याची अवदसा तुला कां आठवली?"

कनवाळूपणानें विचारलेला प्रश्न ऐकून झिंग्या डोळे ताठ करून आबा-कडे पाहूं लागला. मात्र तोंडांतून एक अक्षर न काढण्याचा त्याचा निश्चय ढळला नाहीं.

" थांब, तुला नीट निजवतों. चावणार नाहींस नं?" आबा त्याला त्यांतल्या त्यांत बरें वाटावें म्हणून कुशीवर ठेवून म्हणाला, आणि मौज ही कीं झिंग्या त्याच्या पायावर डोकें ठेवून ओक्साबोक्सी रडूं लागला. हा पेंच मात्र आबाला बिनतोड होता. मागचा पुढचा विचार न करतां आबानें त्याचे हात प्रथम मोकळे केले, व नंतर पायाची दोरी सोडून टाकली. आश्चर्य हें कीं झिंग्या पळून जाण्याची मुळींच धडपड करीना. आबानें झिंग्याची पश्चात्तप्तअवस्था झटकन ओळखली.

"बरं—बरं रडू नकोस. आतां उद्यां सकाळीं बाळासाहेबांचे पाय धर. मी त्यांना सांगून पाहीन. हें पोतं घे निजायला."

आबानें पाहिजे होतीं त्या प्रश्नांचीं उत्तरें त्या मुलांकडून काढून घेतली. दाराला बाहेरून कडी लावली आणि हलक्या पावलानें व स्वस्थ मनानें आपली पथारी गांठली.

सकाळीं झिंग्या प्रकरण वाड्यांतल्या सगळ्या लोकांच्या कुतुहलाचा विषय होऊन बसलें. आबानें झिंग्याला बाळासाहेबांच्या पायावर घातला व आपल्या साठीं तरी निदान या पोराला एकवार सोडून द्यावें अशी सविनय विनंती केली. झिंग्यानें दीनवाणीनें बाळासाहेबांची करुणा भाकली.

" आबासाहेब, तुम्ही या पोराला आज पाहतां आहां, मी त्याला त्याच्या

जन्मापासून पाहात आलों आहे. त्याची आई आमच्या इथल्या घिसाड्याची पोरगी. पूर्वी ज्या वेळीं मोटारी नव्हत्या त्यावेळीं आमच्या गांवाला फार महत्त्व होतं. वाटेंत निसटलेल्या लोखंडी धावा बसवायला त्या घिसाड्याकडे सगळे लोक धावत येत असत. त्या घिसाड्याची ही पोरगी. तीहि एक नंबरची चोरटी. हें सगळं चोराचं घराणं आहे. तुम्ही याच्यावर विनाकारण दया करायला मला सांगता आहां."

"नाना, आपण आबांना कां दुखवतां? त्यांची शाळा आज तुमच्या हस्तें उघडायची आहे. निदान आज तरी त्यांच्या विनंतीला तुम्हीं मान द्यावा असं नाहीं तुम्हांला वाटत?" बाळासाहेबांच्या पाठीशीं होन्ही हात टेकवून अरुणा किंचित् लाडिकपणानं म्हणाली. बाळासाहेबांनी मुलीकडे पाहून हंसत म्हटलें, "तुझीं दोन पातळं याच्याच आईनं पळवलेली माहीत असून तूंही याला सोडून द्यायची भाषा काढतेस? बरं, जाऊं द्या. तुम्हीं सर्वांनीच जर ठरवलं असेल तर म्हातारपणीं या सापाला मोकळा सोडण्याचं हें पापकृत्य मी करण्याचं ठरवतों. पण झिंग्या, आज सोडलं म्हणून जर कां पुन्हां माझ्या झाडावर चढलास तर लक्षांत ठेव तंगडी तोडून हातांत देईन. आतां कायदा वगैरे कांहीं पाहणार नाहीं."

"बाळासाहेब, तुम्हीं झिंग्याला सोडण्याचं पुण्य कर्म करणार आहांतच तर आणखी एक पुण्य तुमच्या पदरांत मी बळजबरीनें बांधणार आहे." आबा स्वतःशीच हंसून म्हणाला. थोड्या वेळानें आबानें समोर आणून ठेवलेल्या एका गाठोड्याकडे पाहून बाळासाहेब आश्चर्यानें म्हणाले, "म्हणजे हे आंबे मी याला दान करूं? अरे आपण कुठल्या युगांत वावरतों आहोंत? चोराला शिक्षा काय तर त्याला सोडून द्यायचा अन् घरची पोरगी त्याला वर दान करायची हा मामला धर्मराजाच्या युगांत तरी असेल कीं नाहीं कुणास ठाऊक. छट्! माझ्या आंब्याला हात तर लावूं दे हा पोरगा म्हणजे तोच हात तोडून टाकतों कीं नाहीं पहा—"

"त्याचं असं आहे नाना, आम्ही झिंग्याशीं मघाशीं थोडावेळ बोलत होतों. झिंग्यानं चोरी केली खरी परंतु चोरी करण्याची त्याला इच्छाच कां झाली हें नको का पाह्यला आधीं? आपल्या बापासाठीं तो बिचारा चार आंबे तोडून नेत होता. थांबा, मी काय म्हणतें तें आधीं नीट ऐका.

बापासाठीं त्यानें हें साहस केलें. स्वतःच्या सुखासाठीं हें पापकर्म करायला तो आला नव्हता. कायरे झिंग्या, बरोबर आहे नं माझं म्हणणं? मी तर म्हणतें नाना, मी सुद्धां संधी मिळाली तर माझ्या वडिलांसाठीं चौदा चौकड्यांचं राज्य चोरून आणायला धांवत जाईन." अरुणा अभिमानानें मान तुकवून म्हणाली.

"पण चोरी करणं हें काय ठीक झालं वाटतं? सरळ मागितले असते तर मी काय नाहीं म्हणालों असतों?" बाळासाहेब म्हणाले.

"मग आतां आम्हीं सरळ मागतों आहोंत तर नाहीं कां म्हणतां?" अरुणेनें आपल्याला शब्दांत पकडलेलें पाहून बाळासाहेब मोठमोठ्यानें हंसूं लागले.

"उत्तम! म्हणजे मग आमचे हल्लीचे धोंडोपंत मास्तर काय वाईट आहेत हो? ते चोरी करायला मुलांना उत्तेजन देतच असतात. आतां तुम्ही चोरांना सोडून द्यायची भाषा काढतां आहांत. आबासाहेब, रागवूं नका—पण अशानं तुमची शाळा कशी चालेल याची मला जबरदस्त शंका वाटूं लागली आहे."

"पहा तर खरं. आमचा हा पहिला विद्यार्थी नमुनेदार करून सोडला नाहीं तर नांव सोडून देईन—" आबा अभिमानानें झिंग्याकडे पाहून म्हणाला.

"तेंच होईलसं मला वाटूं लागलं आहे. तुम्ही आत्तांपासून दुसरं एकादं नांव स्वतःसाठीं अवश्य शोधून ठेवा. या पोराला तुम्ही नमुनेदार विद्यार्थी करण्याऐवजी तोच तुम्हांला नमुनेदार चोर बनवून सोडील याची मला बळकट खात्री आहे. झिंग्या, तें गाठोडं उचल न हो चालता पाहूं आधीं—"

आणि दोन तासांनी झिंग्या खरोखरीच आबाच्या शाळेंत येऊन उभा राहिलेला बाळासाहेबांना दिसला तेव्हां स्वतःच्या डोळ्यावर त्यांचा विश्वासच बसेना. "मला वाटतं, जें आजवर केलं नाहीं तें तुम्हीं मला म्हातारपणीं करायला लावून माझ्या नांवाला कलंक लावणार आहांत. अहो चोरांची शाळा उघडायला मला सांगतां म्हणजे जुलमाची सीमा झाली बुवा! आबासाहेब, हें पाप म्हातारपणीं मला करायला लावतां आहां पण याची जबाबदारी तुमच्यावर हं—!" ते म्हणाले.

अगदीं साधा समारंभ. परंतु त्यांत ओतप्रोत गांभीर्य भरलें होतें. इतके

दिवस उराशीं बाळगून ठेवलेली आकांक्षा अशा रीतीनें सफल होत असलेली पाहून आबाचें हृदय अभिमानानें व समाधानानें दाटून आलें. स्वतःचे प्रयोग करून पाहायला स्वतःच्या मालकीची शाळा त्याला आज मिळाली होती. दहा वर्षांनंतर तो आज मोकळ्या मनानें श्वासोश्वास करूं शकला होता. शाळा नांवारूपाला आणण्याची जबाबदारी सर्वस्वी त्याच्या प्रयत्नावरच होती. आणि विजय मिळवण्याची त्याची आतुरता दांडगी होती. एका चोराच्या पोरापासून त्यानें कार्याला सुरुवात केली होती.

समारंभाला गावांतली सगळी मंडळी आली होती. धोंडोपंत मास्तर येऊं शकले नाहींत. अठरा वर्षांच्या नोकरीनंतर आजच एकाएकी त्यांना कर्तव्याची तीव्र जाणीव झाली असावी. आबानें विरोधाला न जुमानण्याचें ठरवलेंच होतें.

——आबाची शाळा सुरूं झाली. आठ-पंधरा दिवसांनी अरुणा मुंबईला निघून गेली. यंदाचें तिचें सीनीअर बी. ए. चें वर्ष होतें आणि पावसाळा सुरू होण्याच्या आंत तिला मोटर गांठणें भाग होतें. एकदां पाऊस सुरू झाला कीं मोटर रस्त्यापर्यंत जाणें फार त्रासाचें होतें. ती वळुंज्याला होती तोपर्यंत रोज एकादी चक्कर शाळेंत मारून येई. आबाच्या नवीन नवीन कल्पना आदरपूर्वक ऐकून घेई आणि वेळप्रसंगीं स्वतःही कांही सुचवून पाही. याशिवाय तिनें आबाच्या प्रत्यक्ष कार्यांत हात घातला नाहीं. एका तरुण माणसाला पायावर उभें केल्याचें श्रेय मिळविलें तेवढें तिला पुरें होतें. यापेक्षां जास्त ती आबाच्या कार्यांत लक्ष घालण्यास तयार नव्हती. कांहीं झालें तरी दहा वर्षें तिनें मुंबईत काढलीं होतीं. शहरी जीवनाशीं ती तात्काळ समरस होऊं शकली असती. नाहीं म्हणायला आबाच्या विनंतीवरून तिनें झिंग्याला स्वतःच्या वडिलांपासून वाचवलें होतें. आबाला स्वतःच्या कार्याविषयीं जी तळमळ वाटत होती ती तळमळ अरुणेला वाटण्याचें कारण नव्हतें.

अरुणा गेल्यावर एकदोन दिवसांनी आबानें आपलें बिऱ्हाड निराळें काढलें. बाळासाहेबांनी त्याला खूप सांगून पाहिलें. परंतु त्यांच्या आतिथ्याचा गैरवाजवी फायदा घेण्याचें त्यानें साफ नाकारलें. गोडीगुलाबीनें अनेक वादविवाद होऊन गेल्यावर आबानें आपलें म्हणणें शेवटीं खरें

केलेंच. या बाबतींत त्याला जोराचा विरोध वेणूकडून झाला. वेणूची सध्याची मनःस्थिति फार मोठी गुंतागुंतीची होऊन बसली होती. लग्नानंतर प्रथम तिचा आबाशीं मतभेद झाला याला कारण किती क्षुल्लक होतें. आबानें इमानें इतबारें शहरांत नोकरी करून पैसा मिळवावा अन् आपण ऐटींत राहावं ह्या तिच्या लाडक्या कल्पनेला त्यानें धक्का दिला तेव्हां ती बिथरली. खेड्यांत जाऊन राह्यला तिनें विरोध केला. त्यासाठीं तिनें कोण आकांडतांडव केलें. गेलीं दहा वर्षे आबा या गावाहून त्या गावाला हिंडत असतां तिनें पुणें सोडलें नाहीं. आज तिनें अनन्यगतिक होऊन आबाबरोबर खेड्यांत पाऊल टाकलें होतें. आतां विरोध राहण्याचें कारण उरलेंच कुठें ?

पण याच ठिकाणीं माणसाच्या मनाची मौज पाह्यला सापडते. शब्दांतले विरोध मनुष्य कालातरानें विसरतो परंतु मनांतले विरोध सदैव जागृत असतात. एका कारणावरून झालेलें भांडण तें कारण नाहींसें झालें तरी कायमचें कधींच मिटत नाहीं. वरकरणी भांडण मिटलें असें वाटतें, परंतु त्या कारणापुरतें तें मिटलें असें वाटलें तरी तें समूळ मिटलेलें नसतें. खेड्यांत राहण्याचा मुद्दा वेणूच्या दैवानें तिच्यावर अशा रीतीनें उलटवलेला असला तरी वेणू आबावरचा राग विसरूं शकली नाहीं. आतां तो राग दुसऱ्या कुठल्या तरी गोष्टीवरून ती व्यक्त करूं लागली. आपली कोणतीच गोष्ट नवऱ्याला पटत नाहीं, आपली हरएक बाबतींत मानखंडना करण्यांत त्याला आनंद वाटत असला पाहिजे अशा तऱ्हेची बैठक तिनें मनामध्यें शोधून काढली होती. साहाजिकच या विचारसरणीचा परिणाम असा होऊं लागला कीं आबाची प्रत्येक इच्छा मोडून काढण्यासाठीं वेणू टपून बसूं लागली. आजवरच्या अनुभवावरून तिला स्वच्छ दिसत होतें कीं आपल्या विरोधाचा आबावर मुळींच परिणाम होणार नाहीं. शेवटीं तो आपलें म्हणणें खरें करणार याची जाणीव मनांत असतांना देखील ती त्याच्याशीं तंडत बसण्यांतच समाधान मानून घेऊं लागली. भांडणाचें सुख तिला जास्त आवडूं लागलें. त्याच्यांतच ती आपलें दुखावलेलें मन रिझवूं लागली.

बाळासाहेबांच्या वाड्यांतून झोपडींत जाऊन राहण्याची आबाची कल्पना

तिनें नित्याच्या संवयीनें एकदम फेटाळून लावली. तिनें त्याला साफ सांगितलें— " मी येणार नाहीं झोंपडींत. मी ही अशी पंगू म्हणून तुम्ही वाटेल तसं मला नाचवायला लागलात तर मी नाचणार नाहीं, सांगून ठेवतें. इथं नोकरांच्या हातनं कां होईना पण दोन्ही वेळां मला गिळायला तरी समाधानानं मिळतं आहे. आतां झोंपडींत मला नेऊन त्या झोंपडीला आग लावून द्यायचा तुमचा विचार आहे होय ? "

" हें बघ–ओरडूं नकोस. लोकाच्या घरीं आपण जन्मभर का राहणार आहोंत ? अन् थोरामोठ्यांच्या आश्रयाला आम्हाआम्हा गरिबांनी फार दिवस राहणं बरं दिसणार नाहीं. त्यांतून मी तुझी आबाळ करणार आहे, तुला चुलीपुढें स्वयंपाक करायला लावणार आहे अशी कां तुझी कल्पना आहे ? मुद्दाम वेड पांघरूं नकोस. माझे हातपाय धड आहेत तोंपर्यंत मी तुला स्वतः हातानें शिजवून घालीन. " आबा तिची समजूत काढूं लागला.

" तुमचं कार्य का काय म्हणतां त्याच्यापुढें तुम्हाला बायकोची शुद्ध राहील तर नं ! शाळा उघडायला कां बंद करायला पहिल्या दिवशीं गेलांत ते चांगले दोन वाजवून परत आलांत. घरांत गडी होते म्हणून चार घास गिळायला तरी मिळाले. तुमच्या हातानं काय मला मिळणार आहे ? तुम्ही मला अन्नपाण्यावाचून तडफडून मारून टाकायला बसले आहांत. " उद्वेगानें वेणू म्हणाली.

" बरं–बरं. नवऱ्याच्या हातून मृत्यु आला तर जुन्या काळच्या बायका स्वतःला धन्य मानीत होत्या. अन् नेहमीं नेहमीं तुला मरण्याशिवाय दुसरं कांहीं सुचतच नाहीं का ? तूं एकटी मर्त्य आहेस आणि आम्ही सगळे अमृताचे रांजण पिऊन अमर झालों आहोंत अशी का तुझी कल्पना आहे एकादी ? अग, सगळ्यांना एक दिवस मरायचं आहे. पण म्हणून जिवंत आहोंत तोंपर्यंत अजिबात हालचाल करायची कां माणसानं सोडली आहे ? उद्यां झोंपडींत राहायला जायचं आपल्याला. " आबानें म्हटलें.

" मी येणार नाहीं. साफ येणार नाहीं. माझ्या हातापायाचे तुकडे करून न्या तुम्हाला वाटलं तर—" वेणू संतापानें चिडून ओरडली. आणि दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणें आबा आपल्या पत्नीसह नवीन उभ्या केलेल्या झोपडींत राहायला गेला !

## —१०—

सहा महिन्याच्या अल्पावधींत आबानें वळुंजें गांवांत आपली छाप बसवली. प्रथम हेटाळणीनें किंवा संशयानें त्याच्या वागण्याकडे पाहणारे लोकसुद्धां त्याच्याविषयीं आदरभावानें बोलूं लागले. परंतु तोंडावरच्या स्तुतीनें आबा चढून गेला नाहीं किंवा पाठीमागच्या निंदेनें वाईट वाटून जाग्यावर थबकला नाहीं. कार्य करणाऱ्यानें कार्याव्यतिरिक्त इतर कोणत्याही उपाधीकडे लक्ष देणें कोणत्याहि कार्यास विघातक असतें हें त्यानें पुरेपूर ओळखलें होतें. आज दहा वर्षें त्यानें आपल्या कार्याची रूपरेखा मनाशीं योजून ठेवलेली होती. त्यामुळें आतां काय पुढें करायचें असा प्रश्न त्याच्यापुढें उभा राहणें अशक्य होतें. अज्ञ जनता सज्ञान करून सोडणें हा वाटतो तितका सोपा कार्यक्रम खास नाहीं. शहरामध्यें अधूनमधून झडणाऱ्या व्याख्यानामधें वक्ता सहज बोलून जातो कीं जनता साक्षर करा. तो जरी खऱ्या तळमळीनें बोलत असला तरी कार्याचें प्रत्यक्ष जगड्व्याळ स्वरूप त्याच्या दृष्टीसमोर उभें ठाकलें असतें तर त्याची जिव्हा निश्चित घुटमळली असती. ज्ञान हा परमेश्वर आहे ही साधुसंताची उक्ति ध्यानांत घेतली तर सारी मानवजात परमेश्वर स्वरूप करण्याचा हा प्रचंड खटाटोप हातीं घेणारा माणूस सामान्य असून चालणार नाहीं. जगांतल्या कानाकोपऱ्यातून असे

ज्ञानाचे पलिते हातांत घेऊन राज्यसत्तेला गांगरून सोडणारे वीर कांहीं थोडेथोडके आजवर होऊन गेले नाहींत. त्यांनीं आपले देह झिजवून जनतेचें कल्याण करण्याचा अविश्रांत प्रयत्न केला परंतु मानवजात एकंदर प्रयत्नाच्या मानानें फारशी प्रगत झालेली दिसून येत नाहीं. मग आबासारख्या सामान्य माणसानें हा उद्योग हातीं घ्यावा हें योग्य झालें काय? आबा अलौकिक पुरुष कधींच नव्हता. त्याला स्वतःला स्वप्नातसुद्धां तसा कधीं भास झाला नाहीं. आपली स्वतःची कुवत तो जाणून होता. आणि म्हणूनच तो हें मर्यादित स्वरूपाचें कार्य अंगिकारीत होता. हिंदुस्थानांतल्या इतर अज्ञ जनतेविषयीं आबाच्या डोक्यात सहानुभूतीचे विचार येत नसत असें नाहीं, परंतु तो एकटा हें अचाट कार्य अंगावर घेण्यास सर्वस्वी पंगू होता. त्याला जेवढें झेपलें असतें, जेवढें म्हणून त्याला मर्यादित स्वरूपांत करणें शक्य होतें तेवढें पार पाडण्यासाठीं तो कंबर कसून उभा होता. आजूबाजूची पांचसहा खेडीं साक्षर करण्याची त्याची मनोमय प्रतिज्ञा होती.

सुरवात अर्थात् लहान मुलांकडून करणें त्याला योग्य वाटलें. थोरांचें पोरांनीं अनुकरण हा जगाचा नियम असला तरी पुष्कळदां पोरांच्या नादानें थोरही जागे झाल्याचीं उदाहरणें कांहीं थोडीथोडकीं नाहींत. विशेषतः खेड्यांत हा प्रकार फार अनुभवायला मिळतो. पोराला शाळेंत घालवायला म्हणून बाप शाळेंत पाऊल टाकतो. तिसऱ्या चवथ्या दिवशीं त्या वातावरणाचा मनावर परिणाम होऊन तो थोडा वेळ तेथेंच घुटमळल्यासारखा करतो आणि शेवटीं एकादे दिवशीं 'आपणालाबी लिवायला येईल काय?' म्हणून लाजत लाजत शिक्षकाजवळ पृच्छा करतो. असे हे स्वयंस्फूर्तीनें येणारे थोर लोक आबाला मिळवायचे होते म्हणून त्यानें बाळगोपाळाकडे लक्ष दिलें. मोठ्यासाठीं प्रथम अजिबात कांहींच केलें नाहीं असा मात्र अर्थ नाहीं घ्यायचा. मोठ्यासाठीं त्यानें अन्य मार्गानें खटपट सुरू केली.

अरुणा मुंबईस गेली तेव्हां आबानें 'तिला विनंतीवजा सांगितलें होतें. रोजचें ताजें वर्तमानपत्र त्याला मिळणें अशक्य होतें आणि त्याची तितकीशी जरुरीही पण त्याला भासली नाहीं. परंतु आठवड्याचें एकादें संकलितवृत्त जर हातीं असलें तर त्याचा उपयोग खास झाला असता. त्या दृष्टीनें 'केसरी' चा उपयोग करून घेण्याचें त्यानें ठरवलें. कोणाच्या तरी हातीं

केसरी पाठवून [illegible] त्यानें अरुणेला सांगून ठेवलें होतें. त्याचा हेतू अगदीं स्पष्ट होता. लोकांना युद्धाची बातमी एकसूत्रीपणानें समजावून सांगितली तर त्यांत त्यांचा फायदा होणार होता. नाहींतर होई काय कीं माणकूशेट किंवा त्यांच्याचसारखा दुसरा कोणीतरी कामधंद्याच्या निमित्तानें सातार्‍याला नाहींतर पुण्याला जेव्हां चक्कर मारून येई तेव्हां येतांना खर्‍याखोट्या बातम्यांचें एक जंगी बंडल खाकोटीला मारून आणी, आणि स्वतःच्या कल्पनेची फोडणी देऊन तयार जिन्नस लोकांच्या पानांत वाढी. लोक जास्तच घाबरून जात. अन्य देशात काय व्यवस्था असेल ती असो. परंतु आमच्या देशांतलें युद्धकालांतलें प्रचारखातें जनतेच्या मनावर परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीनें खरोखरीच योग्य आहे काय याचा कुणींच गंभीरपणानें विचार केलेला दिसत नाहीं. मूर्खपणाच्या जाहिरातींनीं वर्तमानपत्रें अडविण्यापलिकडे व मासलेवाईक मराठी तर्जुम्याच्या नमुन्यानें शहरी लोकांची घटकाभर करमणूक करण्याचें श्रेय पदरांत पाडून घेण्यापलीकडे त्या खात्याची उडी अजून गेली नाहीं आणि ती कधीं काळीं जाईल असेंही वाटत नाहीं. खेड्यांतून आधींच जनता हवालदील झालेली, लढाईचें काय होणार याची औत्सुक्यपूर्ण भीति प्रत्येकाच्या मनांत रात्रंदिवस वास करीत असलेली, त्यांत त्यांच्याचपैकीं विश्वसनीय म्हणून समजल्या जाणार्‍या बाजारबुणग्यांनीं अवास्तव, अतिरंजित आणि वेळप्रसंगीं धादात खोटीं विधानें त्याच्या कानीं ओतली आणि त्यामुळें जनतेचा धीर सुटला तर त्यांत नवल वाटण्याजोगें काय होतें ? आबाची निश्चित खात्री होती कीं कोणत्याहि परिस्थितींत सामान्य जनतेनें धीर सोडतां कामा नये. घाबरलेला मनुष्य स्वतःच्या कृत्याबद्दल जबाबदार धरतां येत नाहीं. नित्याचीं कामें जर करण्याचें त्यानें टाळलें तर शत्रूमुळें नाहीं तर स्वतःच्या मूर्खपणानेंच उपासमारीची आपत्ती ओढवली असती. भीति सांसर्गिक रोगापेक्षां जास्त झपाट्यानें पसरते. लोकांचीं मनें ठिकाणावर ठेवून नित्याचीं कामें त्यांच्या हातून सुरळीत पार पाडण्याची त्यांची धमक कायम ठेवण्याचा आबानें निश्चय केला. लढणार्‍याचे तिकडे आघाडीवर कांहींही होवो, त्यांचे ते पाहून घेतील, आपण दूर असणार्‍या लोकांनीं हातपाय गाळून स्वतःचा अधःपात होऊं देतां कामा नये असा विचार जनतेनें केला तर विनाकारण ओढवणारी आपत्ती टळण्याचा संभव असतो.

हें काम थोरांच्या बाबतींत करण्याचें आबानें ठरवलें. ह्यासाठीं लोक एके ठिकाणीं केव्हांना केव्हां तरी येणें जरूर होतें. ते आणण्याची त्यानें एक युक्ति काढली. भजनाच्या निमित्तानें खेड्यांतील लोक एकत्र येण्याचा फार संभव असतो. देवाचें भजन म्हटल्याबरोबर आपापसांतलें नेहमीचे तंटेदावे घटकाभर विसरून खेड्यांतला मनुष्य तात्पुरता खेळीमेळीनें एकमेकाशीं वागायला झटकन तयार होतो. दर गुरुवारीं दत्ताच्या तसबिरीपुढें रात्रीं दोन तास भजन हा कार्यक्रम त्यानें जाहीर करून टाकला. भजनांत एक गोष्ट मात्र तो कटाक्षानें टाळणार होता. खेड्यांतील लोकांच्या मनांत जी जन्मजात श्रद्धाबुद्धि वास करीत होती त्या श्रद्धेला धक्का देण्याचें तो टाळणार होता. उलट त्यांच्या श्रद्धेला चुचकारीत तो आपलें कार्य त्याच्या गळीं उतरविणार होता. कारण अगदीं उघड होतें—

खेड्यांतील जनता श्रद्धेवर बव्हंशी जगत असते. तीं श्रद्धा नाहींशी केली तर काय परिणाम होतील तें सांगतां येणें कठीण आहे. पूर्वापार चालत आलेले संस्कार त्यांच्या हाडीमाशीं भिनलेले असतात. आजोबा-पणजोबापासून चालत आलेली विचारसरणी त्याना सोडणें शक्य नसतें. देवावरचा त्यांचा विश्वास अढळ असतो. न्याय, अन्यायाच्या त्यांच्या रूढ कल्पना क्षुण्णमार्गानें जात असतात. अशा ठिकाणीं त्यांना बुद्धिवाद शिकवणें इष्ट नसतें. खेडयांतल्या लोकांचें एक असो परंतु नागरी लोकांपैकीं तरी किती लोक आज शुद्ध तर्कप्रामाण्याला जागून आहेत? नागरीं जनतेंत तरी आज विचारांचा बोजवारा कशामुळें उडाला आहे? जुन्या समजुती, जुन्या रूढी, जुनीं बंधनें शहरांतील कांहीं लोकांनीं बुद्धि-प्रामाण्याला जागून कःपदार्थ म्हणून झुगारून दिलीं. परंतु जुनीं वाईट तीं टाकून दिलीं तर नवीं कोणतीं चांगलीं हें कुणींच सांगत नसल्यामुळें अतोभ्रष्टः ततोभ्रष्टः अशीच चमत्कारिक अडवणूक झाल्याचें प्रत्यही अनुभवास येत आहे. पोथ्या-पुराणांतून वर्णिलेला देव तर्कबुद्धीच्या निकषा-वर टिकला नाहीं म्हणून देवाचें अस्तित्व मानायला आम्ही तयार नाहीं. धार्मिक बंधनें आजच्या विचारसरणीला पचत नाहींत म्हणून तींही आम्हीं फेटाळून लावलीं, [illegible] बाबतींत तर आम्हीं पूर्वींचे पार विसरून जाण्याच्या तयारींत आहोंत. परंतु कितीही विचार केला

तरी कुठल्यातरी अज्ञातशक्तीशिवाय जगाची धारणा होत आहे हें गूढ मानवी मनाला पटत नाहीं. आणि देवाची कल्पना तर झुगारून दिलेली. धर्म म्हणजे अफूची गोळी समजून दूर केलेला. आणि पुरोगामित्वाच्या अभिनव कल्पनेसाठीं पूर्वीचे नीतिनियम शिथील केलेले. याचा मेळ बसायचा कसा ?

यांत काय आहे, त्यांत काय आहे अशा तऱ्हेची बेदरकार विचारसरणी डोक्यांत वागवणें सोपें आहे, परंतु मग कशांत काय आहे ? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. कशांतच कांहीं नाहीं असें म्हणणारा एक ढोंगी तरी असला पाहिजे. नाहीं तर मूर्ख तरी असला पाहिजे. समाजस्थैर्यासाठीं कांहीं ठराविक नियम त्या त्या समाजानें वेळोवेळीं करून ठेवलेले असतात ते पाळणें प्रत्येकाच्या हिताचें असतें. ते पाळायचे नसतील तर त्यांच्याऐवजी दुसरे काढून देतां आले पाहिजेत. मूर्तिभंजकता सोपी आहे. बांधलेली इमारत पाडून टाकणें फार कष्टाचें नसतें. ती नव्यानें पुनरपि बांधण्याची कल्पना जर आखून ठेवलेली असेल तर ती पाडणें युक्त ठरेल. दुर्दैवानें शहरांतील लोकांची स्थिति आगतिक झालेली आहे. जुनें नको; निश्चित नको पण नवीन काय तें कोणीच महात्मा पटवून देऊं शकत नाहीं. आणि संमोहावस्थेंत स्वतःच गिरक्या घेत फिरणारा शहरचा मनुष्य खेड्यातील लोकांना काय शिकवणार ?

आबानें लोकाच्या श्रद्धेला बिलकूल हात घातला नाहीं. परंतु त्यांना विचार करायला लावण्याची त्याची इच्छा उत्कट होती. लोकांना कांहींच सांगू नये तर तेंही चालणारें नव्हतें. म्हणजे स्वतःच्या ध्येयाला स्वतःच हरताळ फासण्याजोगें झालें असतें. आबानें शेवटीं तुकोबाची कास धरली. साऱ्या साधूसंतामध्यें तुकोबा त्याचा फार आवडता कवि होता. त्याच्या दृष्टीनें तुकोबानें लोकांना परमार्थाबरोबर व्यवहारही शिकवला होता. इतर संतानीं कर्मवाद लोकांच्यापुढें मांडून त्यांना नशिबाला हात लावायला शिकवलें होतें. आबाला लोकांचा हा दैववाद कमी करून त्या जागीं प्रयत्न-वाद अंगीं बाणावयाचा होता. या कामासाठीं तुकोबाचे अभंग त्यानें स्वतः वाचून खुणा करून ठेवले. लोकांची देवाविषयींची श्रद्धा कायम ठेवणें आणि त्याजबरोबर प्रयत्न करणारा मनुष्य देवाला प्रिय असतो हें तत्त्व

त्याला लोकांना शिकवावयाचें होतें. दर गुरुवारीं तो भजनाच्या वेळीं त्याचा आवडता अभंग मुद्दाम त्यांना म्हणायला लावी.

"देव माझा मी देवाचा। हीच माझी सत्य वाचा॥ देवाला भेटाया निघालों, देव झालों॥ तुका म्हणे धन्य झालो, विठ्ठला भेटलों—"

ह्या अभंगाचे चरण घोळून घोळून म्हणण्यांत सारे शेतकरी घटकाभर स्वतःस पूर्णपणें विसरून जात. विठ्ठल खरोखरी भेटो वा न भेटो त्यावेळीं तो अभंग खुलवून म्हणत असतांना तरी प्रत्येकजण आपली दृष्टि स्थिर ठेऊन समोर पाहात असे. जणू काय खरोखरीच विठ्ठल त्यांच्या हाकेला ओ देऊन धांवत आला होता.

बच्चे लोकांच्या बाबतींत आबानें ज्ञान पुरविण्यापेक्षां आणखी तितक्याच महत्त्वाच्या इतर गोष्टींकडे जास्त बारकाईनें लक्ष पुरवलें होतें. आबा शाळा कशी काय चालवतो हें पाहण्यासाठी धोंडोपंत टपून बसला होता. माणसानें एकदां विवेक सोडला म्हणजे त्याचा तोल कुठें जाईल हें अजमावणें सोपें नाही. धोंडोपंत आबाकडे प्रतिस्पर्धी या नात्यानें पाहूं लागले. त्याच्या प्रत्येक कृतीची टर उडवण्याकडे त्याची प्रवृत्ति झुकूं लागली. आबाचें चुकतें कोठें हें कळण्यासाठीं त्यानें आपली वानरसेना पढवून ठेवायला सुरुवात केली. प्रत्येक मुलानें रोज त्या शाळेंतली एक तरी गोष्ट स्वतःला येऊन सांगितलीच पाहिजे हा अलिखित नियम ते मुलांकडून जुलूमजबरदस्तीनें पाळून घेऊं लागले. स्वतःच्या कामांत अधिक लक्ष घालून आबाला योग्य तो प्रतिकार करण्याचें सोडून या खुळचटानें हा नवीनच मार्ग अवलंबिला. नालायक माणसांची ही नित्याची तऱ्हा असते. आपल्यांतला उणेपणा काढून टाकून मोठेपणा घेणें त्यांना सुकर वाटत नाहीं. त्यापेक्षां दुसऱ्याचा कमीपणा दाखवून किंवा तो स्वतःच्या कल्पनेनें निर्माण करून त्याची चेष्टा करावयाची व आपली प्रतिष्ठा स्थापन करून घ्यायची हा मार्ग त्याला जास्त जवळचा वाटूं लागतो.

धोंडोपंतानीं आबाची चेष्टा करावयाचा विडा उचलला. एके दिवशीं त्याच्या शाळेंतल्या मारत्यानें बातमी आणून दिली.

"पगा मास्तर, इहरीच्याजवळ एक बालडी भरूनशान तो झिंग्या उबा राहतो. पोरगा शाळेंत आला सकाळचा कीं आबा मास्तर त्याला धरतात

अन् त्याचं त्वांड आंधीं पघत्यात. त्याचं दांत मोजत्यात.त्याचं नाक उपटत्यात आन लगीच त्याचे केस धरून त्याचं डोक्सं त्या बालडींत बुडवत्यात. साबणाच्या वडीनं त्याचं डोक्सं घासून कादत्यात अन् मंग त्याला जाग्यावर बसाया पाठवत्यात. म्या म्हनलं अर मर्दा, हीं कसली साळा ? हा तर समदा धोब्याचा भटारखानाच. "

आबाच्या एका चांगल्या कृत्याचें मारत्यानें विडंबन करून सांगितलें, एवढाच याचा अर्थ ! शेतकऱ्यांची मुलें पुष्कळशी तोंड न धुतांच शाळेंत रवाना होत असत. अडाणीपणामुळें किंवा आळसानें हें साधें कृत्यसुद्धां पुष्कळ मुलांच्या हातून घडत नसें. आबानें त्यावर ही एक युक्ति काढली होती. पोरगा शाळेंत आला कीं आधी त्याला धरायचा अन् विहिरीवर नेऊन स्वच्छ करावयाचा. साबणाची वडी आणि एक स्वच्छ फडकें हातांत धरून झिंग्या शेजारीच उभा असे. नाक, तोंड, डोळे, दात, कानाची मागची बाजू स्वतः हातानें स्वच्छ केल्यावर त्या मुलाला असें रोज घरून करून येण्याविषयीं आबा बजावी. त्याचप्रमाणें अंगांतला कपडा फाटका असला तरी चालेल पण तो मळका असू नये, ही शिकवण आबानें पोरांना दिली होती. मळका सदरा दिसला कीं आबा त्याला विहिरीवर तो धुवायला लावी. अगदींच लहान मुलगा असला तर तो स्वतः धुवून देई.

धोंडोपंतानीं गांवच्या पाटलाला एके दिवशीं मुद्दामच कोपरखळी दिली. " काय पाटील, आपला नवीन धोबी कपडे फाडून आणीत नाहींनं ? हो, त्यांना मुद्दाम सांगायला पाहिजे तुमच्यासारख्यानीं. अहो, ही महागाई कोण ! चार आणे वाराचं कापड दीड दोन रुपये वारानंही बाजारांत मिळेनासं झालं आहे. रोज रोज साबण लावून पोरांचे कपडे दणादणा विहिरीवर आपटले तर याचं हो काय जातंय् ! आई बापांचं कर्म उभं राह्यचं. अन् काय हो पाटील, हा तुमचा नवीन मास्तर हीं सगळीं सोंगं तुमच्या डोळयांत धूळ टाकण्यासाठीं करतों अन् पोरांना शिकवतो केव्हां ? का शिकवण्याची बात नाहीं—"

पाटलानें कांहींच उत्तर केलें नाहीं. परंतु धोंडोपंताचें हें वायफट बोलणें त्याला रुचलेसें वाटलें नाहीं. आबाची यथेच्छ टवाळी करून धोंडोपंताचें

एवढ्यावर समाधान होणारें नव्हतें. आणि आतां नुसत्या मानसिक समाधानाचा हा प्रश्न राहिला नव्हता, सालोसाल मुलांची संख्या घटत होती. त्याबद्दल दर खेपेस अधिकारी वर्गाकडून विचारणा होत होती. लोकांच्या मूर्खपणाची सबब ठोकून धोंडोपंत वेळ मारून नेत असत. परंतु आता मात्र प्रसंग बाका येऊन ठेपला होता. त्यांना खात्रीलायक बातमी मिळाली होती कीं आबा ग्रँटसाठीं सरकारी शाळाखात्याकडे रीतसर मागणी करण्याच्या विचारांत होता. शाळा खात्याच्या नवीन नियमाप्रमाणें लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें काढलेल्या शाळाना सरकारी मान्यता मिळू शकत होती. इतकेच नव्हे तर ठराविक मुलें हजेरी पटावर दाखवण्यांत आली तर वार्षिक ग्रँटही मिळण्याची सोय करण्यात आली होती. हे कॉंग्रेसचे लोक असे आपल्या मुळावर येतील ही धोंडोपंताना आजवर कल्पना नव्हती. यांनीच तर हा नसता अव्यापारेषु व्यापार करून ठेवला. एका गांवांत दोन शाळा काढायला परवानगी द्यायची म्हणजे जुन्या शाळांचं वाजलच म्हणायचं अशा विचारानें धोंडोपंत या नवीन व्यवस्थेबद्दल मनांतल्या मनांत सारखे जळत होते. आबाला मुलांची संख्या भरपूर दाखवतां येणें शक्य होतें हें धोंडोपंतांला माहीत होतें. प्रत्येक घरांत जाऊन, त्या घरांतल्या बायाबापड्यापुढें पदर पसरून त्यांच्याजवळ पोरासाठीं भीक मागायची अन् एक शेंबडे पोर खांद्यावर घेऊन शाळेंत नेऊन बसवायचें ही आबाची वृत्ति धोंडोपंत दुरून पाहातच होते. तेव्हां आबाची प्रगती जर अशीच चालू दिली तर शाळाखातें आपल्याला जाब विचारल्याशिवाय राहणार नाहीं. ह्या भीतीची टांगती तलवार त्याच्या मानेवर सदैव लटकलेली होती. आतां पूर्वीची सबब सांगण्याची सोय उरलेली नव्हती. आबाच्या शाळेंत मुलें इतकीं जातात अन् तुमच्याकडे कां येऊं नयेत ह्या प्रश्नाला धोंडोपंताजवळ उत्तर नव्हतें. हा प्रसंग स्वतःवरचा टळायचा असेल तर एकच मार्ग त्यांना मोकळा होता. अर्थात् तो सध्याच्या परिस्थितींत अतिशय कठीण होता हें धोंडोपंत जाणून होतें. कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें आबाला वळंजाहून हाकलला पाहिजे, तरच आपली धडगत आहे असें त्यांच्या मनानें निश्चितपणें घेतलें. आबाला घालवून लावणें सोपे नव्हतें. तो निघून जाण्यासाठीं वळुंजला आलेला नव्हता. त्याचप्रमाणें त्याच्याजवळ अनेक हिकमती होत्या. धोंडोपंतांना त्या हिकमती

अवगत नव्हत्या असें नाहीं परंतु ज्या ताठरपणानें आजवर त्यांनीं गांवांत मिरवलें त्या गांवांत लाचारी पत्करून राह्यचें ? मुलें जमा करण्याच्या आबाच्या हिकमती काय कमी होत्या ? फुकट पाटीपेन्सिलीची लालूच ही अगदींच साधी गोष्ट झाली. प्रत्येक घरीं जाऊन घरांतल्या बायकांना गोडीगुलाबीनें पटवून देण्याची युक्तिही त्यांतच जमा होण्यासारखी आहे. परंतु यापेक्षां आबाच्या इतर अनेक युक्त्या होत्या. झिंग्यालाच त्यानें कशा युक्तीनें शाळेंत आणून दाखल केला पहा !

झिंग्या शाळेंत येऊं लागलेला पाहतांच त्याचा बाप एकदम बिथरला. आज दहा पांच पिढ्या जी गोष्ट आपल्या बापजाद्यांनीं केली नाहीं ती गोष्ट हें टीचभर कार्टें करतें हें पाहून त्याचें मस्तक खवळलें. शिवाय शिक्षण घेऊन पूर्वापार चालत आलेल्या वाटमारीच्या धंद्याला नाट लावायचा म्हणजे काय गोष्ट झाली ? झिंग्याला त्यानें मना केली. प्रथम गोडीनें सांगून पाहिलें, आपल्या धंद्याचीं रसभरीत वर्णनें त्यानें पोरापुढें आमीषें म्हणून उभीं केलीं. धंद्यांतलें साहस किती गोड असतें याचें रोमांचकारी चित्र उभें केलें. इतकेही करून पोरगा मथत नाहीं हें पाहून त्यानें नारसिंह अवतार धारण केला. झिंग्या नित्यनियमानें सकाळीं अंथरुणांतून उठला कीं आबाच्या शाळेंत येऊन दाखल होई. काय असेल तें असो झिंग्याच्या मनानें ही अचानक पलटी खाल्ली होती. वडिलांच्या मनाप्रमाणें आपण मुलूखगिरीवर जाऊं नये असेंच त्याला वाटूं लागलें. इनामदारांच्या तडाक्यांत आपण सांपडलों असतां आबानें आपल्यावर दया करून आपल्याला सोडवलें या साध्या घटनेनें तो भारल्यासारखा झाला होता. सुटल्याच्या आनंदापेक्षां आबांचें गोड बोलणें त्याच्या जिव्हारीं जाऊन भिडलें. आई मेल्यापासून त्याला आजवर इतके वात्सल्यपूर्ण शब्द फक्त आबानेंच काय ते ऐकवले होते. आबाचा आवाज ऐकला कीं त्याला आपल्या मृत मातेची आठवण होई. आणि आईच्याही मनांतून आपण वडिलांच्या मार्गानें जाऊं नये असें होतें याची त्याला जाणीव होती. या कारणामुळें झिंग्या वडिलांपासून दुरावला, आणि आबाला येऊन चिकटला. झिंग्याच्या बापानें एक दिवस भर शाळेंत येऊन झिंग्याला मरेमरेतों बडवलें. सगळ्या मुलांच्या समोर त्यानें झिंग्याची बरगडी न् बरगडी साफ केली. झिंग्या मार खात होता तरी

रस्त्यांत आडवा पडून ओरडच होता,—" मारा. माझा मुडदा वढ्यावर गेला तरी बी मी घरला यायचा नाहीं."

आबा मधें पडला आणि त्रस्तसंमंधाला शांत करणें किती अवघड असतें याचा त्याला त्या दिवशीं पुरता अनुभव आला. तास दोन तासाच्या बाचाबाचीनंतर झिंग्याचा नाद त्याच्या बापानें सोडला. म्हणजे बाचाबाची झिंग्याचा बाप करीत होता अन् आबा त्याची समजूत काढीत होता. शेवटीं आबा म्हणाला,—" पोरगा अजून लहान आहे. तुमच्या धंद्याला तो अजून योग्य नाहीं. परवांच इनामदारांच्या तडाक्यांत तो सापडणार होता. तुमचा धंदा तुम्हाला आवडत असला तरी जगाच्या दृष्टीनें तो चांगला नाहीं हें विसरूं नका. त्यांतूनही तुमचा हात धरण्याची माझी इच्छा नाहीं. पण असं पहा कीं त्याला अजून तुमचं कसब साधलेलं नाहीं. उद्यां कुठें चुकून सापडला कीं तो कायमचा येरवड्याला जाऊन पडायचा. त्यापेक्षां त्याला मोठा होऊं द्या. तोपर्यंत चार अक्षरं शिकला तर बिघडलं कुठें ? सुशिक्षित कारागीर म्हणून त्याचा तुम्हाला उपयोगच होईल कीं-- "

गुरकावीत झिंग्याचा बाप निघून गेला. मात्र त्याला आबानें चेष्टेंत उच्चार केलेली सुशिक्षित चोराची कल्पना आवडली. आपण जन्मभर खेड्यापाड्यांतून हलके सलके डल्ले मारीत फिरलों त्यापेक्षां आपला पोरगा पुढें शहरांत जाऊन तिथल्या शिकलेल्या लोकांच्या नवीन पद्धतीनं मोठाल्या चोऱ्या करील ही आशा त्याच्या मनांत चमकून गेली. आणि म्हणूनच त्यानें झिंग्याचा तूर्त नाद सोडून दिला. ही नवीन कल्पना डोक्यांत येण्याचा अवकाश कीं तो कल्पनेच्या साम्राज्यांत वावड्या उडवूं लागला. आपला पोरगा शिकून मोठा होईल, तो शहरांत डल्ले मारून खूप पैसा कमवील अन् मग समुद्रापलीकडे साहेबाच्या देशांत जाऊन तिथेंही आपल्या घराण्याचं नांव राखील हें स्वप्न फार गोड होतें. ह्या स्वप्नाला भाळून त्यानें उलट झिंग्याला दुसऱ्या दिवसापासून रोज नियमानें शाळेंत जाण्याचा तगादा लावायला सुरवात केली. आबाच्या शहाणपणाविषयीं झिंग्याचा बाप एकदम निर्धास्त झाला.

ही आबाची हिकमत धोंडोपंतांना कशी सुचावी ? झिंग्याला शाळेंत आणून दाखल करण्यांत आबाचा विचार निराळाच होता. माणसांत

जन्माचे वेळीं चोर आणि साव असे तट पडलेले नसतात. मनुष्य ज्या परिस्थितींत वाढतो त्या परिस्थितीनुरूप तो बनत जातो. झिंग्याचा बाप चोर असला म्हणून झिंग्या चोर होण्याचें कारण काय? उलटा झिंग्याला जर योग्य शिक्षण आपण दिलें तर तो आपली वंशपरंपरा विसरण्याचा संभव अधिक होता. प्रयोग म्हणून त्यानें झिंग्याला जवळ केलें होतें. त्या दिवसापासून झिंग्या दोन दिवस त्याच्या बापाच्या घरीं पडे आणि लहर लागली तर आबाच्या शाळेंतच रात्रीचा पडून राही. घरीं नियमीतपणें जाणें ही गोष्ट तो विसरूं लागला होता. आणि आबाला तरी काय हेंच पाहिजें होतें, घरचें वळण वाईट असेल तर पोरगा घरीं कमी राहील तितका बरा.

शाळेसाठीं पोरें जमवण्याच्या आणखी पुष्कळ युक्त्या आबाजवळ होत्या. आबाचें या बाबतींत एक धोरण कायम असे. ज्याला लोकसेवा करावयाची असेल त्यानें खरोखरीच लोकांची सेवा केली पाहिजे. अडाणी लोक आहेत म्हणून त्यांच्यावर टाफरण्यांत फायदा नाहीं, तर वेळीं अवेळीं त्यांच्या उपयोगीं पडलं पाहिजे. विठाबाईची मुलगी तानी हिच्या बाबतींत आबानें हेंच धोरण अंमलांत आणलें होतें. म्हणजे त्याचें असें झालें— !

## —११—

विठाबाई आबाच्या घरीं वर कामाला येत असे. अरुणेची आई हयात असतांना ती इनामदारांच्या घरचीं कामें करीत असे. परंतु तीं कामें पुढें बंद झालीं. अरुणेची तिला मधून मधून पैशाची मदत होत असे पण अशा वरवरच्या मदतीनें विठाबाईचीं तीन लहान मुलें आणि चवदा वर्षांची लग्न झालेली तानी मिळून पांच जणांच्या कुटुंबाचें भागणें दिवसें-दिवस अशक्य होऊन बसलें. त्यांत पुन्हां दुर्दैवाचे गोते काय कमी होते? तानीचं लगीन केलं, सातान्यांतला चांगला चार बुकं शिकलेला नवरा पाहून दिला अन् त्या बाबानं एके दिवशीं सरळ पोरीला माहेरीं आणून सोडली. चार वर्षं झालीं. कागूद नाहीं, माणूस नाहीं, निरोप नाहीं कांहीं नाहीं. मुलगी न्हातीधुती झाल्यावर आईनें तिला घरीं ठेवायची किती दिवस याला मर्यादा आहेच कीं नाहीं? विठाबाईनें स्वतःकडे कमीपणा घेऊन येणाऱ्या जाणाऱ्याबरोबर निरोप पाठवून पाहिला परंतु तानीचा नवरा तिला नांदवून घ्यायला तयार नव्हता.

बाराव्या वर्षांत तानीचें लगीन झालें. बापाच्या पश्चात पोरांचें अकल्याण होऊं नये म्हणून विठाबाईनें बारकाईनें पूसतापास करून तानीला नवरा करून दिला. दृष्ट लागण्यासारखा जावई हुडकून काढल्याबद्दल बाळासाहे-

बांनी व अरुणेनें तिची खूप स्तुती केली. दोन वर्षे तानी अधूनमधून माहेरास येत असे. दोन चार महिने राही आणि सासरी नादायला जाई. चवदाव्या वर्षी तानीला पदर आला. आईनें तिचीं खूप कौतुकें केलीं. कांहीं म्हणून करायचें बाकी ठेवलें नाहीं. आणि एके दिवशीं धोंडोपंत मास्तराकडून शुभ दिवस पाहून तिची साताऱ्याला पाठवणी केली. पाटील साताऱ्यास कांहीं कामासाठीं जाणारच होते, त्यांच्याबरोबर तानीला धाडण्यांत आलें आणि बरोबर आठ दिवसांनीं पाटलांनी पुन्हा तानीला वळुंजाला आपल्याबरोबर माघारी आणली. नवरा नांदवायला तयार नाहीं. एवढाच निरोप विठाबाईजवळ ठेवून पाटील निघून गेले. पाटलाचा हा विचित्र निरोप प्रथम विठाबाईच्या कानांत शिरेचना. तिला हें सारें स्वप्न वाटूं लागलें. परंतु खालीं मान घालून समोर उभ्या असलेल्या तानीकडे पाहतांच ती खाडकन् शुद्धीवर आली. हें असें झालें तरी कसें ? असा काय गुन्हा आपल्या हातून घडला किंवा तानीच्या हातून घडला म्हणून जावयानें लेकीला परत पाठवण्याची शिक्षा आपल्याला सुनवावी ? तानीला विचारावें तर तानी एक अक्षर बोलायला तयार नव्हती. विठाबाईनें गोंधळलेल्या मुद्रेनें तानीला हजार प्रश्न विचारले असतील परंतु प्रत्येक प्रश्नाचें ठराविक तुटक उत्तर तानी देई. ' मला काय ठावं ? ' या तानीच्या शंभराव्या उत्तरानें विठाबाई बेभान झाली. रागाच्या भरांत तिनें तानीला खूप सडकलें. आईच्या हाताचीं पांचीं बोटें उठून अंगाचा तीळ अन् तीळ भाग शेकून लाल झाला तरी तानीनें घुमेपणा सोडला नाहीं. आईच्या रागावर तानीनें दोन दिवस भाकरतुकड्याला बोटसुद्धां लावलें नाहीं. अखेरीस विठाबाईनें ही घटना अरुणा दोन दिवसांनीं मुंबईहून आली तेव्हां तिच्या कानावर घातली व जावयाकडून झाल्या आगळीकीचा खुलासा करण्यासाठी विनंती वजा त्याला पत्र पाठवून घेतलें.

पत्राचें उत्तर आठ दिवसांनीं अरुणेनें विठाबाईला वाचून दाखवलें. तें उत्तर ऐकून विठाबाई सुन्न झाली. असा प्रकार आपल्या डोळ्यादेखत घडला तरी कसा हेंच तिला उमगेना. आणि जावयाचें म्हणणें तरी खरें कशावरून ? नुसत्या संशयावरून पोरीच्या जन्माचें मातेरें करायचें म्हणजे हा काय मनुष्य आहे कीं राक्षस आहे ! चांगल्या कुलवंताच्या लेकीवर

असा आरोप करायचा म्हणजे जावयाचें काय डोकें फिरलें आहे ? अना-यासें सोबत मिळत होती म्हणून पाटलाबरोबर विठाबाईनें पोरीला धाडली होती आणि जावयानें नेमकें ह्या गोष्टीवर बोट ठेवलें होतें. पत्रांतला मज-कुर पुढीलप्रमाणें होता—

" पाटलांची संगत तुमच्या पोरीला बाधली आहे. तुमच्यापासून दोघे निघाले ते तडक पुण्याला गेले. चार दिवस पुण्यांत मजा करून तुमची लेक सातान्यास आली. ज्या मोटारनें पाटील तुमच्या लेकीला घेऊन पुण्यास गेले त्या गाडीचा डरावर माझ्या वर्गातला आहे. त्यानं आश्चर्यानं ही गोष्ट मला सांगितली. तुमच्या लेकीला खरंखोटं करावं म्हणून विचारलं तर ती बोलेना. पाटलाची चाल आम्हाला ठीक दिसली नाहीं. त्यांच्या-विषयीं दोनचार गोष्टी मागेंच आमच्या कानावर आल्या होत्या. तुमच्या गांवच्या एका भल्या माणसानं आम्हाला तोंडानं सांगितल आहे कीं तुमच्या लेकीचा अन् पाटलाचा दाट मैत्रीचा भाग आहे. या सर्व गोष्टींची डोळयानें खात्री पटली म्हणून तुमच्या लेकीला त्याच पावलीं माझ्या आईनें परत पाठवली आहे—"

जावयाचें हें पत्र म्हणजे विठाबाईच्या डोक्यांत सव्वा मणाचा दगड पडल्यासारखें होतें. जावयाला खोटें पाडून त्याचे दात त्याच्याच घशांत धालण्यासाठीं विठाबाई तयार झाली. चार माणसांच्या साक्षीनें जावयाची खात्री करून देण्याचा तिनें निश्चय केला. परंतु विठाबाईची या कामांत फसगत व्हावयाची होती. तिच्या बाजूनें बोलायला गांवातलें काळें कुत्रें तयार होईना. खुद्द बाळासाहेबांना तरी पाटलाच्या वर्तनाची खात्री कुठें होती ? त्यांनी आजवर कैक वेळां पाटील तानीशी थट्टामस्करी करीत शेताच्या बांधाला उभे राहिलेले पाहिले होते. त्यावेळीं त्यांना तसा संशय येणें शक्य नव्हतें पण आतां हें पत्र वाचून त्यांना विठाबाईच्या जावयाचें म्हणणें खरें असावें कीं काय असा दाट संशय येऊं लागला. धोंडोपंत मास्तरांनीं तर चक्क कानावर हात ठेवले आणि मोठ्या कळवळयानें विठाबाईस म्हटलें की, " बाई ! पाटील सरकारी माणूस मीही सरकारी शाळेंतला माणूस. आम्हीं एकमेकाचीं नरडीं धरलीं तर मग हो काय पाहिजे ? अन् समजा तुमचं म्हणणं खोटं ठरलं तर खोटी साक्ष द्यायला मी पुढें होऊं होय ? अन् मग

मला सरकार काय म्हणेल? खरं असलं तरी पाटलाच्या विरुद्ध जायचं तिकडूनही बरं नाहीं. विठाबाई, तुम्हाला खरं सांगू? तुमचा जावई हा एक नंबरचा पाजी गृहस्थ मला दिसतो आहे. कांहीं तरी कुभांड रचून तो तानीच्या जबाबदारींतून सुटूं पाहतो आहे. असेल एकादी त्याची सोमवारांतली बाईल! मी म्हणतों तुम्हीही तोडीस तोड उत्तर द्या. पोटगीचा दावा द्या ठोकून. फक्कत तानीला घेऊन जाईल नाहींतर तुमच्या जातीच्या रिवाजा प्रमाणें कांहीं दिवस वाट पाहून दुसरा घरोबा करून द्या तिला. तोपर्यंत राहिली ती घरीं म्हणून बिघडलं कुठं? म्हशीला आपलीं शिंग कधीं जड झाल्याचं ऐकलं आहे का कुणी?"

अखेरीस विठाबाईनें कपाळाला हात लावून घेतला. तिची खात्री झाली कीं झालेल्या प्रकारांत जावयाचा कांहीं दोष नसून लेकीनें आजवर आपल्या डोळ्यांत धूळ फेकली आहे. मायेच्या पोटी आपण पोरीवर विश्वास टाकला अन् पोरीनें पाटलाच्या संगतीनें गुण उधळले ही तिची हळुहळु खात्री होऊं लागली. तानीच्या तोंडून वदवण्यासाठीं तिनें तानीला जंग जंग पछाडले. गोडीनें घेऊन पाहिलें, रागानें बोलून घेतलें, रागात तिच्या अंगावर हात टाकण्यासही तिनें कमी केलें नाहीं. परंतु तानीनें पाटलाचा व आपला काय संबंध होता हें अक्षरानें सुद्धां आईस सांगितलें नाहीं. इतका प्रकार केल्यावर विठाबाई मूग गिळून बसली. आज ना उद्यां जांवई लेकीला न्यायला येईल या खुळ्या आशेवर विसंबून ती स्वस्थ राहिली. मात्र तानीवर आतां तिनें सक्त पाहारा ठेवण्याचें ठरविलें. पाटलाचा सूड घेण्याचें तिच्या मनांत आलें तरी बायकोमाणूस पडल्यामुळें तिचा नाइलाज होता. आपलाच दाम खोटा अन् दुसऱ्याला बोल लावा यापेक्षां स्वतःच भुर्दंड सोसलेला बरा ह्या पोक्त विचारानें तिनें पाटलावर बदला घेण्याचा विचार दाबून टाकला.

मात्र झाल्या या विपरीत परिणामानें तानीचे डोळे उघडले. बालपणीचा अविवेक तिला नडला होता. हाडानें ती दुष्ट नव्हती. आईला फसवून पाटलासंगती मजा मारीत फिरण्याची बुद्धि तिची स्वतःची नव्हती. पाटलाची संगत तिला योगायोगानेंच जडली. लग्न होण्यापूर्वी बारा वर्षांची तानी तशी मोठी चुणचुणीत अन् देखणी पोर होती. पिकलेल्या [illegible]

लालबुंद पडलेले तिचे ओठ, नागपुरी बोराप्रमाणें मोठे अन् निमुळते तिचे डोळे, भव्य कपाळ, पिकलेल्या कुंकुगाप्रमाणें तांबुसलेले तिचे गाल अन् उफाड्याचा बांधा या रूपामुळें पाटलाची दृष्टि एकदम तिच्याकडे वेधली. बाप मरून चार वर्षे झाल्यामुळें अनाथ झालेली तानी पाटलाच्या नजरेंत तेव्हांच भरली. आईनें सांगितल्यावरून तानी रानशेण्या गोळा करायला माळावर जाई तेव्हा मोठ्या पहाटे उठून पाटील तिच्या मागोमाग जाऊं लागला. शेताच्या कडेला उभा राहून तिच्याशी वरकड गोष्टी करूं लागला. तिच्यासाठीं रानांतलीं करवंदे तोडूं लागला—अन् दुपारच्या प्रहरीं उन्हाच्या कहाराला त्रासून ओढ्याच्या काठाशीं वाढणाऱ्या वृक्षाला टेकून तानी बसली कीं ओढ्यातलें गारगार पाणी तिच्या अंगावर मजेखातर उडवून तिचा शीणभाग हरण करूं लागला. पाहणारीं माणसं म्हणत पाटील लई गमत्या ! पोरासोराच्या वाटेस गेल्याशिवाय पाटलाचा दीस नाहीं जायाचा ! गेल्याच्या गेल्या वर्साला बिचाऱ्याची बायकू पटकीनं ग्येली तवा धरून पाटील पोरा-सोरात जीव रमवू लागला ! इत्यादि वाक्यानें तानीला आपण काहीं पाप करतों आहोंत अशी क्षणभर सुद्धां शंका आली नाहीं. बापापरीस दिस-णारा पाटील आपली खोडी निराळ्या अर्थानें काढीत असेल असें तिच्या मनातसुद्धां आलें नाहीं. हळुहळु पाटील तिच्या अंगझटीस येऊं लागला. तानी आपल्या लांबसडक बोटानें त्याच्या मिशा ओढी तेव्हां त्याला कोण आनंद होई. तो तानीला गुदगुल्या करी. खाकेंत पाटलाचीं बोटें वळवळूं लागली कीं तानी जमिनीवर गडबडा लोळू लागे. पाटील तिला चेष्टेनें बखोटीला धरून उंच करी तेव्हां ती हातपाय झाडून पाटलाला यथेच्छ बडवून काढी.

हें सर्व तानीचें लग्न होईपर्यंत ठीक होतें. लग्नानंतर तानी सासरी गेली तेव्हां पाटलाला सुनें सुनें वाटूं लागलें. चार दिवसांनी कामासाठीं तो साताऱ्यास गेला तेव्हां तिच्या नवऱ्याच्या पश्चात तो तिच्या सगतीं गोष्टी करून आला. तानी दोन महिन्यानीं माहेराला आली तेव्हां पाटलानें तिला रानांत अडवायला सुरवात केली. तानीला आतां लोकमताची भीति वाटूं लागली. आतां तिला मुलींच्या जातीप्रमाणें लग्न झाल्यावर दोनच महिन्यानी बरेंच ज्ञान प्राप्त झालें होतें. ती पाटलाला चार चौघांत जवळ येऊं देईना.

परंतु आडवळणाला पाटील दिसलें कीं ती त्याला मना करीना. पाटलाच्या माकड चेष्टांनी तिला गोड वाटावें यांत नवल नाहीं. उगीच एकाद्याला तोडून टाकणें तिला प्रशस्त वाटलें नाहीं आणि दुसरें म्हणजे पाटलांनी अजून तोंडानें आपला दुष्ट हेतु तिला ऐकवला नव्हता. सगळ्या चेष्टा गमतीखातर या सदराखालीं मोडत होत्या. कुणालाही त्यांत गैर वाटण्याजोगें कांहीं नसावें या विषयीं पाटील कमालीची दक्षता बाळगी. त्या कामात तो पुरता वाकबगार होता. परंतु मनांतून तो निराळ्याच संधीची वाट पाहात होता.

तानी वयांत आली तेव्हा पाटलानें एकदांच खडा टाकून पाहिला. गव-ताच्या गंजीआड पाटलानें तिचे दोन्ही हात धरून तिच्या तोंडाजवळ तोंड नेलें. त्याच्या राठ मिशा तोंडाला लागतांच तानीनें आपली सगळी शक्ति एकवटून त्याला मागें झुगारून दिलें. पाटील गवतांत जाऊन पडला. त्याचें डोकें गवतांत गेलें. डोक्यावरची गवताचीं कुसळें दोन्ही हातांनी ब्राजूस करीत पाटील जोरानें हंसला आणि म्हणाला–, "थूः त्याच्या! अग बिजलीच्या धक्क्यापरीस मला ढकलून दिलेस कीं, तुला काय वाघ सिंहावाणी मी खात होतो कां गिळत होतों? म्हटलं, आमच्या तानीनं आज पुराण पोळी खाल्ली हाय का लाडू चापले आहेत तें वासानं वळखावं म्हून जरा तोंडाशीं रवांड केलं तर हा झनकारा! ताने, पाटलाला इसरलीस व्हय?—"

"हां! पाटील, आतां माझ्याशीं दुरूनच बोला. आता मी दुसऱ्याची बाईल झाली आहे. कुनी पाह्यलं तर काय म्हनत्याल?" तानी गोरीमोरी होऊन म्हणाली. "हात्तिच्या! कोणी पाह्यला इथं येईल तरची बात! हत तुझ्या माझ्या बिगर हायेच कोन!" पाटील पुन्हां तिच्या दिशेनें जवळ सरकत म्हणाला. तानी खोडकरपणानें खाली वाकली आणि त्याच्या तोंडावर गवताची एक पेंढी मोकळी करून फेकीत हरणाच्या वेगानें पळून गेली. पाटलानें तोंडांत, डोळ्यात शिरलेलं गवताचें भुसकट दोन्ही हातानें दूर करीत तिच्या दिशेनें पाहिलें. त्याच्या त्या पाहण्यात विषयांधपणाचा मद पुरेपूर भरला होता. त्याच्या हातून तानी निसटली होती. परतु त्याच्या मनांतून ती निसटली नव्हती. कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें तानीला अडवण्याचा व तिचा ताठा मोडायचा त्यानें निश्चय केला. धोंडोपंताच्या

मार्फत ही कामगिरी करण्याचा त्यानें बेत केला. तानीचा नवरा तिला सासरीं घेणार नाहीं अशी कांहीं तरी युक्ति त्याला करायची होती. धोंडोपंतानें ती युक्ति त्याला सुचवली. धोंडोपंत पाटलाचा सहाय्यक झाला आणि साताऱ्यास जाऊन धोंडोपंतानें बीज पेरलें. तानी पाटलाच्या संगतीनें पार बिघडलेली असल्याचें स्वतः डोळ्यानें पाहिल्याचें वृत्त धोंडोपंतानीं युक्ति प्रयुक्तीनें तिच्या नवऱ्याच्या कानावर घातलें. या युक्तीनें तानी कायमची माहेरीं राहील याची पाटलाला खात्री होती. यांत एकच अडचण होती पण पाटील त्याला तोंड द्यायला तयार होते. तानीचा नवरा आपलें नांव घेईल ही भीति त्याच्या मनांत होती. परंतु गावातलें आपलें चोख वर्तन पाहून तसें म्हणायची कुणाची छाती होणार नाहीं हा विश्वास त्याच्या मनांत होता. जर कुणी आपलें नांव घेतलेंच तर आकाश पाताळ एक करून सोडायचे व आरडाओरडा करून आपलें नांव उजळ ठेवायचें हा त्याचा बेत होता.

मात्र खुद्द तानी कशी बनेल हा विचार काळजी करण्यासारखा होता. तानी तिखट असल्याचा पाटलाला अनुभव आलाच होता. तिला युक्ति प्रयुक्तीनें जाळ्यांत ओढावें लागणार होतें. तें जाळें पाटलानें बरोबर विणलें. विठाबाईनें मुलीला सासरीं पाठवण्याचा मनसुबा केलेला त्याच्या कानीं आला. त्याच वेळीं पाटलाचें साताऱ्याचें काम निघालें. विठाबाईच्या मनांत शंकासुद्धां आली नाहीं. बापाप्रमाणें माया करणारें मोठें माणूस अनायासें सोबत म्हणून मिळतें आहे ह्याचा तिला आनंदच वाटला. आणि पाटलानें तानीला थेट पुण्याची वाट दाखवली. या ठिकाणीं पाटलाच्या बोलण्यावर भरंवसा न ठेवतां जर ती साताऱ्यास नीट गेली असती तर पुढचा अप्रिय प्रसंग सहज टळला असता. परंतु अजाणीपणानें ती फसली. साताऱ्याची म्हणून पुण्याची मोटार पाटलानें तिला दाखवली. मोटार सुरू झाल्यावर आंत बसलेल्या लोकांच्या बोलण्यांवरून तिनें ताडलें कीं आपण पुण्याच्या मोटारींत बसलों आहोंत. शिरवळच्या स्टँडवर तिनें पाटलाला एकीकडे नेऊन याचा जाब विचारला. पाटलानें गोडीनें तिची समजूत काढली.

“ आन् समज ताने, तूं बराडलीस तर तुझं कोण ऐकून घ्येनार हाय! अग, मी पाटील आन तू हायेस भांडीं घासनारनीची प्वार! पर ताने,

तें जाऊ दे. चार दिवस पुन्याला मौज करूं अन् मग तुझा नवरा अन् तूं जलमभर धिंगाणा घालीत बसा कीं. तुम्हासनी आडकाठी कोणाची हाय मंग! तुझ्या अंगाला म्यां ब्वाट लावलं तर बोल कीं." पाटलाच्या या बोलण्यानें तानी गोंधळून गेली. आपली असहाय्यता तिला पुरती जाणवली. पाटलाच्या हांतून युक्तीनें आपली सुटका करून घ्यायचा निश्चय करून ती मुकाट्यानें त्याच्या पाठोपाठ मोटारींत चढून बसली. इथेंच तानीच्या मनाचा कमकुवतपणा तिच्या आड आला. ह्या ठिकाणीं तिनें रुद्रावतार धारण केला असतां तर पाटलाचें कांहीं चाललें नसतें. त्याची ती पोकळ धमकी होती. पण तानीला तेवढें प्रसंगावधान राहिलें नाहीं.

पुण्याला एका मोठया हॉटेलांत पाटील तानीला घेऊन चार दिवस राहिले. बोलल्याप्रमाणें त्यानी तानीला खरोखरीच बोटसुद्धां लावलें नाहीं. परक्या ठिकाणीं गोंधळ न माजवण्याइतपत त्यांना शहाणपण होतें–आणि मुख्य त्यांचा हेतु हाच होता कीं हा प्रकार तानीच्या नवऱ्याच्या कानावर जावा. एकदां त्याला हें कळलें म्हणजे तानी माहेरीं येईल अन् मग आपण आहोंतच तिच्या समाचाराला हजर. तोंपर्यंत तानीशीं अत्यंत गोडीनें वागण्याचा त्याचा इरादा होता. चार दिवस त्यांनी तानीला पुण्यांत खूप घुमवली. सिनेमा झाले, नाटकें झालीं, हॉटेलांत नाना तऱ्हेचीं खाणीं झालीं. या साऱ्या प्रकारांतून तानी झोपेंत चालणाऱ्या माणसाप्रमाणें भाबावलेल्या स्थितींत जात होती. तिला भीति वाटत होती पाटलाच्या जवळ येण्याची. तो प्रकार मुळींच घडून आला नाहीं याचें तिला अत्यंत समाधान वाटलें. चार दिवस ती पुण्यांत खूप आनंदांत होती. एकवेळ तिच्या मनाला पुसटती कल्पना चाटूनही गेली कीं, पाटलांच्या हेतु विषयीं शंका घेण्यांत इतके दिवस आपण चूक तर करीत नव्हतों?

—आणि जेव्हां साताऱ्यास नवऱ्यानें तिला छेडलें तेव्हां ती भानावर आली. आपल्याला पुण्याला नेऊन आपली इतकी सरबराई करण्याचा पाटलाचा हेतु तिच्या लक्षांत आला. परंतु वेळ हातची गेली होती. आतां सावध होऊन कांहींच उपयोग नव्हता. कोणतीही चमत्कारिक परिस्थिति तात्काल आकलन करण्याची स्त्रियांची बुद्धि महशूर आहे. तिनें सगळा प्रकार चटकन् ओळखला. त्याचबरोबर तिनें हेंही ताडलें कीं घर जळून

गेल्यावर आगीचें कारण सांगण्यांत मतलब नसतो. ह्या विचारानें तिनें मुग्धता स्वीकारण्याचें धोरण आखून टाकलें. सासूनें तिला डागण्यापर्यंत पाळी आणली तरी तिनें तोंडावाटें अक्षर काढलें नाहीं. नवऱ्यानें तिला गुरासारखी बडवली तरी तिनें कांहींहि सांगितलें नाहीं! पाटलांच्याबरोबर ती मुकाट्यानें घरीं परत आली. आपली चूक आपणच भोगली पाहिजे या निश्चयानें ती आईजवळ कांहींहि बोलली नाहीं. तिची खात्री होती कीं चार दोन महिन्यानी आपला नवरा आपल्याला न्यायला येईल त्यावेळीं आपण आपली चूक कबूल करून त्याच्या पायावर डोकें ठेवूं. तूर्त सगळयांचींच माथीं भडकलेलीं असतांना आपण कांहींही खुलासा केला तरी तो अंगावरच येणार हें तिला स्पष्ट दिसत होतें. कालांतरानें संशयाची धूळ खालीं बसेल आणि मग सर्व कांहीं सुरळीत होईल हा विश्वास तिला वाटत होता.

चार महिनेच काय परंतु चार वर्षें होत आलीं तरीही आपला नवरा कागद पाठवूनसुद्धां आपली चौकशी करीत नाहीं हें पाहून तानीच्या हृदयानें ठाव सोडला. नवऱ्याच्या घरीं नांदायला जायला ती साहजिकच उत्सुक होती. पण आतां त्या गोष्टीची शक्यता दूरावत असलेली पाहून तिचें मन अस्वस्थ होऊं लागलें. तशांत गेल्या चार वर्षांत माहेरीं असतां पाटलाशीं गांठीभेटीचा प्रसंग येऊं न देण्यांत तिला फार खबरदारी घ्यावी लागली होती. दिवसा रानांत जाण्याची किंवा घराबाहेर न पडण्याची आईनें तिला ताकीद दिली होती ती तिनें रेसभरही कसूर न करतां तंतोतंत पाळली होती. रात्रीं, आवशीं, पहाटेला ती आईला धरून धरूनच असे. तिला घराबाहेर काढण्यासाठीं योजलेल्या पाटलाच्या अनेक युक्त्या प्रयुक्त्या तिनें मोठ्या शिताफीनें उडवून लावल्या होत्या. इतकी मुलगी पाक वागत असतांना तिचा नवरा अजून तिला नेत नाहीं हें पाहून विठाबाई हलके हलके जावयांवर घसरूं लागली. शिकलेला जावई नवरा पाहून दिला याबद्दल तिला वाईट वाटूं लागलें. शहरचीं माणसें बुकें वाचून डोकीं बिघडून घेतात हें तिच्या मनानें पुरतेपणी घेतलें.

जावयाला तिनें खूप पत्रें पाठवलीं. परंतु जावयानें मुळींच उलट उत्तर धाडलें नाहीं. जावयाच्या शिक्षणावर विठाबाई खूप संतापली. त्यांतून गेल्या दोन वर्षांत महागाईनें तिची फार तारांबळ उडूं लागली. ज्यांचीं स्वतःचीं शेतें होतीं त्यांच्या हातांत कागदाच्या रूपानें कां होईना पण थोडा फार पैसा खेळूं लागला. पण त्यांचीसुद्धां कोण हवालदील स्थिति झाली होती तें विठाबाई डोळयानें पहात होती. कमरेच्या कशाला दहाची नोट असून माणकू शेटच्या दुकानांत राकेलचा थेंब नाहीं तर ती नोट काय जाळायची आहे ? उमाप पीक येऊन ताटें जमिनीला लवलीं आहेत पण बाजारात पसाभर धान्य मिळेना. दिव्याच्या अडचणीमुळें लोक एरंडाचे बुळबुळीत दिवे जाळूं लागले. साखरेचा कण कुणाला भेटेना. त्या ऐवजीं गुळाच्या पाण्याचा चहा ढोसावा लागूं लागला. विठाबाईची तर अतिशयच परवड होऊं लागली. मोलमजुरीचें जीवन तिला कोठवर हात देणार होतें ? तशांत नवऱ्यानें टाकलेली लेक घरात पण तिला पाटलाच्या भितीमुळें कुठें कामाला धाडावी म्हटलें तर तेंही शक्य नाहीं. तीन लहानीं पोरं आणखी वर पोसायचीं ! जीव नकोसा झाला तिला !

आबानें जेव्हां मुलें शाळेंत धाडण्याविषयीं एके दिवशीं तिला सांगितलें तेव्हां वेणूचे हातांत धरलेलें ओलें लुगडें तिनें तसेंच जमिनीवर टाकलें. जावयाच्या शिक्षणामुळें तर हा पोरीचा वनवास उभा राहिला ह्या कल्पनेनें बिथरलेली विठाबाई आबाकडे पाहतच उभी राहिली. आबानें पुन्हां तिला मुलांच्याविषयीं सांगितलें. आबाच्या बोलण्याकडे प्रथम तिनें दुर्लक्ष केलें. उगीच एकाद्या शहाण्या माणसाला आपली रडकथा कशाला ऐकवा ही तिची इच्छा ! परंतु जेव्हां आबानें तिचीं मुलें एकदां सरळ शाळेंत उचलून नेलीं तेव्हां मात्र विठाबाईला बोलल्यावाचून रहावेना. शिक्षणावर आणि शिकलेल्या लोकाच्यावर तिनें असें तोंड सुख कां घ्यावें हें कोडें आबाला सुटणें शक्य नव्हतें. मुलांना शिक्षण नको हा तिचा दुराग्रह पाहून आबाला आश्चर्य वाटलें. त्यानें एके दिवशीं स्पष्टच विठाबाईला प्रश्न टाकला.— विठाबाईनें प्रथम खूप आढेवेढे घेतले. नंतर तिनें सारी इत्थंभूत हकीकत

आबाला ऐकवली. आबानें सर्व कांहीं शातपणानें ऐकून घेतलें व शेवटीं म्हटलें, " विठाबाई तुमच्या तानीला मी तिच्या नवऱ्याच्या घरीं पोहोंचवतों. माझ्या तोंडाकडे अशा पाहूं नका. खरंच, मी तुमच्या लेकीची नीट व्यवस्था लावतों. तुमची मुलगी नवऱ्यानं घरांत घेतली तर तिचे तिन्ही भाऊ शाळेंत धाडायला तयार आहांत कां, बोला ! तुमचं काम मी करतों, मात्र माझं काम तुम्ही केलं पाहिजे. उद्यांच्या उद्यां तानीची ओटी भरा अन् तिला तयार करा. " विठाबाई आ वासून आबाकडे पाहातच राह्यली !

## —१२—

आबाला एक दिवस साताऱ्याला जाऊन यायला पाहिजेच होतें नाहीं तरी.शाळेला.सरकारी मदत मिळण्यासाठीं त्यानें बरेंच दिवसांपूर्वी अर्ज केला होता. परंतु दोन महिने झाले तरी त्या अर्जाचें पुढें काय झालें होतें तें त्याला कळलें नव्हतें. बार्शी लाइट रेल्वेलाहि लाज वाटावी इतक्या सावकाशीनें शिक्षणखातें हात पाय हालवीत असल्याचें आजवर कित्येकवेळां त्याला पटलें होतें परंतु या खेपेस त्याला नड होती. समक्षच जाऊन ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसरच्या कानावर गोष्टी घालाव्या ह्या विचारानें तो साताऱ्यास जाण्याचें मनांत घोळवीत होताच. त्याच कामामधें तानीचाही राम तिच्या पदरांत टाकण्याचें त्यानें ठरवून टाकलें. खेडेगांवांत वाऱ्याच्या लहरी सरशी धूळ आणि बातमी पसरत असते. हरबाच्या म्हशीनें लाथ मारल्याची नवलपूर्ण कथा पंधरा मिनिटांच्या अल्पावधींत साऱ्या गांवच्या मालकीची होते. तानीला आबा साताऱ्याला तिच्या नवऱ्याच्या घरीं नेऊन घालणार ही बातमी धोंडोपंतांना समजली तेव्हां ते देवपूजेचें ढोंग उरकीत होते. पोऱ्यानें सांगितलेली बातमी मेंदूवर परिणाम करते न करते तोंच धोंडोपंत कसल्या तरी विचारानें ताडकन उठून उभे राहिले. राहिलेले देव पाण्यांत बुचकळून बाकीचा उरलेला पूजेचा भाग थोरल्या मुलाच्या गळ्यांत त्यांनीं

अडकावला व ते अंगावर कांहीं न टाकतां तसेच उघडे बोडके पाटलाच्या घराच्या दिशेनें जवळ जवळ धावतच निघाले. उभ्या जन्मांत असा हा बिकट प्रसंग पहिल्यानें अनुभवावा लागल्यामुळें त्यांची मुद्रा गोंधळून गेली होती.

पाटील जेवण्याच्या तयारींतच होते. मावशीनें आणून दिलेली पाण्याची लखलखीत लोटी हातांत धरून तोंड वगैरे धुण्यासाठीं स्वारी दारापुढच्या दगडावर बसली होती. धोंडोपंतांनीं घाबऱ्या घाबऱ्या सांगितलेली बातमी ऐकून पाटील क्षणमात्र शून्य मनस्क स्थितींत समोरच्या झाडावर रोखून पाहूं लागला.

"पाटील, तुम्हांला मी पहिल्यापासून सांगत होतों कीं आपल्या गांवच्या भानगडींत हें शहरचं पिल्लूं नको. बाळासाहेब इनामदारांच्या वाड्यांत बसून आबे खाल्लेत त्या वेळीं, आतां या वेळीं खा मार्ता. ही शहरांतलीं माणसं आपण ओळखत का नाहींत! अहो, ह्यांना हे नसते धंदे करण्याची संवयच जडलेली असते. म्हणून स्वतःच शहर गाव सोडून असं खेड्यांत पळावं लागतं. हा आबा खरोखरी कोणत्या कारणामुळं आपल्या गांवीं आला आहे ह्याचा तपास लावण्याच्या उद्योगांत मी आहेच. असा एकादे वेळीं सांपडूं दे तर खरा, ना नाक ठेचीन तर मास्तरकीचा धंदा सोडून देईन. पाटील, अहो असे भांबावल्यासारखे काय त्या झाडाकडे पाहतां? त्या आबाकडे अजून तरी डोळे उघडून पहा जरा—" धोंडोपंत कळवळून म्हणाले.

"पाहतों. त्याच्याकडे याच्या अदुगर पाह्यला पाहिजे होतं. पण गय केली. मला या जानबा पाटलाला दुखवतो काय हा बामन! मर्दा म्हणावं असं कैक वाटेला लावल्यात आज वेरी. कोंबडीगत मुंडी मुरगाळून गांवच्या वढ्यापलयाड ह्या मास्तरड्यासा भिरकावून देणार नाय तर ही पाटलाची अवलादच्च नाहीं. धोंडोपंत,'वाइच आंतमंदी या बरं. मला संमदं नीट ध्यांनांत राहील असं सांगा—" पाटील घाईघाईनें आंत निघून गेला. धोंडोपतांनें आबाचा बेत खुलवून खुलवून सांगितला. सुमारें आठ महिन्याच्या तपश्चर्येनंतर पाटलासारखा मोठा मासा अनायसें गळाला लागत होता अशा वेळीं

धोंडोपंत माघार घेणें शक्य नव्हतें. आबावर पाटील जितका जास्त चिडेल तितका त्यांना पाहिजेच होता.

पाटलानें धोंडोपंत निघून गेल्यावर गपागपा दोन घास पोटांत ढकलले आणि पागोट्याचे पिळे कसे बसे डोक्याला गुंडाळून आबाच्या शाळेची वाट धरली. येथपर्यंत पाटलाची प्रत्येक हालचाल सूडाच्या नशेंत होत होती. परंतु शाळेच्या फाटकाला हात घालतांना तो एकदम गंभीर झाला. आबाला तो काय सांगणार होता ? विठाबाईची मुलगी तानी सातार्‍यास तिच्या नवर्‍याच्या घरीं नेऊं नकोस हें तोंडावर बोलून कसें भागेल ? समजा आपण असें बोललों अन् त्यानें आपल्याला विचारलें कीं तुम्ही कोण सांगणार ? तुमचा अन् तानीचा संबंध काय ? तर आपण काय उत्तर देऊं शकूं ! छेः ! असें उघड उघड सांगणें त्याला शक्य नव्हतें. आडवळणानें दमदाटी करणेंच जास्त श्रेयस्कर ठरणार होतें आणि याच विचारानें तो आंत शिरला.

आंतल्या बाजूस पन्नास पचावन मुलें आपल्या उद्योगांत चूर असलेलीं त्याला दिसली. कांहीं मुलें निरनिराळ्या झाडांचीं पानें दहा दहाचा ढीग करून मोजीत बसली होती. कांहीं मुलें नदींतील वाळूचे मोठाले खडे मोजत होतीं. काहींजण चित्रांची पुस्तकें पाहण्यांत गर्क झालीं होतीं. काहीं जण समोर बारीक वाळू पसरून कामटीच्या काडीनें कसलींतरी अक्षरें तीवर काढीत होतीं. आबा त्यांना कांहींतरी मधून मधून सुचवीत होता. पाटील आल्याची एका मुलानें वर्दी देतांच मुलांना सूचना देऊन आबा चटकन बाहेर आला. त्याचे स्वागताचे गोड शब्द ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत पाटील अर्थातच नव्हते.

" काय मास्तर, शाळा कशी काय चालली आहे ? " पाटलानें कांहींतरी सुरवात करायची म्हणून निरर्थक प्रश्न टाकला.

" वाः ! हें काय पाटील विचारणं तुमचं ? तुमच्या सारख्यांनीं कृपावंत होऊन ज्या कामाला प्रारंभ करून दिला तें काम काय सुरळीत चालणार नाहीं ? या नं. खेडेगावची पोरं आहेत हें तुम्हांला देखील ओळखतां यायचं नाहीं. शहरांतल्या पोराना मागें टाकतील–" आबा अभिमानानें म्हणाला.

" तर्शीं तुम्ही शहरांतली माणसं लई हिकमती ! कुठं जाऊन कशी कळ फिरवाल आन् कुणाला मागं टाकाया लावाल— ! बरं काय हो मास्तर,

तुम्ही म्हनं साताऱ्यास जाणार हाय! माझं बी थोडं काम होतं म्हूण विचाराय टाकोटाक आलों" बारीक नजरेनें आबाच्या हृदयाचा ठाव घेत पाटील उद्गारले. पाटलाचा हा प्रश्न ऐकून आबा क्षणमात्र घोटाळल्यासारखा झाला. आपल्या जाण्याचा तानीच्या जाण्याशी मेळ बसणारा आहे हें पाटलांना कळं द्यावें कीं नाहीं हा विचार त्याच्या मनांत घोळत होता. तो विचारांत पडलेला पाहतांच पाटलांनीं स्वतःची समजूत करून घेतली. बोटचेपें काम आहे, जरा दम दिला म्हणजे नाक तोंड बांधून हा मास्तर शरण येईल अशी त्याच्या मनाची समजूत झाली. त्या समजुतीनें तो आतां जरा करड्या सुरांत पुढें बोलूं लागला, "मास्तर, तुम्हास्नी शाळेचीं लई कामं असत्यात, मी वळाखतों. पर जवां तवां शाळा सोडून असं साताऱ्यास पळाया बघाल तर पोरांची नुस्कानी झाल्याबिगर राहील व्हय! तुम्हास्नी ही शाळा चालवाया दिली तवां असं आपलं ठरलं व्हतं कीं शाळेचीं सरकारी कामं म्यां सोतां पघायचीं आन् तुम्ही मुकाट पोरांस्नीं दाबायचं. मग आतांच कुठं बिघडलं, जी! काय तुमचं काम असेल त्ये मला सांगून ठिवा. मी उद्यां नायतर शनीवारीं साताऱ्याला जाईन तवां—"

पाटील, नुसतं शाळेचं काम असतं तर तुम्हावर सोपवून मी निर्घोर राह्यलों असतों. पण जरा थोडंसं खाजगी काम आहे म्हणून—"

"खासगी? मास्तरला काय खासगी कामं असत्यात, जरा वाईच शिकवा तर मला! मास्तर, तुम्ही श्येनी माणसं हायती. तुम्हास्नी आम्ही आडाण्यानी काय शिकवायचं! पर जरा सांगून ठिवतों तें ऐका. गांवच्या भानगडींत तुमी शहरांतल्या मानसांनीं हात घालाया म्हंजे जरा विचार कराया व्होवा. मला तुमच्या हिकमती ठाव नायती व्हय! तानीला तिच्या घरीं नांदाया घेऊन चालला आन् सांगतायसा शाळेच्या कामासाठीं निघालों. मला फसवाया तुम्ही मला तुमच्या शाळेंतलं शेंबडं प्वार समजाताया व्हय!" पाटलाचें हें अरेरावीचें भाषण ऐकून आबा जास्तच गंभीर झाल्यासारखा दिसला. पाटलाची ही वर्तणूक म्हणजे शुद्ध गावगुंडी होती हें त्याला समजत होतें. परंतु पाटलाला समजून सांगणें कसें शक्य होतें? शेवटीं तो शांतपणानें म्हणाला, "पाटील, तुमच्यापासून ही गोष्ट मी मुद्दामच चोरून ठेवली होती. तुम्हाला विनाकारण दुखवणं माझ्या जिवावर येत होतें म्हणून

मी गप्प होतों. पण मला वाटतं, तुमच्याचप्रमाणें मलाही माझें हित अहित चांगलें कळतें आहे. विनाकारण दमदाटी करून मला माझ्या निश्चयापासून मागे घेऊं शकूं अशी कल्पना करीत असाल तर ती चूक आहे. तुम्ही थोर अधिकारी आहां. न्याय देणं हें तुमचं काम आहे. दुसऱ्याला अन्यायानं आडवणं तुम्हांला शोभणार नाहीं. "

मिशीची एक बाजू दाताखालीं चावीत पाटील गुरगुरला, "मला गोष्टी सांगूं नका, पाटलाशीं गांठ आहे हें इसरूं नका. गांवची काळजी मला तुमच्यापरीस जास्त कळते आहे. माझ्या गांवांतल्या पोरीला शिंदळ ठरवून तिला घरांतून काढून लावतो त्याचा समाचार घेन्याचं माझं काम हाय! तानीची यवस्था मी पघन. मीच तिला घेऊन साताऱ्यास तिच्या नवऱ्याकडे जाईन आन गांवची अब्रूशाप करून घेईन—"

"पाटील, झाल्या गोष्टी विसरून जा. मी तुमच्या गांवचा नाहीं हें मला कबूल आहे. पण गांवचे म्हणून तुम्ही त्या पोरीच्या आयुष्याचं मातेरं करावं हें मी कसं सहन करून घेऊं? हें बघा, जरा शांत व्हा. माणसाची ज्वानी आज ना उद्यां निघून जाते पण ज्वानीतील मूर्खपणा मरेपर्यंत डोळ्यासमोरून हालत नाहीं. तानीच्या आयुष्याचीं चार वर्षं खाल्लींत तेवढी पुरें नाहीं का झालीं? का त्या बिचारीचे शिव्याशाप घेतां?" आबा पाटलांच्या तोंडाकडे पाहात म्हणाला, मोठ्या प्रयासानें पाटलांनीं आपला अपमान दडपून टाकला. आबाचें म्हणणें त्यांना पटत होतें अशांतला भाग नाहीं. तें पटत नव्हतें म्हणूनच त्यांच्या अंगाची काहिली होत होती. चार वर्षें त्या पोरीच्या वाटेकडे डोळे लावून आपण बसलों होतों आणि अचानक हा शंभु मधेंच येऊन उपटतो आणि तिला आपल्या पकडींतून सोडवून नेतो म्हणजे काय गोष्ट आहे? आपण गावचे पाटील अन् हा एक भिकार मास्तरडा! यान आपल्याला दमदाटी करावी अन् ती आपण गुमान ऐकून घ्यावी? याचे पाय आपणच धरणीला लावून दिले अन् त्याच पायानें हा आपल्याला लाथ मारतो आहे! परंतु आबाला यापेक्षां उघड बोलणें त्याला शक्य नव्हतें.

"लई धर्माचे अवतार तुमी दिसतां की, राव! अजून तुम्हाला बजावतों कीं तानीच्या लफड्यांत तुमी पडूं नका. पडाल तर पुढं पस्तावाल."

एवढेंच धमकीवजा बजावून पाटील त्याच पावलीं आला तसा निघून गेला. विनाकारण हा एक शत्रु आपण इतक्यांतच निर्माण करून घ्यायला नको होता असें क्षणभरच आबाच्या मनांत आलें. परंतु त्याचें चुकलें होतें कुठें ? स्वत:च्या अधिकाराच्या तोऱ्यांत बायाबापड्यांना नडवणें हें पाटलाला तरी शोभतें का ? अन्याय, अन्याय तरी किती करायचा लोकांवर ? त्याला कांहींच मर्यादा असूं नये काय ? आबानें दुसऱ्याच क्षणीं स्वत:चें समाधान करून घेतलें कीं खेडेगांवांत या गोष्टींचें आडमाप पीक असतें. त्याला भिऊन वागण्यांत कांहीं अर्थ नसतो. कालांतरानें आठवणी बुजून जातात आणि पुन्हा सलोखा निर्माण होतो. आज पाटील रागावला असला तरी कांहीं दिवस गेल्यावर त्याचा मूर्खपणा त्याला कळून आल्याशिवाय राह्यचा नाहीं. आबा स्वत:शींच विचार करीत मुलांच्याकडे आंत निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं झिंग्याला चार तात्त्विक सूचना देऊन आबा तानीला घेऊन गांवातून बाहेर पडला.

साताऱ्यास गेल्यावर करण्यापैकीं दोन कामें आबाला महत्त्वाचीं होतीं. पैकीं तानीला तिच्या नवऱ्याच्या घरीं नेऊन गुदरायचें काम त्याला प्रथम वाटलें इतकें अवघड ठरलें नाहीं. तानीची सासू गेल्याच वर्षी परलोकवासी झाली होती त्यामुळें सासूची आडकाठी आतां उरली नव्हती. तानीचा नवरा इंग्रजी चार इयत्ता शिकलेला होता. शहरांत आजवरचें आयुष्य गेल्यामुळें आबाच्या सुसंस्कृत बोलण्याची त्याच्या मनावर तत्काळ छाप पडली. आबानें सर्व खुलासा केल्यावर त्यानें फारशी कुरकूर केली नाहीं. मात्र यापुढें आपण तानीला गांवीं कधींही जाऊं देणार नाहीं ही अट त्यानें पुढें मांडली. आबानें ती अट इष्टापत्ती समजून तात्काळ मान्य केली व इतका वेळ बाहेरच रडत उभ्या असलेल्या तानीला मोठ्या मिनतवारीनें आंत आणून तिला नवऱ्याच्या पायावर घातली. तानीच्या नवऱ्यानें आपले डोळे कोरडे केले. तानीचा नवरा माणसांतला आहे हें आबानें ताबडतोब ओळखलें. झाल्या गेल्या गोष्टींचा विचारसुद्धां मनांत आणूं नये अशा तऱ्हेनें दोघांनाही बजावून आबा आपल्या दुसऱ्या कामाकडे गेला. आणि हें काम त्याला वाटलें तितकें सोपें गेलें नाहीं.

चालू सरकारी खात्यांत अत्यंत गबाळग्रंथीखातें म्हणजे शाळाखातें. ये
कुणी कोणाला लवकर ओळखायचा नाहीं आणि कशाचा कशाला मे
नसायचा हें अगदीं ठरून गेलेलें असतें. इतर खात्यांच्या वाट्या
चांगल्या चांगल्या इमारती लावून दिल्यावर शेवटीं शिक्षणखात्याची आ
वण व्हायची. आतां प्रश्न असा येऊन पडतो कीं जागा तर नाहीं अ
खातें तर लोकांच्या मुर्वतीसाठीं ठेवलें पाहिजे. शेवटीं अगदीं भिका
दिसणारा असा एकादा भुताचा बंगला या खात्याकडे सोपवून देण्यांत ये
आणि टळली एकदाची ब्याद या सुटकेच्या विचारानें सरकारी अधिका
शाळाखात्याच्या नांवानें अंघोळ करून मोकळे होतात. खुद्द शाळाखात्यांत
लोक तरी काय तरतरीत असतात पण! शाळाखात्याच्या एकंदर कामाच
उरकशक्तीकडे पाहिलें म्हणजे सहज मनांत विचार येतो कीं सर्वसृ
निर्माण करण्याच्या अतीवश्रमानें श्रांत होत्साते प्रभुक्षीरोदधींतील आपल
शय्येवर अंग टाकण्याच्या विचारांत असावेत आणि कुणीतरी बाहेरू
ओरडले असावे कीं 'अरे, एक राह्यलंच. या विद्वान् लोकांचं कराय
काय?' दमल्या भागल्या मेंदूला जास्त ताण द्यायला प्रभु राजी नसावेत
भली मोठी जांभई देऊन डोळे मिटत त्यांनीं उत्तर केलें असावें, 'का
शिंची पिडा आहे या लोकांची. प्रत्येक गोष्टींत मी मेलं पाहिजे यांच्यासाठ
तें कांहीं नाहीं. आतां आपण डाराडूर झोपणार. त्या विद्वानांना तुम्हा
वाटलं तर आचाऱ्याचीं कामं द्या नाहीं तर आचार्य बनवा. काय लागे
तें करा. मला त्रास देऊं नका—'

आणि एका कोपऱ्यांत मान खालीं घालून बसलेले विद्वान् तेथून उठ
ते थेट शाळाखात्यांत येऊन खुर्च्या धरून बसले. असा हा मामला आ
सरकारी हायस्कुलांत एकादा मास्तर जास्त त्रास देऊं लागला कीं त्या
तेथून उचलतात आणि इन्स्पेक्टरच्या रांकेंत ढकलून देतात आणि ते
आल्यावर तोही इतर मास्तरांची ढकलाढकली करण्याचा खेळ खेळूं लाग
असा प्रकार पाह्यला मिळतो. ठरलेल्या वेळीं आगगाडी ही येऊन पोहों
लीच पाहिजे, ठरलेल्या वेळीं विमान ठिकाणावर हजर झालेंच पाहि
परंतु ठरलेल्या ठिकाणीं ठरलेल्या वेळीं ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर हज
असलाच पाहिजे असा कांहीं नियम काढून देतां येणार नाहीं. आबा

दोन वेळां चकरा माराव्या लागल्या तेव्हां तिसऱ्या खेपेस पट्टेवाल्यानें त्याला साहेब आल्याची सुवार्ता ऐकवली. परंतु साहेब कामांत असल्यामुळें त्याला एकदम त्याची गाठ घेणें शक्य झालें नाहीं. तास दोन तासांनंतर त्याला आंत जाण्याची सूचना मिळाली. आंतला देखावा पाहून आबाला मनांतून संताप आला.

एक काळेलीशी ठेंगणी मूर्ति युरोपीय पोषाख अंगावर चढवून टेबला-पाशीं बसलेली होती. उजव्या हाताला एक इंग्रजी कादंबरी अर्धवट मिटून पालथी ठेवलेली दिसत होती. साहेबांच्या तोंडांत एक भला लठ्ठ चिरूट जळत होता. आणि पुढें पडलेल्या कपबशींतून राखेचा ढिगारा माजलेला दिसत होता. स्वारी काय काम करीत असावी हें कुणालाही सहज तर्कानें ओळखतां आलें असतें. परंतु गादीला मान द्यायचा असतो.

आबाचें म्हणणें समग्र ऐकून घेतल्यावर साहेबांनीं त्याला किरकोळ इकडचे तिकडचे प्रश्न विचारले. धोंडोपंतासारखा एकादा मुरलेला चलाख मास्तर असता तर त्यानें बरोबर हेरलें असतें. यावेळीं खिशांत हात घालून एकादें बंद केलेलें पाकीट साहेबांच्या टेबलावर ठेवून धोंडोपंत अदबीनें बाहेर येऊन बसले असते. आबाला हे अडाखे माहीत नव्हते. तो वेडपटा-सारखा साहेबांच्या प्रश्नाचीं उत्तरें करीत तेथेंच उभा राहिला. प्रश्नांच्या स्वरूपावरून तरी त्यानें बोध घ्यायला पाहिजे होता! अर्ज केला होता म्हणतां? अस्सं! केव्हां धाडलात अर्ज? बरं—बरं. अजून तुम्हाला कांहींच कळलं नाहीं? असं कसं होईल? तुम्ही वळुंजाहून आलांत होय? बरं, आमचे धोंडोपंत मास्तर काय म्हणताहेत? म्हातारा टुणटुणीत आहे अं? तुमच नांव काय म्हणालांत? कुणी शाळा काढली आहे? अर्ज केला आहेत? केव्हां? अन् अजून तुम्हाला कळलं नाहीं?'—पुन्हां पुन्हां तेच तेच प्रश्न अन् उत्तरंही तींच. शेवटीं झोपेंतून जागे झाल्यासारखें करून साहेब जागचे उठले. हपिसच्या बोळकंडींत शतपावली करीत साहेबांनीं आबाला आश्वासन दिलें कीं योग्य वेळीं योग्य ती चौकशी खात्यामार्फत केली जाईल आणि त्या चौकशीचा रिपोर्ट वर धाडून देण्यांत येईल. योग्य वेळीं वरून उत्तर आलें म्हणजे योग्य वेळीं तुम्हाला येथून कळ-विण्यांत येईल.

मुलाखत संपली हें आबानें तात्काळ ओळखलें. तरीपण वळुंजाला साहेबमजकुरांची स्वारी केव्हां येणार म्हणून त्यानें नम्रपणें पृच्छा केली. त्यावर उत्तर आलें कीं त्याचाही खुलासा योग्यवेळीं अवश्य करण्यांत येईल. साहेबांनी पट्टेवाल्याला हाक मारतांक्षणीच आबा नमस्कार करून बाहेर पडला.

आबा गांवीं परत येण्याची वाट पाहात विठाबाई दोन दिवस डोळ्यांत जीव आणून वावरत होती. आबाला एकटाच परत आलेला तिनें पाह्यला तेव्हां तिचे डोळे पाण्यानें भरून आले. काय माया वेडी असते पण ! इतके दिवस लेक घरांत होती म्हणून विठाबाई ज्याच्या त्याच्याजवळ रडत असे आणि आतां लेक सासरीं गेली म्हणून रडूं लागली. कृतज्ञतेच्या भरांत तिनें रस्त्यांतच आबाचे पाय अश्रूंनी ओले केले. आबानें तिची कशी-बशी समजूत काढली व शेवटीं बजावून सांगितलें, "आतां लेकीला पुन्हा वळंजाला आणूं नका. तुम्हाला वाटलं तर तुम्ही चार दिवस तिच्या घरीं राह्यला जा. पोरांची कांहीं काळजी करूं नका. मी त्यांच्याकडे यापुढें पाहणार आहें—"

"मास्तर, तुम्हीच आतां माझ्या लेकरांचे मायबाप आहांत. तुमच्या ओटींत पोरं म्या वाह्यली आहेत. आतां त्यांचं काय लागेल तें करा—" विठाबाई डोळे पुशीत म्हणाली. "त्यांचं आतां चांगलं भरीत करतों, थांबा ! एकेकाला मराठी अन् इंग्रजी शिकवून असे तयार करतों कीं त्यांनी म्हटलं पाहिजे कीं ही कोण थेरडी आमची आई !" रडतां रडतां विठाबाईला हसूं आवरेना. याचवेळीं पाटलाच्या घरांत धोंडोपंत आणि पाटील कानगोष्टी करीत उभे होते.

पंधरावीस दिवसानी साहेब वळुंजाला आले व दोन तीन तास धोंडो-पंताच्या घरीं मुक्काम करून आले तसे परत गेले. आबाच्या शाळेला अचानक भेट देण्यासाठीं साहेब आगाऊ न कळवता वळुंजाला आले, आणि आश्चर्याची गोष्ट कीं आबाची किंवा त्याच्या शाळेची गांठही न घेतां परपस्परच निघून गेले ते गेल्यावर धोंडोपंताच्या बोलण्यावरून आबाला ते आल्याचें समजलें तरी. आबा आश्चर्यानें थक्कच झाला. साहेब आले काय नी गेले काय ! अन् आल्यावर गांट ही न घेतां गेले याचा अर्थ काय ?

त्यांची कल्पना तरी काय होती ? हा त्याना प्रश्न ऐकून धोंडोपंत खो: खो: हसून म्हणाले, "अहो आबासाहेब, मला तुमचं मोठं नवल वाटतं ! अहो, त्यांची कल्पना काय होती हें तुम्हीं विचारतां ! तुमची तरी काय काय कल्पना आहे हो ? साताऱ्याहून इतक्या आडवळणाच्या गांवीं साहेबांनीं तुमच्यासाठीं पुढं बॅंड लावून वाजत गाजत यावं, गावच्या वेशीवर तुमच्या नांवानं 'कीं जय'ची आरोळी ठोकावी, तुमच्या भेटीसाठीं धुळीचा बुक्का कपाळीं लावून रस्त्यानं धांवत तुमच्यापुढें यावं अन् तुम्हाला पाह्यल्यावर तुमचे चरण गप्पदिशीं येऊन पकडावेत ! वा ! खूप केलीत महाराजा ! अहो, शाळा काढतों म्हणजे सरकारवर उपकारांचे डोंगर रचून ठेवतों अशी का एकादी खुळचट कल्पना आहे तुमची ? भलेभले ! ही शहरांतली पद्धत आहे वाटतं तुमची ?"

"पण धोंडोपंत, साहेबांनी आपण आल्याची वर्दी दिल्याशिवाय आम्हाला तरी कसं कळणार ?" आबा किंचित् त्रासलेल्या सुरांत उद्गारला.

"पुन्हां तेंच ! अहो, गरज आपल्याला कीं त्यांना ! अन् मला वाटतं त्यांनीं आमच्या शाळेंतला एक पोरगा तुमच्याकडे धाडला होता. तुमचा निरोप आला कीं 'येत नाहीं.' साहेबांच्या निरोपाला बाकी इतक्या तडफेनं उत्तर करणारा पाहिलाच मराठी शाळामास्तर आपण पाहिला बुवा !" धोंडोपंत समाधानी मुद्रेनें म्हणाले.

"हो ! एक मुलगा आला होता खरं. पण त्यानं निरोप बरोबर दिला नाहीं. तुम्ही मला बोलावलं आहेत म्हणून तो म्हणाला, अर्थात् शाळा सोडून मी तुमच्याकडे कसा येणार ?" आबा आठवल्या सारखं करून म्हणाला.

"भले ! मी हो तुम्हाला कशाला बोलावणं पाठवणार ? तुम्हाला बोलावून काय तुमच्याकडून माझे हातपाय रगडून घेऊं ? हें तुमचं शहरी धोरण ! अहो आबासाहेब, जरा थोडं डोकं वापरलं असतं तर चाललं असतं कीं—आतां बसा ! शाळा काढताहेत ! साताऱ्याला साहेबांना भेटायला गेलांत ते एकाद्या कलेक्टराच्या ऐटींत. अहो, देवापुढें जायचं तें सुद्धां तांबडी शिवराई हातांत घेऊन जावं लागतं एवढं साधं ज्ञान तुम्हाला नाहीं ?" धोंडोपंत स्वत:वर खूष होऊन हसत निघून गेले.

आबाचें डोकें झपाट्यानें विचार करूं लागलें. झाला हा प्रकार गैर-समजामुळें घडून आला होता. त्यांत कोणाचाच दोष नव्हता. साहेबांचा आपमान झाला होता आणि म्हणूनच ते आल्या पावलीं परत गेले असावेत. पण आतां यावर तोड काय ? साहेबांच्या एकंदर वागण्यावरून आबानें ओळखलें कीं हा मनुष्य आपला खुलासा ऐकून घेणार नाहीं. येवढेंच नव्हें तर तो आपल्या शाळेचें नुकसान केल्याशिवाय सोडायचा नाहीं. आतां यावर एकच उपाय होता. घाईघाईनें त्या रात्रीं त्यानें अरुणेला सारी घडलेली हकीकत सविस्तर पत्रानें कळवली. औपचारिक रीत्या त्यानें साताऱ्यासही अधिकाऱ्यांच्याकडे खुलासेवजा पत्र लिहिलें. त्यांत त्यानें झाला प्रकार कशा रीतीनें घडून आला हें सांगून स्वतःच्या वरवर दिस-णाऱ्या अवहेलनात्मक वर्तनाबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. दोन्हीं पत्रें त्यानें बाळासाहेबांच्या हवालीं केली व तोंडानें त्यांना सर्व प्रकार सांगून टाकला. बाळासाहेबांनी सर्व कांहीं ऐकून घेतलें व हंसत मुखानें म्हटलें, " ही गांव गुंडी बरं, आबासाहेब ! हळूहळूं तुम्हाला या मंडळींना तोंड द्यायला शिकलं पाहिजे. नाहींतर उद्यां हे तुमच्या माझ्यांत सुद्धां कलागती लावून देतील. तितके ते धूर्त आहेत. बरं —अरुणेच्या ओळखीनं पुण्याहूनच किल्ल्या फिरवून पाहूं या. पाहूं जमलं. तर— "

## —१३—

आशा निराशेच्या चक्रांत सुमारें एक महिना गटांगळ्या खाऊन शेवटीं आबानें जिंकली. मोठी मजेची हकीकत आहे ती.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें साहेबांची स्वारी साताऱ्यास परत गेल्यानंतर आठच दिवसांनीं त्यांच्याकडून लखोटा आला. साहेबाचा घुस्सा आपल्यावर झाल्याची कारण परंपरा आबाला माहीत असल्यामुळें त्याला पत्र वाचून आश्चर्य वाटलें नाहीं परंतु विषाद मात्र अलबत वाटला. साहेबांनीं पत्रांत म्हटलें होतें—" शाळेची एदकंर व्यवस्था योग्य माणसाच्या हातांत आहे असें दुर्दैवानें म्हणतां येत नाहीं. खेडेगांवच्या परिस्थितीशीं अगदीं अनभिज्ञ असा मनुष्य शाळा चालवतो आहे. त्यानें ट्रेनिंगची कोणतीच परीक्षा दिलेली नाहीं. मॅट्रिकपर्यंत त्याचें शिक्षण झालें असावें असें चौकशीवरून कळतें. बारकाईनें जास्त तपास केला असतां असेंही कळून येतें कीं गेलीं दहा वर्षे हा मनुष्य या गांवाहून त्या गांवाला असा हिंडत होता. त्या वेळीं नक्की त्याचा पेशा काय असावा या विषयीं तर्क करण्यास बरीच जागा आहे. अशा अननुभवी व संशयस्पद अशा व्यक्तीच्या हातांत मुलांचें भवितव्य देणें तितकेसें श्रेयस्कर वाटत नाहीं [illegible]प्रमाणें अधिकारी वर्गाविषयीं बेपर्वाई, वरचे हुकूम फेटाळून लावण्याची तत्परता आणि नसत्या

ठिकाणीं कारण नसतां हात घालण्याची अगांतुक प्रवृत्ति या गुणाविषयीं गेल्या चळवतींत ज्या प्रकारच्या लोकांचें विशेष नांव गाजलें त्या लोकांपैकीं एक हा इसम असावा कीं काय असा जबरदस्त संशय घेण्यास भरपूर पुरावा आहे. दुसरें एक कारण आहे. वळूंजें गांवांत सध्या एक लोकलबोर्डाची शाळा आहे. शाळेचें आजवरचें काम अत्यंत समाधानकारक असल्याचें या पूर्वीच्या आधिकाऱ्यांनीं त्या त्या वेळीं नोंदून ठेवलें आहे. या शाळेचे काम धोंडोपंत नांवाचे एक अब्रुदार गृहस्थ पाहात आहेत. गेली अठरा वर्षांची इमाने इतबारें केलेली नोकरी लक्षांत घेतां धोडोपंत हा इसम आपल्या कामालापूर्ण लायक आहे असेंच म्हणावें लागेल. नवीन शाळा चार दिवसांची हुल्लड म्हणून चालेल. परंतु योग्य कर्णधाराच्या अभावीं एक दोन वर्षांतच ती आहे किंवा नाहीं याचा मागमूसही लागायचा नाहीं. परंतु जातां जातां जुन्या शाळेस धक्का देऊन नवी शाळा विराम पावेल. तरी गांवचें लोकमत अजमावून पाहतां नवीन शाळेस मान्यता अगर ग्रँट देण्याचा विचार अत्यंत खेदानें रहित करावा लागत आहे. पुढील वर्षी वरील गोष्टींचा योग्य तो विचार होऊन जर पुन्हां नवीन अर्ज आला तर विचार करण्यांत येईल—" इ०

आबाला विषाद वाटला तो हा कीं शिक्षणाच्या पवित्र पेशाचें आणखी विडंबन दुसरा कोण करूं शकला असता? कुऱ्हाडीचा दांडा नेहमींच गोताला काळ होत असतो त्या म्हणीप्रमाणें शिक्षण खातेंच नेहमीं शिक्षणाचें वैरी ठरावे असा एकादा अलिखित नियम कोणी घालून दिला असावा काय? अज्ञानामुळें, गैरसमाजामुळें एकादे वेळीं प्रमाद होण्याचा संभव असतो परंतु जाणून बुजून मारलेली कुऱ्हाड फार वर्मी लागते. वैयक्तिक हेवेदावे, मत्सर आणि तज्जन्य दुष्ट बुद्धि जगांत कोठेंही गेलें तरी थोड्याफार प्रमाणांत पाह्यला मिळणारच. परंतु पारतंत्र्यांत या दुर्गुणांना जें तेज चढतें त्याची कांहीं थोरवी औरच. साम्राज्यें ज्या ठिकाणीं पणाला लागलीं असतील त्या वेळीं जात भाईच्या जिवावर उठणें एक वेळ समजण्यासारखें आहे परंतु हा नमुना मात्र हास्यास्पदतेपेक्षांही पलीकडचा होता.

वरील पत्रानंतर आठच दिवसांनीं अरुणा आली. तिची परीक्षा आटोपून ती आली होती. हें शेवटचें वर्ष असल्यामुळें पुढें काय करावें हें वडिलांच्या

विचारानें ठरविण्यासाटीं ती इतक्या लगोलग आली नव्हती. तिनें येतांना आपल्या बरोबर एक नखशिखान्त साहेबी पोपाख केलेला तरुण मनुष्य आणला होता तो कोण हें लक्षांत घेता ती इतक्या तांतडीनें वळूंजला कां आली असावी याचा अंदाज लागणें सोपें होतें. त्या माणसाची उतरण्याची सोय इनामदारांच्याकडे होती. अरुणेनें आबाच्या शाळेंत त्या गृहस्थाला दोन दिवस भरपूर हिंडवला. आबाला सुद्धां हा गृहस्थ कोण असावा याचा अरुणेनें थांगपत्ता लागूं दिला नाहीं. अरुणेनें कुणी तरी आपल्या जाळयांत 'अडकवला' या कौतुकाच्या कल्पनेनें गांवातलीं माणसें आपसा आपसात हलकेच चर्चा करूं लागली. अरुणेनें कुणालाही अडवले नाहीं, किंवा कुणाजवळही खुलासा केला नाहीं. दोन दिवसांनीं तो गृहस्थ आला तसा इनामदारांच्या बैलगाडींतून ओढ्यापलीकडे निघून गेला, तेव्हां मंडळी आश्चर्य करूं लागली. जानबा पाटील धोंडोपंतांना विचारूं लागले परंतु धोंडोपंत तरी काय कपाळ सांगणार? कुणी कांहीं तर्क केले, कुणी कांहीं म्हटलें तरी अरुणेनें अक्षर तोंडावाटें काढलें नाहीं. आबानें तिला दोनदां तीनदां विचारण्याचा प्रयत्न केला होता परंतु 'योग्यवेळीं कळेलच' या सूत्रमय उत्तराखेरीज ती कांहींच बोलायला तयार होईना. हें पाहताच आबानें त्या गृहस्थाचा विचार डोक्यांतून काढून टाकला. त्याला जर त्यांतल्यात्यांत कशांत समाधान वाटलें असेल तर तें एकाच गोष्टींत आणि ती गोष्ट म्हणजे हीच कीं तो गृहस्थ आपल्या शाळेंत दोन दिवस मोठ्या कौतुकानें आला, त्यानें आपल्याला मोठे सूचक प्रश्न केले, आणि आपण त्याच्या प्रश्नांचीं उत्तरं देत असतां तो समाधानपूर्वक मान हालवीत होता. ध्येयवादी माणसाला यापेक्षां जास्त काय पाहिजे असतें? आपल्या कार्याचें कौतुक करणारा एकादा जरी गृहस्थ मिळाला तरी तेवढें उत्तेजन त्याला पुरे होतें.

तो गृहस्थ परत निघून गेल्यावर सुमारे पंधरा दिवसांनी साताऱ्याहून एक लखोटा आला. हाही लखोटा पूर्वींच्याच साहेबांच्या हपिसांतून आलेला दिसला. पत्र आलें तेव्हां आबा एकटाच शाळेंत होता. आश्चर्यानें पत्र तो वाचूं लागला. आणि पुढील मजकूर वाचून स्वतःच्या डोळयावर विश्वास ठेवणें देखील त्याला जड वाटूं लागले. पत्रांत म्हटलें होतें, "ह्यांच ऑफिसांतून तीन वारांपूर्वी जो खलिता धाडण्यांत आला होता तो रद्दबातल

समजावा. त्यामधें जी विधानें करण्यांत आलेली होतीं तीं मुद्दाम विपर्यस्त अशी माहिती कांहीं लोकाकडून मिळाल्यामुळें चुकून करण्यांत आलेलीं होतीं. त्याबद्दल खेद व्यक्त करण्यांत येत आहे. ज्यांनीं खोडसाळपणानें ती माहिती पुरवली त्यांची चौकशी योग्य वेळीं खात्या मार्फत करण्याचें अश्वासन देण्यांत येत आहे. खात्याचे अधिकारी मुद्दाम पुण्याहून नव्या शाळेला अचानक भेट देण्यासाठीं दोन दिवस गेले होते. त्यांनीं अत्यंत बारकाईनें सर्व परिस्थिति अजमावून पाहिली; मुलांची बौद्धिक प्रगति पाहून त्यांना अत्यंत समाधान होत आहे. त्याचप्रमाणें शाळा ज्यांच्या हातांत आहे ते शिक्षक उच्च ध्येयानें प्रेरित होऊन आपलें कार्य अत्यंत निरलसपणें बजावीत आहेत असेंही अधिकारी वर्गाच्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे.विशेषतः शिक्षकाच्या तळमळीची जेवढी प्रशंसा करावी तेवढी अपुरीच पडेल. इतका समंजस, हुशार आणि लायक मनुष्य शाळा चालवायला मिळाला हें गांवच्या दृष्टीनें गौरवार्ह आहे. या हुकुमानें शाळेला सरकारी मान्यता देण्यांत येत आहे. आणि त्याच बरोबर सालाचे शंभर रुपये ग्रॅटदाखल मंजूर करण्यांत येत आहे. ही नवीन शाळा उत्तरोत्तर आपलें कार्यक्षेत्र जास्त विस्तृत करून आपला लौकिक व दर्जा वाढवण्याचा प्रयत्न करील असा विश्वास वाटतो—

पत्राची घडी करून आबासमोर पाहूं लागला. या घटनेवर विश्वास न बसण्याजोगी स्थिति होती खरीच. आबानें तें पत्र पुन्हां एकदां समग्र वाचून काढलें. आणि तिसऱ्या खेपेस पुन्हां तो त्या पत्राची घडी उलगडणार तोंच त्याला एकदम हसूं आलें. आपल्या खुळचटपणाचें त्याला हसूं आलें. त्याचबरोबर झिंग्या पुढें आणि मागे अरुणा अशी दुक्कल शाळेच्या फाटकांतून आंत शिरतांना त्याला दिसली—आणि त्यांना पाहून त्याला हसूं लोटलें. वास्तविक यांत हसण्याजोगें काय होतें? परंतु हृदयावरचें चिंतेचें दडपण दूर होऊन हृदय आनंदानें भरून आलें म्हणजे मनुष्य साध्या गोष्टींतही मौज पाहूं लागतो. आजवर अरुणेची चेष्टा करायचा विचार आबाच्या मनांत कधींही आला नव्हता. तो आज मात्र खूप चेष्टा करणार होता. अरुणेला पहातांच त्यानें हातांतील लखोटा सदऱ्याच्या खिशांत लपवून ठेवला. आणि चेहरा शक्य तितका गंभीर करून तो इकडे तिकडे शतपावली करूं लागला. रॅटिसबॉनच्या लढ्याच्या वेळीं नेपोलियन

ज्या चिंतातुर मुद्रेनें स्वतःशीच विचार करीत आपल्या छावणीमधें हिंडत होता म्हणून वर्णन करण्यांत आलें आहे तें वर्णन आठवून आबा स्वतः-शींच किंचित् हसला. दुसऱ्याच क्षणीं त्यानें आपली भूमिका लक्षांत घेऊन उदास चेहेऱ्यानें शतपावली सुरू केली.

अरुणा एकटीच घाईघाईनें आंत आली. आबाची चर्या पाहतांक्षणींच ती घोटाळून दारांतच थबकली.

" आज टपालाचा दिवस आहे. शाळेचं कांहीं टपाल आलं आहे कां ? " अरुणेनें दबकत दबकत प्रश्न केला. जमिनीवर खिळलेले डोळे वर न उचलतां आबानें मानेनेंच नकार दिला. अरुणेनें तो नकार पाहतांच तोंड चमत्कारिक केलें. आबानें तिच्या डोळयांकडे यावेळीं पाहिलें असतें तर तरुण स्त्रीची निराशा करणें किती दुष्टपणाचें काम आहे याचा अंदाज त्याला लागला असता. आणि चेष्टा करण्याचें त्यानें ताबडतोब सोडून दिलें असतें.

" पण असं कसं होईल ? आजचा अगदीं शेवटचा दिवस होता. आज कांहींतरी कळायला पाहिजे होतं—" अरुणा अर्धवट स्वतःशींच त्रासिक मुद्रेनें पुटपुटली.

" तुम्ही काय बोलतां आहांत हें मला समजेल काय ? अखेरचा दिवस कशाचा ? अन् काय कळायचं होतं ? तुमच्या खासगी गोष्टींत मी लक्ष घालायला नको होतं परंतु तुम्ही कांहींतरी शाळेच्या पत्त्यावर पत्रानें माग-वलं असेल अशी शंका तुमच्या आत्तांच्या बोलण्यानें आली म्हणून विचा-रतों." आबा गंभीर मुद्रा करून म्हणाला.

" आबासाहेब, तुम्ही इतकं मनांत ठेवणारे असाल असं मला वाटलं नव्हतं. माझ्याबरोबर आलेल्या गृहस्थांविषयीं तुम्ही विचारलं असतां मी उडवाउडवीचीं उत्तरं दिली हें मी कांहीं हेतु मनांत धरूनच केलं होतं. त्यांत तुमचा अपमान करण्याचा माझा हेतु मुळींच नव्हता. पण तें लक्षांत ठेवून तुम्ही अशी पार्लमेंटरी भाषा वापराल असं नव्हतं मला वाटलं—" अरुणा उद्विग्नतेनें म्हणाली.

" माझ्या एकाद्या वाक्याचा तुम्हाला राग आला असेल तर तें वाक्य मी माघारा घेण्याची तुमची परवानगी घेऊं काय ? " आबा पूर्वीच्याच

संथपणानें पुन्हां म्हणाला. अरुणेनें किंचित् चिडखोरपणानें आपला उजवा पाय आपटल्यासारखें केलें आणि ती बाहेर जाण्यासाठीं वळली. आबानें शेवटचें वाक्य घाईनें बोलून घेतलें.

" अरुणाताई, मग आतां तरी तो मनुष्य कोण होता हें सांगाल काय ? " जाणारी अरुणा थोडा वेळ थबकून उभी राहिली. थोड्या वेळानें ती खिन्नपणानें म्हणाली.

" करायचं आहे काय आतां सांगून ? होता एक मसण्या ! शेवटीं तोही मसणांतच गेल्यासारखा दिसतो आहे. कोण शिकस्तीनं मी पुण्याला त्याची गांठ घेतली. आमच्या प्रिन्सिपालकडून चिठ्ठी घेतली होती ती त्याला दाखवली अन् त्याला बरोबर घेऊन आलें. म्हटलं समक्षच पाहा एकदां सगळ्या गोष्टी. आमच्या प्रिन्सिपॉलनी चिठ्ठी देतांना शंकाकुशंका काढ-ल्याच होत्या. पण मी हट्टानें त्यांच्याजवळून चिठ्ठी घेतली अन् या बाब्याला घेऊन आलें. शेवटीं ह्या बाब्यानेंही जातीवर जाऊन आपले खूर दाख-वलेले दिसताहेत. उशिरांत उशीरा आज कळायला पाहिजे होतं—" अरुणा एक पाय बाहेर ठेवून जाण्याच्या तयारींत होती.

" अरुणाताई, पुरुषानीं नुसते आपल्या पराक्रमाचें फुसके गोडवे गात शेखी मिरवावी आणि स्त्रियांनी एक अक्षर कुणाला न कळूं देतां खरे परा-क्रम करीत राहावं हा जगाचा न्याय आहे कीं काय मलां ठाऊक नाहीं. पण तुम्ही म्हणतां तसलं कांहीं आलं आहे खरं पोस्टांतून. पहा बरं तेंच का तें आहे ? " शेवटीं आबानें गौप्य–स्फोट केला. आबाच्या हातांतील तो लखोटा हिसकावून घेण्यासाठीं अरुणा किती अल्लडपणानें नाचत नाचत धावली पण !

" मी आंतल्या गांठीची आहे पण तुम्ही माझ्याहीवर ताण दिसता की. तुमचं नाटक पाहून मी तर खलासच झालें होतें." अरुणा पत्राची घडी करून परत तें त्याच्या हातांत देत म्हणाली. आणि मग अरुणेनें डी. पी. आयच्या ऑफिसमधून आपण कसें हिंडलों व येतांना डी. पी. आयनें मुद्दाम चौकशीसाठीं धाडलेल्या या माणसाला कसें बरोबर घेऊन आलों. इत्यादि हकिगत आबाला सांगितली. " आणि तो गृहस्थ इथें असतांना त्याच्याविषयीं कांहींही बोलणं आपल्याला एकादे वेळीं घातक ठरण्याचा

संभव होता. पाटलाला अन् धोंडोपंताला कळूं न देण्यासाठीं मी मुद्दामच मूग गिळून बसलें होतें. खुद्द तुमच्या वेणूताईनी अन् विठाबाईनं तर मला आशीर्वादही देऊन टाकला. बिचाऱ्यांची पुरती निराशा होईल हें कळल्यावर [illegible] त्या गृहस्थाकडून खात्रीनं बातमी काढली असेल पण ते माझ्यापेक्षां जास्त आंतल्या गांठीचे आहेत. आबासाहेब, तुमच्या शाळेवरचं एक संकट टळलं हें छान झालं, नाहीं ? ” अरुणा त्याच्याकडे पाहात म्हणाली.

“ मला लहापणापासून हीच शिकवण मिळत गेली आहे. संकटाची काळजी करून संकटं जात नसतात. त्यांच्याविषयीं कसलाच विचार केला नाहीं म्हणजे तीं जशी लहरीनीं येतात तशीच लहरींनी निघून जातात. थांबा, पुढें ऐकून घ्या नं. प्रत्येक संकटाच्या वेळीं माझी पूर्ण खात्री असते कीं गजेंद्रमोक्ष करायला कोणत्या ना कोणत्या रूपानें परमेश्वर माझ्या साहाय्याकरतां धाव घेत असतो. ह्या खेपेस तुम्ही धांवून आलांत—मला मोठं नवल वाटतं तुमचं. तुमच्या तोंडावर स्तुति करावी अशांतला भाग नाहीं पण तुम्हाला माझ्या हाकेला धावून यायची कां बुद्धि व्हावी हें कोडें मला अजून सुटलेलं नाहीं—” आबा म्हणाला.

“ असलीं वायफळ कोडीं सोडवीत बसण्यापेक्षां तुम्हीं आपला वेळ तुमच्या कार्यांत खर्च करा. तुम्ही बोलतां बोलतां स्तुति करीत नाहीं म्हणून म्हणालांत अन शेवटीं तीच चूक मोठ्या हिकमतीनं करून दाखवलीत. पण—तुम्हांला खरं सांगूं ? मलाही पण या प्रश्नाचं समाधानकारक उत्तर करतां येणार नाहीं. तीन वर्षांपूर्वी मीं मोटरनें चाललें होतें तेव्हां तुमची प्रथम गांठ पडलीं. तुम्ही मोठ्या आपुलकीनें माझी विचारपूस केलीत. मला त्यांतल्यात्यांत बरं वाटल. तुमच्या सहानुभूतीचा स्वर ऐकून मला एकदम मोकळं मोकळं वाटूं लागलं. तरी त्यावेळीं तुमच्याकरतां कांहीं करावं असं वाटलं नाहीं हें मी कबूल करतें—”

“ मग पुढें केव्हां माझी दया आली ? ”

“ दया कसली कर्माची घेऊन बसलांत. जेव्हां तुम्ही पत्रावर पत्रं धाडून माझा पिच्छा पुरवूं लागलात तेव्हां म्हटलं ‘ हा गृहस्थ म्हणतो आहे तरी काय’ म्हणून मी तुमचं म्हणणं नीट ऐकून घेतलं. ज्या गांवात माझा जन्म

झाला त्या गावासाठीं मी कांहींहि केलं नाहीं हा विचार मधून मधून केव्हां तरी माझ्या मनांत येत असे. त्यांत माझ्या आईची शिक्षणावरची निःसीम श्रद्धा मला नेहमीं विचार करायला लावी. तुमचं म्हणणं ऐकून माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. बाळासाहेबांना सांगून तुम्हांला शाळा काढून द्यावी म्हणजे आईची इच्छा अल्पांशानें का होईना पार पडेल अन् तुमचेहि काम होईल या दुहेरी विचाराला बळी पडून मी तुमच्या कार्यांत लक्ष घालूं लागलें. तरीसुद्धां खरं बोलायचं म्हणजे मला इतकं लक्ष द्यावंसं वाटलं नाहीं—" अरुणा प्रांजलपणानें सारें सांगून टाकत होती. आबा मुकाट्यानें ऐकून घेत होता. अरुणा पुढें म्हणाली—

"पण तो डी. पी. आय. चा मनुष्य दोन दिवस तुमच्या शाळेंत मी आणला तेव्हां त्याच्याबरोबर मी हिंडत होतें. त्या वेळीं तुमचें काम मला प्रत्यक्ष पहायला मिळालें. तुमचें आणि त्याचें प्रश्नोत्तरांनीं चाललेलें संभाषण मी लक्षपूर्वक ऐकत होतें. आणि त्याच वेळीं माझ्या मनांत आलें कीं, रागावूं नका हं,—कीं तुम्हांला जर उदारपणानें सध्याच्यापेक्षां जास्त मदत जर कुणी केली तर तुम्ही खेडेगांवची शाळा म्हणजे दुसरं नंदनवन बनवूं शकाल. तुमच्या अंगांत ती धमक आहे ह्याची मला परवां खात्री वाटली. काल बावळट वाटणारीं हीं शेंबडीं गांवढळ पोरं तुम्ही पार बदलून टाकलीं आहेत. आमच्या धोंडोपंतांना सात जन्मांत जें करतां यायचं नाहीं तें तुम्ही अवघ्या वर्षांत करून दाखवलं आहेत."

"एकाची स्तुति म्हटलं दुसऱ्याची निंदा न करतांसुद्धां यथोचित करतां येते." आबा हलकेंच मध्येंच म्हणाला.

"खरं आहे तुमचं म्हणणं. मला कबूल आहे तें. पण सामान्य मनुष्य इतक्या उच्च कोटीला पोहोंचलेला नसतो. तो नेहमीं तुलनेनेंच बरेंवाईट ठरवीत असतो. बाकी आबासाहेब, धोंडोपंत अन् पाटील यांना हें कळल्यावर थोबाडींत मारल्यासारखे चूप बसतील, नाहीं?" अरुणा हंसत म्हणाली. परंतु आबा हंसला नाहीं.

"मी तुमच्या गांवचा नसलों तरी मनुष्यस्वभाव इथूनतिथून सारखाच असतो. त्या हिशोबावरून मला तर वाटतें कीं, ती मंडळी आतां दुसरीकडे

कुठें तरी तोंड फोडल्याशिवाय राह्यचे नाहींत. काय नेम सांगावा ? तुमच्या माझ्यांतसुद्धां कलागति लावायला ते कमी करायचे नाहींत–" आबा म्हणाला.

" हूं:! विचारतो कोण त्या माकडांना ? आपली बाजू सत्याची असल्यावर आपल्याला कुणाची डर आहे ? " निष्काळजीपणाच्या सुरांत अरुणा उत्तरली.

" पण जगांत नेहमींच सत्याचा जय होतो असं का तुम्हाला वाटत आहे, अरुणाताई ! कॉपीबुकांतलीं तीं वचनं पुढें आयुष्यांत विसरायचीं असतात बरं. माणसानं सत्य आणि असत्य व त्याचे भलेबुरे परिणाम स्वतःच्या समाधानासाठीं निर्माण करून ठेवलेले आहेत. जगांत सत्याचा नेहमींच जय झाला असतां तर युद्धें झालींच नसतीं. कोर्टांतून लोकांनी कज्जे लढवलेच नसते. आणि कोणत्याहि चांगल्या कार्याला विघ्नं आलींच नसतीं. सत्य हें नेहमींच सापेक्ष असतें. तें पाहणाराच्या दृष्टिकोणाप्रमाणें फिरत असतें म्हणूनच सगळा घोटाळा उडतो. एक युद्धमान राष्ट्र म्हणतें आमची सत्याची बाजू आहे. दुसरें प्रतिस्पर्धी राष्ट्र नेमक्या त्याच कारणासाठीं रणांगणांत उतरलेलें असतें. शेवटी विजय होतो परिस्थितीचा. सत्याचा नाहीं. सत्यासत्यतेच्या लढ्यांत परिस्थिति ज्या बाजूला दान टाकील त्या बाजूचा विजय होत असतो. लांबचीं उदाहरणं कशाला ? आमच्या घरांतलेंच उदाहरण काय सांगतें ? आम्हा नवरा–बायकोच्या लढ्यांत मी तात्पुरता विजयी ठरलों आहे. तसं म्हटलं तर माझ्या पत्नीचा तरी कोणता असत्य पक्ष आहे ? तुम्हाला मी एकदां सारी हकीकत ओघाओघानें बोलून गेलों होतों म्हणून विचारतों कीं माझ्या पत्नीला तरी माघार का घ्यावी लागली ? तिच्या दृष्टीनें तिचें काय चुकलें आहे ? असा विचार मनांत आला कीं त्या जिवाला माया लावावीशी वाटते. ती स्वभावतः दुष्ट नाहीं. आपले पाटील किंवा धोंडोपंतही तसे दुष्ट नाहींत. अर्थात् आपलं कर्तव्य हेंच कीं, त्यांच्यामुळें आपल्या कार्यांत विघ्न निर्माण होऊ नये एवढ्यासाठीं डोळ्यांत तेल घालून जपायचं–"

आबा बोलण्याच्या वेगांत आणखी किती तरी वेळ बोलत बसला असता. परंतु झिंग्यानें आपलें डोकें दारांतून आंत कलंडविलेलें पाहतांच आबा थांबला. अरुणा निघून गेली तरी आबा स्वतःशी विचार करीत बराच वेळ

तेथेंच उभा होता. मुलें एका पाठोपाठ एक एक जमूं लागली होती. अरुणेनें त्याला सूचना केली होती कीं आनंदाप्रीत्यर्थ आजचा दिवस शाळेला सुट्टी देण्यांत यावी. परंतु आबानें तिची सूचना अमान्य केली. उलट आनंद झाला म्हणून आज दुप्पट जोरानें शिकवावें लागेल असा युक्तिवाद करून त्यानें तिचें म्हणणें खोडून काढलें. शाळेंत आल्याबरोबर हातपाय तोंड धुवून येण्याची आबाची शिस्त प्रत्येक पोरगा मोठ्या आस्थेनें पार पाडीत होता. त्यांच्यावर देखरेख करण्याचें काम झिंग्या मोठ्या तत्परतेनें करीत होता. त्या मुलांकडे पाहून आबाचें मन जास्तच हेलकावे खाऊ लागलें.

खरोखरीच सोन्यासारखीं बाळं होतीं तीं. खेडेगांवांत जन्मली म्हणून खेड्यांत वाढत होती. आईबापांचें दारिद्य बिचाऱ्यांच्या वाट्याला आलें म्हणून फाटके कपडे पेहेरून येत होतीं. आईबापांच्या खोट्या समजुती अनुकरणामुळें स्वतः उचलींत होतीं. हींच मुलं शहरांत जन्मलीं असतीं तर कदाचित् निराळ्या परिस्थितीमुळें जरा जास्त नीटनेटकी आणि तरतरीत दिसलीं असतीं. देवाघरची लेणीं म्हणून मुलांना संबोधतात तें कांहीं उगाच नाहीं. अज्ञानामुळें आपल्याला त्यांचें तेज दिसत नाहीं. परंतु हीं मुकीं मेंढरें वाटणारी आजचीं मुलं उद्यां आपल्या देशाकरतां काय करूं शकणार नाहींत ? त्यांच्यांत जर योग्य तो अभिमान आज निर्माण केला तर इतर स्वतंत्र देशांतल्या मुलांप्रमाणें तीं आपल्या देशासाठीं हातावर शीर घेऊन लढायला डरतील ? नाव कशाला ! कोठल्याहि देशांतलें लहान मूल असेंच प्रथम असतें. खाणींतून खणून काढलेलें सोनें प्रथम असेंच दिसायला मंद असतें. त्यांत भेसळही खूप असते. परंतु सुवर्णकाराच्या भट्टींत वितळून शुद्ध केलेलें सोनें आणि शिक्षणाचे योग्य संस्कार देऊन वाढवलेलें मूल— दोन्हीही सारखींच योग्यतेची असतात ! पण हें लक्षांत यायला पाहिजे. आपण जो प्रयत्न इतक्या छोट्या प्रमाणावर करतों आहोंत तसलाच जगड्व्याळ प्रयत्न कुणीतरी करायला पाहिजे. सोन्याचा भेसळपणा काढून टाकण्यासाठीं जसा कसोशीनें प्रयत्न केला जातो त्याप्रमाणें माणसांतील जन्मजात दुर्गुण काढून टाकण्याचा प्रामाणिक प्रयत्न झाला पाहिजे. एकमेकाचा मत्सर,दुसऱ्याच्या उत्कर्षाविषयीं असहिष्णुता, दिसेल तें सर्व माझेंच

असलीं स्वार्थी प्रवृत्ति या गोष्टींपायींच मनुष्य आंधळा बनतो आणि दुस-ऱ्याचे गळे कापायला सज्ज होतो. पृथ्वीच्या पाठीवर एक दशक कांहीं असें जात नाहीं कीं सर्व देश अत्यंत गुण्यागोविंदानें नांदत आहेत. ही लांडगे-तोड कशासाठीं ? एक मनुष्य जन्म अत्यंत मोलामहागाचा, केव्हां तरी वाट्याला यायचा आणि तोहि असा हेव्यादाव्यांत घालवायचा तर मनुष्य-जन्माचें सार्थक तरी काय साधलें ? कशासाठीं मनुष्यजन्म आपल्याला मिळाला आहे ?

ज्या जगांत आपण लहानाचें मोठें होतों त्या जगाविषयीं कृतज्ञता बुद्धीनें आपल्याला कांहींच करावयास नको का ? आयुष्याचीं जीं काय भलीं बुरीं वर्षें आपल्या वाट्याला आलीं असतील तीं कांहीं चांगल्या कार्यासाठीं आपण वेचायला नको का ? जगांत हें असेंच चालावयाचें ? कोठवर ? त्याला कांहीं मर्यादा नाहींच का ?

आबानें अभिमानानें त्याच्या चिमण्या बाळांकडे एकवार पाहिलें. एक गोडसा विचार त्याच्या मनांत आला कीं उद्याचे हे नागरिक आपण शिकवून सोडूं या, त्यांना आपण साक्षर करूं या. ते उद्या सज्ञान होतील, स्वतःच्या स्वतंत्रबुद्धीनें विचार करायला लागतील. आणि कुणी सांगावें, जगाच्या इतिहासांत आजवर जी गोष्ट घडून आली नाहीं ती गोष्ट ते शक्य करून दाखवतील. बंधुभावाच्या नात्यानें एकमेकाशीं अत्यंत सलोख्यानें जन्म काढून पृथ्वी म्हणजे नेहमीच एकमेकाचें डोकें फोडण्याचें रणकुंड नाहीं हें आपल्या कृतीनें तें सबंध विश्वाला पटवून देतील.

# —१४—

विठाबाईच्या गांवची बहिरोबाची जत्रा चैत्री [illegible] सुरू होत होती. मुख्य दिवस दोनच. पौर्णिमा आणि नंतरची प्रतिपदा. परंतु लोकांच्या हौशीमुळें जत्रा आणखी पांच दिवस सहज चालू असे. यंदा जत्रा कशी काय भरणार याकडे सगळयांचे डोळे लागून राहिले होते. जत्रेला दरवर्षी लांब लांबचीं माणसें येत असत. जत्रेच्या आठ दिवसांत पुलगाव म्हणजे मुलामाणसांनी नुसतें फुलून गेलेलें असायचें. मोटारीच्या सडकेला गांव असल्यामुळें मोटारीनें येणें लोकांना सोयीचें पडें. वळूजातील लोकांना मात्र डोंगराच्या कडेकडेनें गेलेल्या कच्च्या सडकेनें पायीं अगर बैलगाडीनें जाणें जास्त सोयीचें पडें. या रस्त्यानें सुमारें दहा मैलावर पुलगाव होतें. खेड्यांतील जनतेला वर्षाकाठीं येणाऱ्या जत्रा म्हणजे आनंदाच्या पर्वण्या. महिना महिना आधीं लोकांना दुसरा विषयच बोलायला सुचत नाहीं. त्यांतल्या त्यांत डोंगरांच्या आडव्या उभ्या रांगांनीं ज्या गावांचा बाहेरच्या जगाशीं संबंध तोडून टाकल्यासारखे केलें होतें त्या गावांना पुलगांवच्या बहिरोबाची जत्रा म्हणजे नाटय शताब्दिमहोत्सवाच्या सोहोळयांप्रमाणें अपूर्वच वाटत असें. शिकवलेल्या पोपटांच्या कसरतीचे प्रयोग एका तंबूत पाह्यला मिळायचे, एकादा काळा झगेवाला पाहतां पाहतां

कोंबडीच्या अंड्याला फुंकर मारून त्यांतून भरदार मानेची कोंबडी काढून दाखवायचा, दोरीवरच्या कसरतीचे प्रयोग डोंबारी लोक ढोलगे बडवून करावयाचे, लहानपणींची हौस फिटली नसली तर चार चौघादेखत एका पैशाच्या मोबदल्यांत पाळण्यांत बसून अस्मान गाठायला जावयाचे इत्यादि अशाच तऱ्हेचे करमणुकीचे खेळ तुफान लोटावयाचे. जिभेचे चोजले पुरवायला हलवायांचीं आणि भडभुंजांचीं दुकानें खेटून उभी असावयाचींच. त्याच्या जोडीला चनेचटपटेवाला पुरभय्या आपल्या आंबट चिंबट मसालेदार पुऱ्या मडक्याच्या मागे घेऊन आसपास कोठें तरी असावयाचाच. थेट साताऱ्याहून कापडवाले आपले सणंग पाठुंगळी मारून आलेले असत. बेळगांवचे घोंगडीवाले घोंगड्याची चवड रचून धूळ झाडीत ठाण मांडून बसलेले असत. कोल्हापूर, सांगलीहून गुजरींतले सावकार आपल्या मण्या-मोत्यांसह आलेले असावयाचें–एकंदरींत ती आठ दिवसाची जत्रा लोकांच्या स्मरणांत एक वर्षभर राहण्यास समर्थ होती.

विठाबाई पंधरा दिवस आधीं पोरांना घेऊन आपल्या गांवीं पुढें निघून गेली. जातांना तिनें जत्रेला यायचें आबाकडून कबूल करून घेतलें तेंव्हांच तिनें वळुंज सोडलें. आबानें प्रथम खूप आढेवेढे घेतलें. खरोखरीच त्याच्या मनांतून जायचें नव्हतें. वेणूला एकटीला सोडून जाणें त्याला प्रशस्त वाटलें नाहीं. शिवाय शाळेला सुटी देणें त्याला बरें वाटेना. परंतु वेणूनें स्वतःच आपली अडचण दूर केली. ती एकटी राह्यला तयार होती. शाळेची अडचण आपोआपच दूर झाली. गावांतली बहुतेक सारी माणसें गेल्यावर मुलें शाळेसाठीं म्हणून कोण मागें ठेवणार? शेवटीं विचार करून आबाला शाळा आठ दिवस बंद ठेवणें भाग पडलें. नंतरची अडचण म्हणजे एकटे कुठें जायचे, पत्नीची सोय काय, बरोबर कुणी बोलायला चालायला असले म्हणजे तितकेंच वाट जायला बरें. याहि अडचणी क्रमानें दूर होत गेल्या आणि शेवटीं आबाला नकार देणें अशक्य होऊन बसलें. त्यानें होकार देतांच विठाबाई अत्यंत आनंदीत झाली.

सोबतीची खरोखरी अडचण नव्हतीच. जानबा पाटील, धोंडोपंत मास्तर माणकूशेट व इतर थोड्याशा जानपछानीचे लोक जत्रेला जाणार होते. परंतु आबाला ह्या लोकांची सोबत मनापासून नको होती. आपण बरोबर

असल्यामुळें गांवातल्या लोकांचा जो त्रयस्थपणाचा भाव निर्माण होईल तो आबाला नको होता. पण जेव्हां अरुणेनें स्वतः जत्रेला जाणार असल्याचें जाहीर केलें तेव्हां त्याला आनंद तर वाटलाच आणि तितकेंच आश्चर्यही पण वाटलें. त्याप्रमाणें त्यानें बोलून दाखवतांच अरुणा आवेशानें म्हणाली, " तुम्हांला आश्चर्य कां वाटावं ? तुम्ही शहरांत जन्म घेऊन शेवटीं खेड्यांत रमला कीं नाहीं ? इतकंच नाहीं तर जत्रेला येण्याचं विठाबाईजवळ कबूलही केलंत. मी तर बोलून चालून खेड्यांत जन्मलेली, सीतामाई प्रमाणें याच रानच्या मातींतून मी उगवले. "

" नाहीं. तें ठीक आहे. पण अयोध्या नगरीला आल्यावर सीतामाई पुन्हां जनकाकडे माहेरी गेल्याचं वाल्मीकीनं नमूद करून ठेवलं नाहीं, म्हणून म्हणतों. "

" हं: ! म्हणजे सीतामाई कधीं माहेरी गेलीच नाहीं असा तर्क कसा काढतां येईल ? वाल्मीकीला ह्या गोष्टीचा विसर पडला असेल—"

" त्यापेक्षां सीतामाईलाच माहेरचा विसर पडणं जास्त शक्य आहे. ढगांत जन्म घेतलेली वीज पृथ्वीवर धाव घेते ती पुन्हां ढगाला भेटण्यासाठीं जात नाहीं. सोनें शुद्ध केल्यावर लोकांच्या डोक्यावर जाऊन बसतं. त्याला खाणीची आठवण रहात नाहीं. त्याप्रमाणें शहरांत चार दिवस वागलेलीं माणसं खेड्याला चट विसरतात–" अरुणा कांहीं तरी झणझणीत उत्तर देण्यासाटीं ओटांची चाळवाचाळव करीत होती तोंच बाळासाहेब मधेंच म्हणाले, " आबासाहेब, तिच्याशीं वाद घालूं नका. तुम्ही तिला आजकाल पहात आहांत. मी तिच्या बारशाच्या घुगऱ्या खाल्लेल्या आहेत. लहर आहे बाईसाहेबांची ही. गेले आठ दिवस ती माझ्या डोक्याशीं धरणं धरून बसली आहे. आतां तुम्हीच पहा, या वयांत माझ्याच्यानं जाण्याचा दहा मैलाचा प्रवास अन् येण्याचा दहा मैलाचा बैलगाडीचा प्रवास एका दिवसांत होणं शक्य आहे कां ? "

" मग मला आणायला अन् पोहोंचवायला मोटारच्या रस्त्यापर्यंत सात मैल कसे बैलगाडीनें नेतां ? " अरुणा त्यांना अडविण्याच्या हेतूनें मधेंच म्हणाली.

" याचं उत्तर तुला कळण्यासारखं नाहीं. बापाच्या हृदयाची ओळख

तुला या जन्मांत व्हायची नाहीं, अरुणा ! रागवूं नकोस. पण बापाचं हृदय ओळखायला बापच व्हायला पाहिजे, नाहीं? तें तुला शक्य आहे कां? बरंकां, आबासाहेब, जेव्हां आज सकाळीं मी तिला परवानगी दिली तेव्हां बाईसाहेब ताळ्यावर आल्या. मला हें कबूल आहे, आबासाहेब कीं जन्मभर कांहीं मी हिला पुरवणार नाहीं. पण बापाची माया आहेनं. काळजी वाटतेंच नाहीं म्हटलं तरी--"

"कसली आली आहे काळजी त्यांत ? मोटरनं एकटी पुण्याला जात नाहीं वाटतं मी ? अन् मुंबईपर्यंतचा सगळा प्रवास मी एकटीच करीत नाहीं वाटतं ? नाना, असं जर मला जपायला लागलांत तर एकादे वेळीं लोणच्याच्या फोडीप्रमाणें मला बरणींत घालून बरणीचं तोंड दादऱ्यानं बांधायलाही तुम्ही सोडणार नाहींत." अरुणा म्हणाली.

"पोरी, ती बरणी आणि तो दादरा अजून मला सापडला नाहीं; नाहीं-तर तेंच करण्याच्या विचारांत मी आहे—" बाळासाहेब हंसून म्हणाले.

"कांहीं तरीच काय बोलता नाना ! मला अजून खूप खूप शिकायचं आहे. तुम्ही कबूल केलेलं आहेत. बरं तें जाऊं दे मेलं. आतां आबासाहेबांची सोबत मिळणार आहे. घरची गाडी आहेच अन् शिवाय आपला सख्या गाडी हाकायला असल्यावर तर तुम्हाला काळजी वाटायचं कारण नाहीं नं ?" अरुणा लाडिकपणानें म्हणाली.

"घरच्या गाडीचा वांधा आहे, म्हणून तर काळजी वाटते. सख्या उद्यां साताऱ्याला जाणार आहे. त्याची मावशी इस्पितळांत पडली आहे. तिच्या गाठोड्यावर चोराची नजर आहे. गोंद्याला तुमच्याबरोबर धाडला असता पण दोन्ही बैल त्याच्या सरावांतले नाहींत. अन् मला घरीं कुणी तरी पाहिजेच कीं. त्यांतून तोहि त्रास मी एक दिवसापुरता कसा तरी सहन केला असता पण गाडीच्या एका चाकाची धाव निखळलेली आहे ती आधीं बसवली पाहिजे. त्यासाठीं घिसाडी धरून आणला पाहिजे. एक भानगड आहे का ? म्हणून मी म्हणतों तूं अजून आपला बेत फिरवतां आला तर पहा--" बाळासाहेब अरुणेच्या पाठीवरून हलकेच हात फिरवूं लागले. परंतु अरुणेनें त्यांना दाद न देण्याचें ठरविलें असावें. त्यांचा पाठीवरचा हात झिडकारून ती लटक्या रागानें म्हणाली, "नाना, अशानं मी बोलणार

नाहीं तुमच्याशीं. मग मला इथं राहून करायचं तरी काय ? त्यापेक्षां मला मुंबईलाच पोंहोचवा कशी. एक दिवस जत्रेला जाऊन येतें म्हटलं तर तुमच्या सतराशेंसाठ अडचणी. तुमच्या मनांतच नाहीं—"

" अग पोरी, रागवूं नकोस. तुझी सोय केल्याशिवाय मी राहीन का ? पण लक्षांत ठेवायचं बरं का. सकाळीं जायचं अन् संध्याकाळीं सूर्य मावळण्याच्या आंत परत यायचं. विठाबाईनं आग्रह केला वगैरे सबबी चालायच्या नाहींत. दिवसा उजेडी घरीं यायलाच पाहिजे ही अट कबूल असेल तर कुणाची तरी गाडी देईन. कबूल ? " कन्येच्या खुललेल्या चेहेऱ्याकडे कौतुकानें पाहात बाळासाहेब म्हणाले. बाळासाहेबांची ही अट आबालासुद्धां मान्य होती. त्यालाही वेणूची काळजी होतीच कीं.

गाडीचा प्रश्न अरुणेनेंच सोडवला. पौर्णिमेला पहाटे गावातून पांचसहा गाडया जाणार होत्या त्यांपैकीं एका गाडींत तिनें आपल्यासाठीं दोन जागा राखून ठेवण्याचें गाडीवानास दोन दिवस आधींच बजावून ठेवलें. अशा रीतीनें पुलगांवच्या जत्रेला आबाचें जाणें अपरिहार्य होऊन बसलें. तरी पण निघण्याचा दिवस येऊन ठेपेपर्यंत त्याचें निश्चित ठरलें नव्हतें. आपल्या पश्चात् दिवसभर वेणूला हवे नको पाहायला झिंग्याला घरीं ठेवण्याचें त्याच्या मनांत घोळत होतें. परंतु झिंग्या दोन दिवस झाले त्याच्या घराकडे मुळींच फिरकला नव्हता. इतकेंच नव्हें तर झिंग्या गांवांतसुद्धां कुणाच्या दृष्टीस पडला नव्हता. बापलेकाचा दोघांचाहि पत्ता नव्हता. जत्रेच्या ठिकाणीं डल्ला मारण्याच्या हेतूनें झिंग्याचा बाप बेपत्ता झाला असावा असा तर्क करतां येण्याजोगा होता. पण झिंग्या त्याच्याबरोबर जाईल ही कल्पना आबाला पटेना. मग झिंग्या गेला तरी कुठें ? त्याची चर्या पाहून वेणूनें पडल्या पडल्या म्हटलें, " माझी अडचण नको बरं का वाटायला तुम्हाला ! पहा तर खरं, मी एक अशी लोळागोळा होऊन पडलें म्हणून तुमच्या वेताच्या आड कशाला येऊं ? परमेश्वराला माझी काळजी आहे. तुमचं तुम्ही काय लागेल ते करा—" वेणूच्या बोलण्यांत खोंच होती परंतु विचारांत गर्क झालेल्या आबाच्या ती लक्षांत आली नाहीं. आणि शिवाय पत्नीचे हें तेढें बोलणें आतां त्याच्या सरावाचें झालें होतें त्यामुळें तो तिच्या बोलण्याकडे लक्षच देत नसे.

पहाटे तांबडें फुटण्याच्या आधींच अंधारांत गाड्या गांवाच्या ओढ्यांतून रस्त्याला लागल्या. हवेंत सकाळचा गारठा होता. सकाळची आल्हाददायक वेळ असल्यामुळें आबा आणि अरुणा गाड्यांच्या पाठोपाठ रमतगमत पायीं चालत होते. पायाखालची भुसभुशीत वाळू संपून डोंगराचे कठीण पत्थर लागूं लागले. करवंदीच्या जाळ्या अंधारांत अजून पाय पोटाशीं घेऊन झोपल्यागत दिसत होत्या. रस्त्याच्या दोन्ही बाजूस घायपाताचीं पानें वर मान उंचावून पाहात होती. आणि मधूनच एखादा तुरा उंचच्या उंच उभा असलेला भासमान होत होता. रातकिड्यांची किरकिर केव्हांच थांबली होती. त्याऐवजीं मधूनच एखाद्या दूरच्या झाडावर बसलेला कोकीळ आपल्या चढ्या सुरांत साद घालतांना ऐकूं येई. मागच्या बाजूस राहिलेल्या गांवठाणाहून एखादी कोंबड्याची प्रभात आरोळी मधून मधून कानावर येई. पहांटे सुरू झालेल्या मोटेचे कुरकुरणें सकाळच्या निस्तब्ध वातावरणांत दूरवर ऐकूं येई. बैलांना उद्देशून शेतकऱ्यानें जाड्याभरड्या सुरांत रेकून म्हटलेलें खेडवळ गाणें कानाला मोठें गोड वाटत होतें. रस्त्याच्या कडेला असलेल्या झोंपडींतून जात्याची घरघर चाललेली तितकीच गोड वाटत होतीं. डोंगराची चढण सुरू झाली तरी ताजेतवाने असल्यामुळें गाड्याचे बैल मोठ्या खुषीनें गळ्यांतल्या घुंगरांच्या कर्णमधुर किंणकिणाटावर ताल देत ढांगा टाकीत चालले होते. डोंगराच्या कुशीत गाड्या मोठ्या उमेदीनें चालल्या होत्या. अगदीं पुढें असलेल्या गाडीचा पाठपुरावा करीत मागच्या गाड्या निघाल्या होत्या. डोंगर पाखाडीला वळसा घालून गाड्या उतरणीला लागतांच गाडीवानानें अरुणेला गाडींत बसण्याची सूचना केली. अरुणेनें खूण करतांच आबाही तिच्या पाठोपाठ वर चढून बसला. गाड्या भरधाव निघाल्या. पूर्वेला बालसूर्याची स्वारी हळूच डोकें वर काढून पाहात होती. गाड्या सपाटीला लागेपर्यंत आपसांत बोलणें शक्य नव्हतें. गाडीच्या हालण्यानें हादरे बसणारच, परंतु वाजवीपेक्षां जास्त अंग ठेचाळलें जाऊं नये म्हणून जपणें अवश्य होतें. त्यांतल्यांत्यांत वाटेंत पडलेल्या एखाद्या दगडावरून चाक गेले असतां गाडीच्या समोरच्या कठड्यावर कपाळमोक्ष होऊं नये याकरतां सारी शक्ति अंग सावरून बसण्याकडे लावणें इष्ट होतें. उतरण संपून गाड्या सपाटीला लागून त्यांतल्यात्यांत संथपणें चालूं लाग-

त्यावर अरुणा बोलण्याच्या लहरींत आली. एक गाडीवान, दोन म्हाताऱ्या बायका, त्यांचे अजून झोपीं गेलेले दोन नातू आणि आबा या सगळ्यांशीं ती आळीपाळीनें बोलत होती. झोपलेल्या दोन जिवांशिवाय बाकीचे उरलेले लोक तिच्या प्रश्नांचीं उत्तरें आपआपल्या कुवतीप्रमाणें देत होते. बराच वेळ इकडचे तिकडचे बोलणें झाल्यावर अरुणा मधेंच आबाला उद्देशून म्हणाली—

"आपल्याबरोबर अगदीं पुढच्या गाडीत खुद्द जानबा पाटील आहेत. अन् त्याच्याबरोबर धोंडोपंतही आहेत—"

"मी दोन्ही डोळयांनीं आंधळा आहे असें गृहीत धरून का तुम्ही मला ही बातमी पुरवीत आहात?" आबा हसून म्हणाला.

"इश्श! असं हो काय करतां? सहज आत्तां मला ते दिसले म्हणून म्हणाले, काय हो आबासाहेब, धोंडोपंताची लवकरच बदली होणार आहे असं माणकूशेट परवां म्हणत होता तें खरं आहे का?" अरुणा मधेंच आठवल्यासारखें करून म्हणाली. तिचा हा प्रश्न ऐकतांच एका म्हातारीनें तिच्या तोंडाकडे पाहून स्वयंस्फूर्तीनें म्हटलें, "लई ब्येस व्हईल, ताईसाहेब! माझ्या पोराचा पुन्याहून कागूद आला व्हता त्यो वाचून दावाया बी मुर्दाड राजी व्हईना! साळ घालतुया द्वाडीचा! लई उर्माट! संमद्या मुलखाचा लुच्चा! साळ कसली ती? गांजा फुकण्याचा अड्डाच केला होता त्यानं! या माझ्या नातवाला चिलीम भरून द्याया लावीत व्हता नव्हं कां——!"

"मावशीबाई, धोंडोपंतांच्या वरचा राग तुम्ही शाळेवर उगीच काढतां. नातवाला शाळेंतून काढलंत अन् त्याला घरीं बसवलंत. कुणाचं नुकसान झालं?" आबा म्हणाला.

"आबासाहेब, आम्हां गांवढ्यांच्या पोरास्नी करायचं हाय काय शिकून! बैलामागं हिंडण्यापायीं जल्म जायाचा आमचा—" ती म्हातारी अवसानांत येऊन बोलूं लागली.

"आणि पुण्याच्या पोरानं धाडलेला कागद वाचायला तुम्ही गांवभर मनुष्य हुडकीत हिंडणार, हें बरं कां—?" आबाच्या प्रश्नानें म्हातारी गप्प बसली.

—नंतर थोडा वेळ बोलणें तसेंच अर्धवट थांबलें. थोड्या वेळानें म्हातारी आपण होऊन आबाला म्हणाली, " काय हो मास्तर, मी आपली उगाच पघते धोंडोपंताच्या साळंत दहापांच पोरं यायची, जायची. पन तुमच्या नवीन शाळंत चारपांच इसा पोरं हायती. इकती पोरं शिकवून-शानी तुम्ही त्यांना पुन्यांत नोकरी कराया धाडनार आहांत व्हंय? आन् माझ्या पोरावानी संमदी प्वारं पुन्याला ग्येली तर नांगूर कोन धरील जी?"

" खरंच आबासाहेब, तुम्ही या मुलांचं पुढें काय करणार आहांत?" अरुणेला म्हातारीचा प्रश्न विचारार्ह वाटला असावा म्हणून मधेंच तिनें आबाला प्रश्न केला.

" ह्या मुलांचं पुढें मी कोण काय करणार? तो प्रश्न फार पुढचा आहे. तूर्त माझ्यापुढें एवढेंच काम आहे कीं या मुलांना लिहायला अन् वाचायला शिकवायचं. तेवढं ज्ञान त्या मुलांना मी देऊं शकलों कीं त्याच्या जोरावर ते स्वतंत्रपणें विचार करायला शिकतील. बरं का मावशीबाई, ज्ञान नसलेला मनुष्य आंधळ्यासारखा असतो. कसा तरी चाचपडत तो चालत असतो. वाटेत खड्डा असला तरी तो त्याला दिसत नाहीं. शिकलेला मुलगा उघड्या डोळ्यानें चालत जातो. वाटेंतल्या अडचणी त्याला स्वच्छ दिसत असतात. इतरांचे अनुभव तो डोळ्यांनीं पाहात असतो, आणि प्रत्येक गोष्ट विचारानें तो स्वतः करीत असतो. असा विचार करायला शिकलेला मुलगा तुम्हाला शंका येती त्याप्रमाणें तो शहरांत धाव घेणार नाहीं. कांहीं चार दोन मुलं जातील. त्याला इलाज नाहीं. पण बऱ्याच-जणांना नक्की कळून चुकेल कीं खेड्यांत राहण्यांतच आपला फायदा आहे." आबा शक्य तितक्या सोप्या भाषेंत त्या म्हातारीला समजावून देऊं लागला. त्याच्या या खुलाशानें म्हातारीचें समाधान झालें की नाहीं कुणास ठाऊक परंतु अरुणा तोंडाला रुमाल लावून हसूं मात्र लागली.

" आबासाहेब,अगदीं गुरु सांदीपनी होण्याचाच तुमचा बेत दिसतो आहे. वाटेंतसुद्धां बायाबापड्यांना विद्यार्थी करून घेण्याचा विचार आहे वाटतं." ती म्हणाली. या प्रश्नाचें उत्तर आबानें लगोलग केलें नाहीं. बराच वेळ तो स्वतःशींच विचार करीत बसला होता. नंतर मान वर करून तो अरुणेला म्हणाला, " तुम्ही सांदीपनीचं नांव चेष्टेनं काढलंत परंतु मला खरोखरीच

तें ध्येय डोळ्यापुढं ठेवावसं वाटतं. त्या महात्म्याच्या पासंगालाही मी पुरणार नाहीं हें मी जाणून आहे. परंतु प्रयत्न करण्यांत कसली चोरी आहे? सांदीपनींच्या आश्रमासारखा एकादा आश्रम उघडावा असं मला फार फार वाटतं—"

"बाकी सध्यांच तुम्ही शाळेला आश्रमाचं स्वरूप दिलं आहे म्हणा! वर्षाच्या काठी सणासुदीच्या सुद्धां सुट्टया तुम्ही देत नाहीं. आमच्या धोंडोपंत मास्तरांनी तर जत्रेच्यानिमित्त एक महिनाभर शाळेला सुट्टी देऊन टाकली आहे. अन् तुम्हाला आठ दिवस शाळा बंद ठेवण्याचं जिवावर आलं होतं—" अरुणा म्हणाली.

"पुन्हां तुम्ही तुलना आरंभलीतच. अरुणाताई, धोंडोपंत ज्या संस्कारांत वाढलेले आहेत ते माझे सस्कार नाहींत. तेव्हां त्यांची अन् माझी तुलना करण्यांत काय अर्थ आहे? त्यांत त्यांचा दोष नाहीं. जगाचा व्यवहारीपणा पाहून मला बंडखोरी करावी असं वाटूं लागतं आणि धोंडोपंत जगाला विरोध करण्यापेक्षां जगाच्या कलानें घेण्यांत सोयीचं मानतात. हा त्यांतला मुख्य भेद आहे. पण अरुणाताई, तुम्हाला खरं सांगूं? ज्याला कांहीं भरीव काम करून दाखवायची इच्छा आहे त्यानं इतरांकडे पाहण्याचा मोह प्रथम टाळला पाहिजे. इतर लोक आपल्यामागें किती दूर राहिले याचा विचार आपण करूं नये. वाट किती चालून आलों हे पाहण्याचा मोह अनिवार असतो हें मीही स्वानुभवानें कबूल करतों. प्रथम प्रथम मलाही इतरांच्या कामाची माझ्या कामाशीं तुलना करण्याचा मोह होई. परंतु अत्यंत निग्रहानें तो मोह टाळण्यास मी पुढें शिकलों. धोंडोपंतानीं हातीं आलेली सोन्यासारखी संधी आळशीपणानें घालवली हें उघड आहे. दुर्दैवानें ते आपल्या पेशाशीं प्रामाणिक राहूं शकलें नाहींत. इतर फालतू गोष्टींत लक्ष घातल्यामुळें त्यांना कांहींच करून दाखवतां आलें नाहीं. तेव्हां त्यांचें कार्य माझ्या कार्याशीं तुलनेला ठेवून कसें चालेल? मी केलेलें एका वर्षांतलें कार्य कांहींच झालें नाहीं असें मला वाटतें. आणखी कितीतरी गोष्टी माझ्या मनाला रुखरुख लावीत आहेत—" आबा म्हणाला. आबाचें हें भाषण त्या म्हाताऱ्या बायांच्या आकलनांत नव्हते. प्रथम प्रथम त्या कपाळावर आठ्या चढवून त्याच्या तोंडाकडे पाहात होत्या. नंतर त्या मांडीवरच्या

" गावाला फायदा करून घेतां येईल अशी सार्वजनिक औषध योजना. प्रकृती म्हटली कीं विकृति ही ठेवलेलीच. त्यासाठीं अत्यंत अल्प खर्चात औषधें पुरविण्याची योजना व्हायला पाहिजे. आणि ही योजना मी अगदीं थोड्या प्रमाणावर लवकरच्च सुरू करणार आहें." गाडी थांबतांक्षणींच आबाचें बोलणें बंद पडलें. पुलगावच्या पाणवठ्यावर जनावरें पाणी पिण्यासाटीं थांबलेली होतीं. पाय मोकळे करण्याच्या इराद्यानें आबा आणि अरुणा खालीं उतरले. समोरून जानबा पाटील आणि धोंडोपंत त्यांच्या दिशेनें येत असतांना त्यांनीं पाहिले. " काय आबासाहेब, संध्याकाळला जाणारनं परत ! बाळासाहेबांनी लेकीला लगोलग पोहोंचवायला मला बजावलं म्हणून विचारतों." जानबा पाटील म्हणाले. आबानें होकारार्थी मान हलवतांच पाटील गाडीवानाशी बोलूं लागले. धोंडोपंत चमत्कारिक मुद्रा करून आबाकडे हंसत पाहात उभे राहिले.

— १५ —

एकंदर चालू परिस्थितीचा विचार केला असतां जत्रा बरी भरली होती असें म्हणावें लागलें असतें. एरवीपेक्षां लोकांच्या हातांत कागदी पैसा जास्त सळसळत होता. परंतु मालाची टंचाई तीव्रतेनें भासत असल्यामुळें खरेदी विक्रीचा तडाखा जरा नरमच होता. चौपट पांचपट किंमत देण्याची मनाची तयारी झटकन होत नसल्यामुळें ठिकठिकाणीं बायाबापड्यांचे गट एकमेकांत विचार विनिमय करीत उभे होते. आबाला किंवा अरुणेला दोघांनाही कसलीच खरेदी करावयाची नसल्यामुळें खरेदीदारांच्या मनाची चाललेली कुतरओढ पाहण्यास भरपूर अवसर मिळाला.

अकरा साडेअकराचे सुमारास सूर्यानें बारा डोळे उघडल्याचा भास होऊं लागला. ऊन नुसतें रणरणूं लागलें. अंगाची काहिली होऊं लागली. लोकांच्या अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या. वाऱ्याची झुळूकसुद्धां लोकांची दया करीना. एवढी मोठी जत्रा भरलेली, एवढा जनसमुदाय इकडून तिकडे लोटत होता पण प्रत्येकाचे डोळे वर आकाशाकडे लागलेले. बाराचे सुमारास उन्हाचा ताप असह्य झाल्यामुळें अरुणेनें विठाबाईच्या घरीं परत फिरण्याची इच्छा दर्शविली. विठाबाईच्या घराच्या कोपऱ्यावर जानबा पाटील लगबगीनें समोरून येतांना त्यांना दिसले.

" हो ! बरी गांठ पडली. आबासाहेब, पल्याड पाच मैलावर भिलवाडीला मला टाकोटाक जाया होवं सातान्याहून आत्तांच पोलीस पार्टी मोटारनं आली आहे. त्याना घेऊन मला बंदोबस्त कराया जाया होवं. आज रात्रीं भिलवाडीच्या पुनमचंद मारवाड्याच्या कोठारावर छापा पडणार हाय असं कळल म्हून सातान्याहून पार्टी आली. "

जानबा पाटील अतिशय गडबडींत होते. त्यांना जास्त वेळ प्रश्न विचारीत उभे करणें आबाला इष्ट वाटलें नाहीं. जानबा पाटलांनीं जातां जातां खुलासा केला कीं गाडीवानाला त्यांनीं सगळं सांगून ठेवलेलं होतं. उन्हें बुडायच्या आंत आबानें अरुणेला घेऊन निघावयाचें करावें. एवढेंच सांगून पाटील घाई घाईनें निघून गेले. जातां जातां आबाकडे पाहून ते म्हणाले, " तुमचे कांग्रेसचे ईर लोक हायती. सरकारनं साठवलेलं धान्य लुटण्याचा त्यांचा ध्येत दिसतुया--" आबानें कांहींच उत्तर केलें नाहीं. धान्य कोठारें लुटण्याची या बाजूला गेल्या दोन महिन्यांत साथ उपटली होती. त्यांत अमक्याच पक्षाचा हात होता असें नाहीं. जीवनासाठीं धडपड अमूकच एक पक्ष करतो आणि बाकीचे सगळे उपाशी राहून डोळ्यावाटें प्राण सोडतात अशांतला मुळींच प्रकार नाहीं. परंतु कोणतीही वाईट गोष्ट असली कीं कॉंग्रेसच्या नांवानें बोटें मोडणें ही एक प्रथाच पडत चाललेली होती. जानबा पाटील याला अपवाद नव्हते. आबानें सहज मागें वळून पाहिलें. धोंडोपंत पाटलाच्या बरोबरीनें दुरून जात असलेले पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

---उन्हाचा कडका मुळींच कमी होत नव्हता. तरी विठाबाईच्या आग्रहाला न जुमानतां संध्याकाळीं पांच वाजतां अरुणा परत जाण्यास निघाली. परंतु गाडीचा अजून पत्ताच नव्हता. जानबांनी व्यवस्था तरी काय केली हें पाहण्यासाठीं आबा गाडीतळावर चक्कर मारून आला, परंतु तेथें फक्त गाडी सोडलेली दिसली. गाडीवानाचा पत्ताच नव्हता. आजूबाजूचे सकाळी बरोबर आलेले गाडीवान नक्की कांहींच सांगेनात. त्यांना तरी काय माहिती असणार ? आबा तसाच परत फिरला.

अखेरीस सहा वाजून गेल्यावर गाडीवान गाडी घेऊन आला. परंतु हा गाडीवान निराळाच होता. सकाळचा कुठें गेला या प्रश्नाला तो धड उत्तर देऊ

शकला नाहीं. गाडी उशीरा का आणलीस ह्या प्रश्नाचें त्याला आश्चर्य वाटल्या-सारखे दिसलें. "जानबा पाटलांनी दिवस बुडायच्या वक्ताला निघायचं म्हून सांगितलय नव्हं का—" हें त्याचें उत्तर ऐकून आबा गोंधळल्यासारखा झाला. दोन तास उशीर झालेला तेव्हां निघावें कीं नाहीं या विचारांत तो पडला. परंतु अरुणेनें त्याचें म्हणणें खोडून काढलें. विठाबाई बाहेर येऊन अरुणेला न जाण्या विषयीं विनंति करूं लागली. पूर्वेच्या बाजूला दिसत असलेल्या काळ्याकुट्ट पट्ट्याकडे हात फेकून ती म्हणाली, "ताईसाहेब, उगा येड्यावानी करूं नगा. इनामदार साहेबास्नी मी सांगन. पर त्ये पाह्यलं का आकाशाकडं ? पावसाचा रंग दिसतुया. वाटेंत कुठं पाऊस लागला म्हंजीं आपदा व्हायची."

"विठाबाई, मी निघणार म्हणजे निघणार. थोडा उशीर झाला आहे खरा. पण आज पौर्णिमेचा चंद्र आहे. नवाच्या आंत आम्ही वळुंजाला पोहचूं. चला, आबासाहेब, बोलत उभं राह्यल्यानं इथंच नऊ वाजायचे एकादे वेळीं—" अरुणा गाडींत जाऊन बसल्यामुळें आबाचा नाइलाज झाला. गाडी हळूहळू गांव सोडून बाहेर पडली. सकाळचा देखावा पार बदलून गेला होता. आकाशांत इतकावेळ दूर असलेला तो काळा पट्टा अतित्वरेनें वर येऊं लागलेला होता. झाडांचे शेंडे अजून स्तब्ध उभे होते. सूर्य पश्चिमेच्या बाजूला बराच दूरवर सरकलेला होता तरी परतीचीं उन्हें अतिशय तापदायक वाटत होतीं. विठाबाईच्या म्हणण्याप्रमाणें पावसाची जमवाजमव चालल्याचें स्पष्ट दिसत होतें. आबा शून्य मुद्रेनें आकाशांतल्या ढगांची हालचाल पाहण्यांत दंग होता. अरुणा निघाल्यापासून कां कुणास ठाऊक स्वतःच्याच विचारांत गर्क होती. मधेंच वाटेंत पडलेला आसूड घेण्यासाठीं गाडीवानानें गाडी थांबवली म्हणजे दोघेही आपल्या विचारतंद्रीतून जागे होत.

"मघापासून हा तिसऱ्यांदा आसूड पडला. हा गाडीवान मला तर धांद्रटच दिसतो आहे. सारखा कांहींना कांहीं कारणावरून उशीर करतो आहे." अरुणा तक्रारीच्या सुरांत अर्धवट स्वतःशींच म्हणाली. आबालाही हीच गोष्ट मघापासून तापदायक वाटत होती. दिवस बुडायला आला तरी दोन मैलांची वाटचाल कांहीं संपली नव्हती. आणि वाटेंत दोनदां जनावरांना पाणी दाखविण्यासाठीं गाडीचे बैल सोडण्यांत आले होते. त्या दोघांना घर

गांठण्याची घाई झालेली होती आणि गाडीवानाचीं सर्व कामें अत्यंत संथपणें चाललेलीं होतीं. कारण विचारतां त्यानें उत्तर केलें, "तुमां शहरच्या मानसांना मोटारीप्रमाणें गाडी चालाया होवी. पन हा माझा कस्तुऱ्या सकाळधरनं सारखा लङगतो त्याची काय वाट ? त्याचा पाय धड असतां तर येरवाळीं ठिकाणा दावला असतां— "

शेवटीं गाडी तीन मैल गेलेली असेल नसेल तोंच पावसानें त्यांना गांठलें. सुदैवानें थोड्याच अंतरावर एक मोठें वडाचें झाड होते त्या झाडाखालीं गाडी उभी राहिली. वळवाच्या पावसाचा तडाखा विलक्षण असतो. सुमारे तासभर पाऊस टिकला असेल. तेवढ्या अवधींत सोसाट्याचा वारा, आडवा उभा पावसाचा झोत, आकाशांत मेघांच्या कानठळ्या बसतील अशा गर्जना, मधूनच वीजा चमकणें इत्यादि प्रकारांनी सृष्टीचे स्वरूप पार पालटून गेले. अंधार तर विलक्षण पडला होता. अंगावरचे कपडे आडव्या पावसामुळें भिजून गेल्यामुळें दातखिळी बसण्याची वेळ आली होती. तीन मैल रस्ता संपला नाहीं आणि इथेंच आठ वाजून गेले होते.

"मला वाटतं, अरुणाताई, आपण आज वळुंजाला जाण्याचा बेत रहित करावा." आबा आकाशाकडे पाहून म्हणाला. अरुणा हट्टाला पेटली. कांहीं झालें तरी मागें परतायचे नाहीं हा तिचा निर्धार तिनें सोडला नाहीं. गाडीवानानें पुन्हां गाडी सडकेला लावली.

पाऊस थांबला होता. परंतु रस्त्यांत जागोजाग पाण्याचें ओहोळ अजून खळाळतांना ऐकूं येत होते. सारी सृष्टि जलमय होऊन गेली होती. गाडीला वर तट्टया नसल्यामुळें एकाद्या झाडाखालून जातांना वाऱ्याच्या लहरीनें पानें हलत व त्यावरील पाण्याचा शिडकावा अंगावर येई तेव्हां अरुणा नकळत आबाच्या अंगाशीं खेटून बसे. अजून ढगांचें गुरगुरणें अजिबात बंद झालें नव्हतें. पश्चिमेच्या बाजूला सरकलेल्या ढगांमधून मधेंच गुरगुरण्याचा धीरगंभीर निनाद उमटे आणि त्याच्या पाठोपाठ डोळ्याला क्षणमात्र अंधेरी आणणारी सौदामिनी लपकन् चमकून जाई. गाडी हळूहळू पुढें चालली होती.

सुमारे अर्ध्या तासानंतर गाडी एका लहानशा टेकाड्याच्या पायथ्याला वळणावर येऊन पोहोंचली. आजूबाजूचें कांहींच दिसणें शक्य नव्हतें.

इतक्या मिट्ट अंधारांतून माणसाला वाट काढता आली नसती तरी ते दोन बैल मात्र गाडी सरळ रस्त्यानें नेत होते. अशा वेळीं बैलांचें शहाणपण कौतुकास्पद असतें. हळूहळू अरुणा आबाला बिलगून बसली. ही घटना आबाच्या ध्यानांत आल्यावाचून राहिली. परंतु दोघेही ओलेचिंब झालेले होते. दोघेही थंडीनें काकडत होते. अशा वेळीं एकमेकांच्या अंगाची ऊब एवढीच काय ती समाधानाची गोष्ट होती. त्यानें प्रतिकार करण्याचें नाइलाजानें सोडून दिलें.

" बाळासाहेब वाट पहात असतील, नाहीं ? " कांहींतरी बोलायचें म्हणून अरुणा म्हणाली. डाव्या हाताच्या पंजानें तिनें आपले ओले केस पुसण्यास सुरवात केली.

" इं–" आबानें जड आवाजांत म्हटलें. अरुणेची लगट त्याला अस्वस्थ करून सोडीत होती. पण उघड तसें बोलून दाखवण्याचें त्याला धैर्य होत नव्हते. त्यांतल्यात्यांत गाडीवानाची आपल्याकडे पाठ आहे या विचारानें त्याला बरें वाटत होतें. पण अरुणा थोडी दूर सरकली असती तर त्याला जरा मोकळे वाटलें असतें.

" काय एवढें घाबरतां आहांत, कुणास ठाऊक ! कोण खाणार आहे आपल्याला रानांत ? हे पहा ढग थोडे थोडे पांगूं लागले आहेत. अन् चंद्राचा प्रकाशही थोड थोडा दिसूं लागला आहे. थोड्यावेळानं हे ढग दूर झाले कीं मस्त चांदणं पडलेलं दिसेल. बारा वाजायच्या आंत आपण नक्की घरीं पोहोंचूं–" अरुणा म्हणाली. आबाला उत्तर देण्याची सवड मिळाली नाहीं इतक्या वेगानें कुणीतरी पाठीमागून धावत आलें आणि उडी मारून चटकन् गाडींत चढून बसलें. दोघेही दचकून त्या व्यक्तीकडे पाहूं लागले. आबा आश्चर्यानें ओरडला–" झिंग्या–! अन् तूं रे इथें कसा ? " आबाचा आवाज ऐकून गाडीवानानें गाडी अंमळ उभी केली. अरुणेनें पाहिलें झिंग्याच होता तो.

" आबासाहेब, " झिंग्या घाई घाईनें बोलूं लागला, " मी भिलवाडीहून पळत आलों आहें. तुमच्या गाडीची वाट पाहात मी त्या झाडावर बसून होतों. "

" पण वेडा नाहींस कां तूं ? अरे पावसा पाण्यांतून असा इकडे कुठें

हिंडतो आहेस? भिलवाडी या बाजूला कुठली?" आबा आश्चर्यानें म्हणाला.

"हां! तिथंच तर आपल्या पाटलांची अन् धोंडोपंताची करामत आहे सगळी. पण तुम्ही जरा इकडे खालीं या. या गाडीवानाला सुद्धां त्यांनी मथवून ठेवला आहे."

झिंग्यानें हाताला धरून आबाला खालीं ओढलें. अरुणा उत्सुकतेनें त्याच्या पाठोपाठ खालीं उतरली. गाडीवान एकदम उसळून म्हणाला–, "अरं काय हाय काय आन नाय काय! इतका येळ उशीर व्हईल म्हून माझं डोक्सं खाल्लं! आन आतां त्या येडपटाच्या नादानं इथं उभा राहतां व्हय? चला ह्यंगा गाडीमंदीं. पाटलाला· हे कळलं तर त्यो माझं डोक्सं खाल्ल्याबिगार राह्यचा नाय–"

अरुणेला त्याचा हा सात्विकपणा पाहून थोडीशी शंका आली. झिंग्याचें म्हणणें साद्यंत ऐकण्यासाठीं दहा पांच मिनिटें गेलीं तरी त्याची पर्वा नव्हती. पण इतका वेळ मुद्दाम उशीर करणारा हा गाडीवान आत्तांच घाई करूं लागला ही घटना तिला संशयास्पद वाटली. झिंग्याबरोबर दहा पांच पावलें आबा आणि ती दूर गेलीं. गाडीवान स्वतःशीच बडबडत गाडीखाली उतरला आणि–!

"अरुणाताई,तुमास्नी संमदं नीट सांगतों.आज भिलवाडीला पुनमचंदाच्या कोठारावर दरोडा पडणार व्हता. दोन दिवसांआधीं माझ्या बानं मला सांगितलं व्हतं. त्यानं ह्या कामांत सांपडूं नाहीं म्हून मी त्याची पाठ धरून होतों. आज दोपारां साताऱ्याहून शिपायांची मोटार आली. कसं त्यानी हेरलं कुणाला ठाव. पर बंदुका घेऊन पोलीस आलं खरं. त्यांच्या बरोबर पाटील अन् धोंडोपंतबी होतं. मी चावडीजवळच उबा होतो. धोंडोपंतानी मला पघितलं आन् दांताड इचकून म्हनल्यात कसं 'अरे झिंग्या, तुझ्या त्या आबाला अन् ताईसाहेबाला आज चांगला अडकवतो बघ. आज रात्रीं भिलवाडीच्या चावडीवर त्यांना बसवून ठेवतो. चळवळ करतां आहांत काय? थांबा तुम्हाला सगळ्यांना सरकारी हिसका दाखवतों.' असं धोंडूपंत म्हंगाले. म्या म्हनलं इचिभन् ह्यो काय परकार आहे. तवां म्या दीसबूड होस्तोंवर जानबा पाटलाची पाठ सोडली नाहीं. भिलवाडीच्या पाटलाला कोहींतरी जानबा सांगत होतं तेथं मीबी आडून उभा राहिलों. तवां मला

कळलं कीं तुम्हाला फसवूनशान उशीर करायचा आन् रस्ता चुकवून तुमची गाडी भिलवाडीच्या रस्त्याला लावायची. गाडीवानाला जानबांनी संमदं सांगून ठिवलं व्हतं. त्या परमानं त्यानं तुमची गाडी हकडं आणली. पावसानं बी त्यांना मदतच क्येली–" झिंग्या उसंत खाण्यासाठीं मधेंच थांबला.

"पण यांत त्यांचा हेतु काय, बुवा! मला तर यांतलं एक अक्षरही खरं वाटत नाहीं, झिंग्या!" आबा गोंधळलेल्या मुद्रेनें म्हणाला.

"हां! त्ये मला ठाव हाय. भिलवाडीच्या पाटलाला जानबा सांगत व्हतं कीं तुम्हाला कांग्रेसचे लोक म्हून पोलिसाच्या ताब्यांत द्यायचं.तुम्हाला अन् ताईसाहेबांना दोघांनाबी. संमदे दरोडेवाले जमा झाले म्हंजे त्या वक्ताला तुमची गाडी भिलवाडींत उबी राहील. आन् तुम्हां दोघांना लागोलग शिपायांच्या ताब्यांत द्यायला सांगून पाटील आन् धोंडोपंत आपल्याला अंगावर याया नगं म्हून वळुंजाला निघून गेले." झिंग्यानें खुलासा केला तरी आबाचे समाधान होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं बऱ्याच प्रश्नोत्तरानंतर अरुणेनें आबाचा हात धरून गाडीच्या दिशेनें त्याला ओढीत म्हटलें, "आलं माझ्या लक्षांत. त्या दोघां बावळटांचा डाव माझ्या पुरता लक्षांत आला आहे. चला आपण गाडींत बसूं अन् त्या गाडीवानाला गाडी मधल्या वाटेनें वळुंजाकडे न्यायला लावूं. आपण तिघेजण आहोंत आन् तो एकटा आहे. पाहूं काय करतों तें—"

परंतु गाडीवान काय करतो तें पाहण्याची वेळच आली नाहीं. गाडीवानच मुळीं जाग्यावर कुठें होता? गाडीवानाचा शोध काढून तिघेही दमले. गाडी मात्र तशीच उभी होती.

"म्हणजे! हा कुठें पळून गेला कीं काय? शाब्बास, म्हणजे आज कुठल्या मुहूर्तावर आपण पुलगांवाहून निघालों असं झालं आहे." आबा निराशेनें उद्गारला.

"तरी हरकत नाहीं. तो गेला हेंच बरं झालं. नाहींतर आज आपणा तिघांच्या तडाक्यांत तो जिवंत सुटला नसता. भेकडच दिसतो आहे मेला! झिंग्या, तूं धर पाहूं लगाम. तुला वाट माहिती असेल. तूंच गाडीवान हो आमचा—" अरुणा झिंग्याकडे वळून म्हणाली. परंतु झिंग्या जागचा हालेला नाहीं.

"मला माझ्या बाला सोडून कसं येतां येईल? संमदे पोलीस चावडी-भर दरोड्याची वाट पाहात बसले हायती. आन् दरोडेवाले रामोशी माझ्या बाची वाट पाहात आहे. पन बाला म्यां अन् माझ्या मावशीनं घरांत कोंडून ठिवलं आहे दोंपारधरनं. मला माघारीं जायां होवं. मावशीला बा जुमानणार नाहीं." झिंग्या म्हणाला. आबाला अशाही वेळीं झिंग्याचें कौतुक वाटल्यावाचून राहिलें नाहीं.

हा पेंच मोठा विलक्षण होता. भिलवाडीला जाणें अशक्य होतें. कारण, जानबानें विणून ठेवलेल्या जाळ्यांत ते नेमके सापडले असते. पुढें चौकशी होऊन निरपराधित्व सिद्ध करतां आलें असतें हें खरें आहे. परंतु दहा पंधरा दिवसांचा प्रश्न येणार होता. आणि शाळेच्या दृष्टीनें व लौकिकाच्या दृष्टीनें पोलिसांच्या तडाक्यांत सापडणें इष्ट नव्हतें. झिंग्या आपल्या बापाला थोपवून धरायला गुंतलेला राहणार. गाडीवान बेपत्ता. गाडी मधल्या वाटेनें काढावी तर ती कोणी आणि कशी? माघारी परत जावें तर पुन्हां तीच अडचण. बराच वेळ आपसांत विचार करीत तिघेही रस्त्यांतच उभे होते. परंतु झिंग्याला फार वेळ तेथें उभें राहणें इष्ट नव्हते. तो परत जाण्याविषयीं चुळबूळ करूं लागलासें पाहून आबा म्हणाला, "बरं मग झिंग्या, तूं जा. पण आसपास एकादं तुझ्या जातवाल्याचं घर म्हण किंवा झोपडी म्हण कांहीं [illegible] जागा असली तर सांगनं. म्हणजे रात्रीचे तुझ्या [illegible] गप्पा मारीत बसू अन् सकाळीं रस्त्याला लागूं."

झिंग्यानें पुन्हां त्यांची निराशाच केली. "हतं दोन मैल भिलवाडी-पासनं माझं सगं कुठलं राह्याला वो? कुठं तरी, कसं तरी कलाक दोन कलाक काढानी. मी माझ्या 'बा'ला आडवून धरतों. दोन कलाकानं कुणाला तरी धाडून देतो तुमच्या वाटंला—"

आतां मात्र त्यांच्या अनुज्ञेची वाट न पाहतां झिंग्या आला तसा अंधा-रांत निघून गेला. आकाशांत ढगांची पांगापांग होऊं लागलेली दिसत होती. कुठेंतरी आकाशांत चंद्र उगवलेला असावा एवढी खात्री वाटण्या-जोगा ढगांना पांढुरका रंग मिळाला होता.त्या धूसर प्रकाशांत आबा अरुणे-कडे पहात गाडीच्या चाकावर हात ठेवून उभा होता. प्रसंग मोठा आणी-बाणीचा होता आणि या प्रसंगाला तोंड देण्याइतपत त्याचें मन तयार

झालेलें नव्हतें. दोघेहीजण स्वतःशीच विचार करीत बराच वेळ उभे राहिले असतील. शेवटीं अरुणेनें आपल्या हातांत सूत्रें घेण्याचें ठरविलें—

" विचार कसला करतां, आबासाहेब ! आजची रात्र आपल्याला इथेंच कुठेंतरी काढावी लागणार हें उघड आहे. तास दोन तासांनी म्हणजे बारावर एक वाजतां झिंग्यानं पाठवलेला मनुष्य आपल्याला वाट दाखवणार अन् मग आपण पहाटे तीनचार वाजतां वळुंजाला पोहोंचणार ! अन् तो मनुष्य पाठवण्याची झिंग्याला शुद्ध राहिली तरचा प्रश्न ! नाहींतर सारी रात्र रस्त्यांतच एकमेकाकडे पाहात काढायची कीं काय ! चला, थोडं थोडं दिसायला लागलं आहे. गाडींत घोंगडी आहे. ती घेऊं. बैल सोडून देऊं अन् आसपास एकादी निवाऱ्याची जागा सापडली तर पाहूं या." अरुणा आबाचा हात धरून त्याला ओढीत म्हणाली.

सुदैवानें थोडक्याच परिश्रमानंतर रस्त्यापासून एका हाकेच्या अंतरावर एक झोपडें त्यांना दिसलें. परंतु झोपडींत मनुष्यवस्तीचा ठाव ठिकाणाही दिसला नाहीं. पावसानें आंतली बहुतेक सर्व जमीन भिजून गेलेली होती. फक्त एका बाजूला चार दोन व्यक्तींना अघळपघळ बसतां येईल येवढीच कोरडी जागा शिल्लक होती. प्रसंग येऊन ठेपतांच पुरुषांपेक्षां स्त्रीच जास्त हरहुन्नरी ठरते ह्याचा अरुणेनें चांगलाच प्रत्यय आणून दिला. झिंग्यानें सांगितलेली पाटलाची कारवाई कानावर पडतांच आबाचा मेंदू जो बिथरला तो पुढें साधा विचार करायला सुद्धां सहजासहजीं राजी होईना. प्रत्येक गोष्ट अरुणा आपल्या डोक्यानें करीत होती आणि एकाद्या मख्थड डोक्याच्या विद्यार्थ्याप्रमाणें तो तिच्या पाठोपाठ जात होता. एक प्रकारचें चमत्कारिक दडपण त्याच्या मनावर येऊन पडलेलें दिसत होतें. त्या दडपणामुळें तो प्रत्येक गोष्टींत सांगकाम्या प्रमाणें अरुणेच्या आज्ञा निर्बुद्धपणानें पार पाडूं लागला.

अरुणेनें मात्र कमालीची तडफ दाखवली. झोपडींत थोडीशी कोरडी जागा आहे हा शोध तिनेंच लावला. त्याचप्रमाणें थोडेसें कोरडें गवत गाडींतून आणून ते पेटवून अंगावरचे कपडे कोरडे करण्याची कल्पना

तिनेंच पुढें मांडली. काड्याच्या पेटीचा प्रश्न पुढें येतांच तिनेंच ती अडचण दूर केली. मघाशीं गाडीवानानें वाटेंत चिलीम फुंकलेली तिनें पाहिली होती. चिलीम शिलगावल्यावर हातांतली चकमक आणि कोरडा कापूस त्यानें एका पिशवींत कोंबून ठेवलेला तिनें पाहिला होता. या जिनसा तिनें गाडी धुंडाळून हुडकून काढल्या, कोरडें गवत आणलें, चकमकीच्या सहाय्यानें विस्तव पाडला आणि फुंकून जाळ केला. थोडासा जाळ होतांच झोपडीच्या आंतल्या बाजूच्या कोरड्या तुराट्या तिनें जाळावर टाकल्या. जाळ होतांच अरुणेनें आबाला हाताला धरून कोरड्या जागेवर अंथरलेल्या घोंगडीवर जाळासमोर बसवलें.

"काय आबासाहेब, इनामदारांची लेक अगदींच हूस नाहींना?" अरुणा हंसत हंसत त्याच्या खांद्याला स्पर्श करून म्हणाली. आबानें तंद्रींतून जागे झाल्याप्रमाणें भकास मुद्रेनें तिच्या हसऱ्या चेहऱ्याकडे पाहिलें. स्वतःशीच हसल्यासारखे करून तो मोठ्यानें म्हणाला, "तुमचा हा हट्टीपणा भोंवला. विठाबाई चांगलं म्हणत होती तें ऐकलं नाहींत अन्—

"विठाबाई मरूं द्या आतां. माझ्या मूर्खपणाचा असा पुन्हां उच्चार करूं नका. मी म्हणतें, झाल्या गेल्या गोष्टींचा विचार करीत बसण्यापेक्षां सध्यां काय करायला पाहिजे याचा विचार माणसानं करावा. मला तुमच्या कार्याची समग्र हकीकत एकदां निवांतपणानं ऐकण्याची इच्छा होती. अनायासें ती संधी आपोआप चालून आली आहे. तेव्हां रात्रभर या झोपडींत आपण खूप बोलून घेऊं या. या ठिकाणीं आपल्याला त्रास द्यायला दुसरं कुणी येणार नाहीं." अरुणा [illegible]नें म्हणाली.

आबाचें डोकें क्षणमात्र ठिकाणावर नव्हतें. हसत हसत बोलतांना अरुणेच्या ओठाचा होणारा कानवला किती गोड होता, नाहीं? आबानें चमकून स्वतःला सावरून घेतलें.

"कसला कर्माचा विचार करतां आहांत? तुम्ही पुरुष सगळे इथून तिथून असेंच कांही? तुमच्या आवडत्या कार्यांत तुमची बुद्धिमत्ता पाहून

घ्यावी. अन् जरा निराळा प्रसंग आला कीं मग तुमची त्रेधा पाहून घ्यावी. आमच्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉल साहेबांची एकदां अशीच गंमत झाली. तास सुरू झाला होता. मानसशास्त्राचे अनेक सिद्धांत मोठ्या रंगतीनं आम्हांला समजावून सांगत होता, इतक्यांत त्याची मड्डुम थेट वर्गांत आली. अन् बायकोला अशी अचानक वर्गांत आलेली पाहतांच स्वारी जी घामाघूम झाली म्हणतां. घरीं मुलाला सपाटून ताप आला होता म्हणून बिचारी शिष्टाचार न पाळतां सरळ वर्गांत शिरली. तिला त्यांत वावग कांहींच वाटलं नाहीं. पण साहेब पडला पुरुष. अगदीं थेट तुमच्यासारखा डोकं धरून बसला." विझत आलेल्या जाळावर आणखी चार काड्या टाकून अरुणा मोठमोठ्यानें हसूं लागली. आबाला डोकें शांत ठेवणें इतःपर शक्य नव्हते. विचारासरशीं तो जागचा उठला आणि झोपडीबाहेरच्या गारव्यांत येऊन उभा राहिला. अरुणा हसत हसत त्याच्या पाठोपाठ बाहेर आली.

"पहा चंद्र कसा ऐटीत आता मिरवतो आहे, नाहीं? अन् मघाशीं कुठें लपला होता—" अरुणा वर आकाशाकडे पाहून म्हणाली.

आबा तिनें निर्देशिलेल्या बाजूनें वर पाहात उद्गारला, "अरुणाताई, तुम्ही मघाशीं तुमच्या साहेबाची गोष्ट सांगितलींत ती ऐकून मला मोठी मौज वाटली. तुमचं म्हणणं खरं आहे. त्याच्या बायकोला कांहीं वाटलं नाहीं याचं कारण तुम्ही लक्षांत घेतलं नाहीं. बायकांची जात नेहमीं स्वतःपुरतें पाहात असतें पुरुषांना जगाकडे पाहण्याची खोड लागलेली असते. आपल्या प्रत्येक कृतीकडे जग कोणत्या दृष्टीनें पाहील याची पुरुषाला काळजी असते. स्त्रीला जगाकडे पाहण्याची गरज़ वाटत नाहीं. आज तुम्ही आणि मी रात्रीचे एकटेच आहोंत याचा जग काय अर्थ लावील तुम्हांला माहीत आहे? तुम्ही तात्पुरत्या गोष्टींचा विचार करून थांबलांत. पण—पण माझी स्थिति मोठीच चमत्कारिक झाली आहे असं तुम्हांला नाहीं वाटत?" आबा कळवळून बोलत होता. त्याचा स्वर ओळखून अरुणा गंभीर झाली.

" आबासाहेब, स्त्रीजातीचा स्वतःपुरतें पाहण्याचा दुर्गुण तुम्हांला दिसला परंतु वेळीं स्त्रीच बिकट परिस्थितींतून पुरुषाला वांचवण्यासाठीं कमालीचा स्वार्थत्याग करून दाखवूं शकते याचा तुम्हांला विसर पडलेला आहे. " अरुणेचा गंभीर आवेश पाहून आबा हलकेच म्हणाला, " अरुणा-ताई, मी तुमच्या वाक्याचा अर्थ बरोबर ओळखतों. माझ्या मगाच्या विधनामुळें इतकं कांहीं वाईट वाटून घ्यायला नको. जाऊं द्या. ध्येयासाठीं तडफडणाऱ्या लोकांची या चंद्राप्रमाणें कठीण परिस्थिति असते. कधीं तोंड लपवावें लागते—कधीं उजळमाथ्यानें लोकांपुढें यायला सांपडते. माणसांचं मन शुद्ध असलं म्हणजे जगाची पर्वा करण्याचं कारण नाहीं——"
दोघेहीजण बराच वेळ बाहेर उभे होते.

# —१६—

झिंग्यानें आडून ऐकलेली बातमी आणि त्यावर अरुणेनें काढलेला तर्क अगदीं बरोबर होता. आबानें तानीला हातांतून काढून घेतल्याचा राग पाटील विसरला नव्हता. धोंडोपंत आपल्या बदलीचा राग आबावर काढण्या-साठीं टपलेलाच होता. दोघांच्याही मनांतून आबाविषयीं जळफळ धुमसत होती. ती जळफळ शांत करून घ्यायला जत्रेनें योग्य संधि आणवून दिली. त्यांचा डाव बरोबर पडला होता. आबाच्याविषयीं लोकमत कलुषित कर-ण्याचा त्यांचा डाव होता. विशेषतः इनामदारांच्या मनांतून आबा उतरला म्हणजे त्यांचें काम होणार होतें. म्हाताऱ्याच्या मनांत आबाविषयीं किल-मिष उत्पन्न करावयाचा हा डाव होता. धोंडोपंतांनी आपल्या सुपीक डोक्यां-तून पाटलाला हा मार्ग काढून दिला. पाटलानें पुढची व्यवस्था त्याच्या दृष्टीनें बरोबर केली होती.

आबा आपल्या आठवड्याच्या ‘भजनानंतर लोकांना कांहीं तरी माहिती सांगत असे हें जानबाला कळलें होतें. तो काय सांगत असे ह्याचा त्यानें आजवर विचारच केला नव्हता. परंतु धोंडोपंतानीं कानमंत्र देतांच त्याला आबाची आडवणूक करण्याचा मार्ग सांपडला. गेल्या दोन तीन महिन्यापासून लुटारूपणाची साथ त्या भागांत पसरली होती. सरकारच्या

दृष्टीनें हे दरवडे कॉंग्रेसच्या चिथावणीनें होत असावे असें होतें. तेव्हां त्याला पायबंद घालण्यासाठीं संशयित इसमांवर नजर ठेवण्याचीं फर्मानें सुटलीं होती. आबाला संशयित म्हणून अडकविण्याचें काम पाटील या पूर्वीही करूं शकला असता. परंतु बाळासाहेबांनीं आबाची बाजू हमखास उचलली असती व पाटलाचा सूडाचा बेत फसला असता. तेव्हां आबाला अडकविण्याच्या आधीं आबाविषयीं इनामदारांच्या मनांत संशय निर्माण करणें जास्त महत्त्वाचें होतें.

जत्रेला जाण्याचा अरुणेचा बेत पाटलाच्या बरोबर पथ्यावर पडला. झिंग्याचा बाप जत्रेआधीं गांवांतून दोन दिवस बेपत्ता होणें आणि पुनमचंदाच्या कोठारावर लोकांची दृष्टि असणें याचा पाटलानें कयास अचुक लावला. भिलवाडीच्या दरवड्याची कुणकुण पाटलाला दोन दिवस आधीं लागलेली होती. परंतु त्याची वाच्यता त्यानें केली नाहीं. जत्रेहून परत येतांना गांवचा गाडीवान बदलून त्या जागीं दुसराच मथवलेला गाडीवान योजून ठेवायचा हें त्यानें आधींच ठरवलें होतें. गाडी उशीर करून साधारण दिवे लागणीच्या बेताला भिलवाडीला आणून हजर करण्याची त्यानें गाडीवानास सूचना देऊन ठेवली होती. आणि त्याप्रमाणें गाडी अडवून ठेवण्याविषयीं व गाडींतील लोकांना पोलिसांच्या ताब्यांत देण्याविषयीं भिलवाडीच्या पाटलाला त्यानें आदल्या दिवशींच सांगून ठेवलें होतें. एकंदर योजना ही कीं, दरवड्याच्या ऐन वेळीं लोक हजर होते तेव्हां यांच्याच चिथावणीनें रामोशांनी दरवडा घातला असा वहीम भिलवाडीच्या पाटलानें घ्यावा व पोलीसांच्या ताब्यांत त्या दोघांना देऊन टाकावं. आणि स्वतःवर कांहीं जोखीम येऊं नये म्हणून पाटील धोंडोपंतासह दरवड्याच्या आधींच वळुंजाच्या वाटेनें निघून जायचे. बाळासाहेब लेकीची काळजी करीत असतील. त्यांच्या मनांत आबाविषयीं जहर ओतायचे. बाळासाहेब एकदां फिरले म्हणजे त्याचें काम होणार होतें. बाळासाहेबांनी फार तर अरुणेला सोडवून आणलें असतें पण आबाच्या भानगडींत ते पडले नसते.

परंतु ऐन वेळीं आलेल्या पावसानें व झिंग्यानें पाटलाचा बेत पूर्णपणें सिद्धीस जाऊं दिला नाहीं. पावसामुळें गाडी योग्य वेळीं भिलवाडीस जाऊं शकली नाहीं आणि झिंग्यानें सावध केल्यामुळें आबा आणि अरुणा

त्या रात्रीं भिलवाडीपासून दूरच राहिले. मुख्य म्हणजे पडणार म्हणून गाजलेला दरवडा झिंग्याच्या करामतीमुळें पडलाच नाही. बापाला कोंडून घालण्याची झिंग्याची युक्ति सफळ झाली. दारूची नशा उतरल्यावर झिंग्याचा बाप पोलिसांच्या आगाऊ तयारीची हकिकत ऐकून पुरता शुद्धीवर आला. त्यानें चावडीकडे त्या रात्रीं तोंडही केलें नाहीं. आणि पुढाऱ्याच्या खुणेची वाट पहात असलेले त्याचे साथीदार शेवटीं कंटाळून निघून गेले.

आबाला परस्पर अडकविण्याची युक्ति सफळ झाली नाहीं तरी त्याच्याविषयीं बाळासाहेबाच्या मनात संशय निर्माण करण्याची पाटलाची युक्ति बरीच यशस्वी झाली. भिलवाडीला मनाप्रमाणें सर्व व्यवस्था लावून पाटील अन् धोंडोपंत दिवे लागणीच्या सुमारास वळुंजाला येऊन पोहोचले. आतां या पुढें आपण होऊन बाळासाहेबांना कांहीं सांगावयास त्याच्या वाड्यावर जावयाचें नाहीं असें दोघांनीं ठरवून टाकले. मात्र आपण परत आल्याची वार्ता इनामदारांच्या वाड्यावर जाण्याची पाटलानें तरतूद करून ठेवली होती. धोंडोपंत पुढील घडामोडी जातीनें पाहण्यासाठीं पाटलाच्याच सदरेला जाऊन बसले.

त्यांच्या अपेक्षेप्रमाणें थोड्या वेळानें इनामदारांचा गडी चौकशी करण्यासाठीं आलाच. “ तुझ्या ताईसाहेब आतां काय गुड्ड्या एवढाल्या लहान्या हाय ती व्हय ! म्या मस्त सांगून पाहिलं पर त्यो तुझा नवीन शाळेचा मास्तर हाय नव्हं का—त्याच्या संगट त्या येणार म्हणून अडून बसल्यान् काय! येत्याल, येत्याल. तरुण रगात हाय दोघांचंबी. जरा वाईच गमत रमत येत्याल. आन् पावसापान्यानं आडिवलं वाटंत तर जरा येळानं येत्याल. ती बघ, कशी ईज चमकली—” म्हणून म्हणत पाटलानें त्या नोकराला वाटेस लावला. हा वेळपर्यंत अरुणा आणि आबा भिलवाडीच्या चावडीवर पोलिसाच्या बंदोबस्तीखालीं मुकाट बसले असतील याची त्याला पुरी खात्री होती. पाऊस भिलवाडीच्या बाजूनें येत होता म्हणून काळजी करण्याचें काय कारण होतें ? पाऊस सुरू होण्याच्या पूर्वीच ते दोघं भिलवाडीला पोहोंचले असावेत ही त्याची खात्री होती. वाड्यावरचा नोकर निघून गेल्यावर पाटील धोंडोपंताच्या हातावर हात मारून म्हणाला,

" धोंडोपंत, टाळी द्या राव. पाटलाचं टाळकं म्हणजे फुसकं कलिंगड नाय राव—" दोघेहीजण समाधानानें हसले.

सुमारें तासभर मुसळधार पाऊस झाला. पावसाचा पहिला जोर ओसरतो न ओसरतो तोंच वेणूनें धाडलेला एक पोऱ्या धोंडोपंतांकडे येऊन आबाची चौकशी करूं लागला. " म्हणजे त्या मास्तराची लंगडी बायकू वाटतं!" जानबा पाटील उपरोधिकपणानें हसून म्हणाले. धोंडोपंतांचें उदार हृदय एकाएकीं फुलून आल्यासारखें दिसलें, " जानबा, या योगायोगाच्या गोष्टी आहेत बरं सगळया! आमच्या कुटुंबानं तिची ओळख करून घेतली म्हणून तरी मला कळलं. पाचवडच्या काकासाहेबाची पोरगी. अशी चिमखडी होती म्हणतां लहानपणीं–काकासाहेबानं हा शिकलेला उंट पाहून दिला अन् पोरीच्या जन्माचा सत्यानाश केला बघा. ह्या उंटाला बायको घरांत आहे ह्याची शुद्ध असेल तरनं. सारखे वाळवंट तुडवीत हिंडणारे हे बुवा अन् ही घरांत टाकमटाक करीत आढ्याला डोळे लावून पडलेली. बिचारी सती सावित्री सारखी म्हणून या भंगडाला धरून राहिली. मी असतों तर केव्हांच याच्या नाकाला चुना लावून पळून गेलों असतो—" धोंडोपंत म्हणाले.

" पर मास्तर कवां येनार म्हून बाईस्नी सागू वो?" ती निरोप नेणारी बाई कंटाळून म्हणाली. जानबा पाटील एकवार खदखदां हसून म्हणाला—

" अग जा बाईस्नी सांगनारी. तुला तर लईच मंबईच्या गाडीचा झटका आलाया दिसतुया. तुझं मास्तर कुठं हायती अन् कवां येत्याल ह्ये आम्हास्नी काय ठावं? इनामदाराची प्वार तगड्या जवानाबरूबर संगतीला हाय–आतां त्ये दोघं कवा येत्याल ह्ये त्यास्नी दोघास्नी ठाव कां आमास्नी–चल जा इथनं–"

" तरीही हरकत नाहीं जानबा, या लढाईच्या दिवसांत इतकं आपण शिकलंच पाहिजे. साहेब जसा तीन तीन आघाड्या उघडून बसला आहे त्याप्रमाणें आबाच्या बायकोलाही चिथवलं म्हणजे काय बिशाद आहे ह्याची गांवांत राहण्याची? तशी ती बोलायला मोठी कडक आहे हे आमचं कुटुंब प्रत्यक्षच पाहात होतं की. नवरा बायकोंत झडली नाहीं असा एक दिवस गेला नाहीं म्हणतात. आगींत तेलाचा मारा छान करून दिलात. लंगडी बायको नवऱ्याचे सारे अपराध माफ करील पण दुसऱ्या तरुण पोरीबरोबर

तो हिंडलेला तिला समजला कीं त्यानं तिला फाडून खाल्लं नाहीं तर मला विचारा—" धोंडोपंत विजयी मुद्रेनें म्हणाले.

थोड्या वेळानें खुद्द बाळासाहेबांची स्वारी हातातली मुठीची काठी टेकीत जानबांच्या दारांत येऊन उभे राहिले. बाळासाहेबांच्या आगमनाची यानी अपेक्षा केलीच होती. आणि इनामदार आल्यावर काय बोलावयाचें, कसें बोलायचें हें आगाऊ ठरलेलेंच होते. जानबा पाटील लगबगीनें दारापर्यंत धावला.

"कशाला तसदी घेतलीत, मी म्हणतों वाईच येळानं मीच येणार होतों ताईसाहेब आल्या कीं नाहीं पघायला ?" जानबा काळजीमुक्त मुद्रा करून म्हणाला.

"जानबा पाटील, तुम्ही गाडीची सारी व्यवस्था नीट ठेवली होती कां ? अन् तुम्ही आधीं कसे पुढें आलांत ?" बाळासाहेब दारांतच उभे राहून म्हणाले.

"आत्तां माझं काय इचारतां ? या सरकारनं लईच कहार आणलाया. रातची झोप बी धड लागंना या सरकारापायीं. पुलगांवला ग्येलों अन पोलीस पार्टी आली कां साताऱ्यानं ! जमादारानं मला धरला अन म्हंगाला 'कीक मार्च' आतां आला का घोळ ? पर म्या सुभान्याची गाडी जोडाया. सांगून आलो होतों. येत्याल कीं. आबा मास्तरास्नीबी मी बिगी बिगी याया सांगून आलों नव्हं का ! पावसापाण्यानं घोळ आला असेल, येत्याल." पाटील अश्वासन देऊन मोकळा झाला. हा वेळपर्यंत धोंडोपंत दुरूनच सारा प्रकार पहात होते. ठिणगी पाडण्याची ही योग्य वेळ आहे असें पाहून ते पुढें येऊन म्हणाले, "अरुणाताई अन् आबासाहेब बाकी हा वेळपर्यंत कांहीं झालं तरी यायला पाहिजेत. आबाच्या बायकोकडून आत्तांच एक बाई चौकशीला येऊन गेली. तिला बिचारीला नवऱ्याची काळजी वाटणारच. अन् बिचारीचा स्वभाव तुम्हाला ऐकून ठाऊक असेलच म्हणा भारी संशयी. नवऱ्याच्या चारित्र्याविषयीं स्वतःच्या पत्नीनं शंका घेणं म्हणजे काय गोष्ट आहे ?"

"जानबा, तुम्ही दुपारीं निघालांत तेव्हांच त्या दोघांना बरोबर घेऊन यायचं. आतां यांचा शोध करायला जाणं तरी सोपं आहे कां ?" बाळा-

साहेबाच्या आवाजांत काळजीची दाट छाया पडलेली दिसत होती. स्वत: वरची जोखीम टाळण्यासाठीं सात्विक संतापानें नाकपुड्या फुगवून पाटील उद्गारला, "हां! अगदीं ह्येच मी ताईसाहेबास्नी म्हंगालों. इनामदार माझ्यावर लई गागत्याल म्हून मी सांगु लागलों तर त्यो मास्तर म्हणतो कमा 'जावो पाटील तुम्ही म्होरं. गुमान जा. मी अन् ताईसाहेब दोघं मंगट येणार. रातचं चांदणं पाहात पाहात येऊं.' ताईसाहेब तर अगदीं मतरल्या-वानी चूपचाप बसल्या."

"ताजं रक्त आहे. चांदण्याची मौज या वयांत पाह्यची नाही तर केव्हां?" धोंडोपंत फिदाफिदा हसून म्हणाले. बाळासाहेबांनीं एकवार जळजळीत दृष्टीनें त्या दोघांकडे पाहिले. धोंडोपंताच्यावर त्या रागीट कटा-क्षाचा यत्किंचित परिणाम झालेला दिसला नाहीं. उलट स्फुरण चढून तो पुढें म्हणाला, "बायकोसुद्धां संशय घेते म्हणजे कांहींतरी सुरल्याशिवाय का? ताईसाहेब तशा भाबड्या आहेत. अन् म्हणूनच जरा भीति वाटते. मलाही त्याचं हें उत्तर ऐकून जरा आश्चर्यच वाटलं. पण म्हटलं तुमचा त्याच्यावर पूर्ण विश्वास, आपण कांहीं बोलायला जावं तर आधींच आपण कानफाटे पडलेलों. त्यांत आणखी ही भर कशाला? हा काल गावांत आलेला साव ठरायचा अन् आम्ही गावांतले चोर ठरायचे. झालंच आहे तसं म्हणा—"

बाळासाहेब एक अक्षर न बोलतां अंधारांत आले तसे निघून गेले. पाटलाचा डाव यशस्वी होण्याइतपत त्यांच्या मनावर धोंडोपंताच्या बोल-ण्याचा परिणाम झाला असावा असें दिसत होतें. सुगंधाप्रमाणें निंदाही वाऱ्याच्या वेगानें फैलावत असते. बाळासाहेब जातां जातां धोंडोपंताच्या विखारी वाणीचा विचार करीत होते. एक मन त्यांना सांगत होतें कीं या या चोराच्या बोलण्यावर विश्वास टाकून आपण आपल्या मनाची शांती ढळं देणें योग्य नव्हे. पावसाच्या आकस्मिक येण्यानें वाटेंत थांबावें लागलें असेल त्यामुळें त्यांना यायला उशीर झालेला असेल. आबा तसा वाईट वळणाचा दिसत नव्हता. एक वर्षाचा परिचय हा मनुष्या-च्या मनाचा पुरता थांग लागायला अपुरा असला तरी पण आबाच्या-

विषयीं एकदम वाकडा ग्रह करून घेणें त्यांना रास्त दिसलें नाहीं. त्यांतून अरुणेवर त्यांचा पूर्ण भरंवसा होता. मुळांतच पोरगी थोडीशी धीट होती. त्यांतून आजवर केकवेळां मुंबईपर्यंतचा प्रवास एकटीनें करण्याचा सराव असल्यामुळें ती सहजासहजी फसायची नाहीं. पण दुसरें मन पुन्हा वर डोकें काढी अन् त्यांना कोपरखळी देऊं लागे. मनांत विचार येई कीं अरुणा शिकलेली आहे, धीट आहे म्हणून वेळ प्रसंगी चुकली जाणार नाहीं याला खात्री काय ? लढाईच्या या धामधुमीच्या काळांत कितीतरी मुली फसून वाममार्गाला लागल्याचें त्यांनी कर्णोपकर्णी ऐकलें होतें. त्याप्रमाणें अरुणेला फसवून आबानें आड मार्गाला नेली तर ? आबाचा भरंवसा तरी कशाच्या आधारावर यायचा ? ध्येय अन् कार्य ह्याच्या बुरख्याखालीं हा गृहस्थ आपली पाशवी इच्छा तृप्त करून घेण्याची तर संधी पाहात नसेल ? त्यांतून घरांत एक कजाग लगडी बायको नशिबानें पायाशीं घट्ट जखडली असतां कोणता पुरुष आपलें मन मारण्यांत यशस्वी होईल ? याला काय आगा आहे का पिछा आहे ? अरुणेच्या जन्माचें मातेरें करून हा दूरवर तसा परस्पर पळून गेला तर याला आडवायला कोणता पाश याच्याजवळ आहे ? आबाची बायको कजाग आहे म्हणून त्यांच्या कानावर आलें होतें. त्यांना स्वतःला कजाग बायकोचा मुळीच अनुभव नव्हता. आबाच्या बायकोचा कजागपणा त्याच्या इतरांना न समजणाऱ्या परंतु तिला पुरतेपणी समजणाऱ्या वाकड्या वागण्यामुळें कशावरून आला नसेल ?

छेः ! आपण अरुणेला जाऊं दिलं हीच चूक केली असे राहून राहून त्यांना वाटूं लागलें. एक वर्षाच्या परिचयाचा आबानें फायदा घेतला असेंच त्यांना वाटूं लागलें. आबानेंच तिला हरप्रयत्नानें फूस देऊन जत्रेच्या निमित्तानें घराबाहेर काढली असावी असें त्यांचें निश्चित मत बनूं लागलें. जानबाच्या आणि धोंडोपंताच्या शब्दावर त्यांचा विश्वास वाढूं लागला. जानबा पाटील दुर्वर्तनी असल्याचें त्यांच्या कानावर आलें होते. धोंडोपंत गांजेकस होते हें त्यांनी समक्ष डोळ्यांनी पाहिलें होतें. परंतु आपल्याजवळ ते थापाथापी करणार नाहींत असेंच त्याचें मन त्यांना ग्वाही देऊं लागलें. आपण तरी दोघांचें असें काय नुकसान केलें आहे म्हणून त्यांनी आपल्या डोळ्यांत धूळफेक करायला तयार व्हावें ?

वाड्यांत शिरतांना त्यांनीं साऱ्या शंकाकुशंका धुडकावून लावल्या. अरुणा परत आली असेल. अन् आपण नाहीं नाहीं ते विचार करीत बसलों हा केवढा आपला मूर्खपणा! ज्या पोरीला इतकं शिक्षण देऊन वाढवली ती काय अशी वाटेच्या चोराला फसण्यासाठीं? अन् आबा तरी वाटेचा चोर कशावरून? उगाच आपण तर्ककुतर्क करीत बसलों. गोंद्या गडी कंदील घेऊन पुढे आलेला पहातांच ते त्याला म्हणाले, "काय रे आल्या का ताईसाहेब?" मोठ्या अपेक्षेनें विचारलेल्या प्रश्नाला गड्याच्या मानेचा नकार मिळतांच पुन्हां त्यांचें मन भ्रमण करूं लागले. नुकतेंच छातीवरचा धोंडा दूर झाल्यासारखें हलकें वाटत होतें. पण तो धोंडा पुन्हां त्यांच्या छातीवर पडला. माडीवरच्या घड्याळानें अकराचे ठोके दिलेले त्यांनी ऐकले तेव्हां त्यांचें मस्तक पुरतें बिथरलें. वैरी चिंतत नाहीं तें मनानें चिंतलें जातें म्हणून म्हणतात तशी त्यांची गत झाली. जसजसी रात्र वाटूं लागली तसतसी म्हाताऱ्याची स्थिति मोठी अनुकंपनीय होऊं लागली. दर पंधरा मिनिटाला मोठ्या आशेनें गड्याला आबाच्या घरीं चौकशीला धाडावें, किंवा पाटलांच्या घरीं धाडावें, नाहींतर धोंडोपंताच्या घरीं धाडून द्यावें आणि प्रत्येक खेपेस गड्यानें कांहींच बातमी न आणल्यामुळें छाती फाटूं लागल्यासारखें होऊन जावें हा क्रम रात्रीं दोन तीन वाजेपर्यंत चालला होता. विचार करकरून बाळासाहेबांची वेड्यासारखी अवस्था झाली. समोरच्या दिवाणखान्यांत समोर जळता दिवा ठेवून ते अरुणेच्या येण्याची वाट पाहात एका जुनाट आरामखुर्चीवर पडून राहिले होते. रात्रीं दोन वाजून गेल्यावर खुद्द जानबा पाटलांची स्वारी बाहेरचे दार ठोठावूं लागली तेव्हा अरुणा आली या कल्पनेनें त्यांची कोण त्रेधा उडाली. जिना उतरून म्हातारा लहान पोराच्या उत्सुकतेनें धावतच कडी काढायला गेला. परंतु जानबाला पाहतांच त्यांची आत्यंतिक निराशा झाली. यावेळीं पाटील निराळाच विचार योजून आलेला दिसला—आंत येतांच त्यानें हलकेच बाळासाहेबांच्या कानांत सांगितलें, "भिलवाडीला दरवडा पडला असंल तथं दोघं बी गेले असत्याल. सकाळच्या पारीं सुखरूप येत्याल." बाळासाहेबांचा विश्वास बसणें शक्य नव्हतें. ते म्हणाले "पण पाटील, दरवड्याच्या ठिकाणीं माझी पोरगी जाणं शक्य नाहीं."

" हां. तेबी खरंच. पर मानसाचा काय भरंवसा देता येनार, बाळासाहेब ! ताईसाहेब मंबईला शिकलेल्या आन् हा आबा मास्तर पुन्याला राह्यलेला. भजनाच्या वक्ताला परत्येक गुरवारीं त्यो अन् ताईसाहेब राजदोहाची माहिती लोकांना सांगतांना परत्यक्ष धोंडोपंतानी ऐकलं आहे म्हून तरी माझा संशाव ! साहेबानं हें गांव सोडलं, तथं साहेब माघारा आला. जपान्यानं बांबगुळं पटोकलं हें सांगनं म्हंजी काय न्याय हाय व्हय ? त्यो आबा मास्तर तर काँग्रेसचा मानूस हाय म्हून मला सरकारनं त्याच्यावर नदर ठिवाया सांगितलं व्हतं नव्हं का ? पर म्या विचार केला कीं तुमासारख्यांना त्याच्यांत वाकडं दिसत नाहीं मग आपूनच का भूई धोपटा ? "

" पाटील, तुम्ही स्वत: आबाचीं भाषणं कधीं ऐकली आहेत का ? " बाळासाहेब कसल्यातरी संशयानें मधेंच म्हणाले.

" थू: त्याच्या ! मला टाईम गवसंल तर मी भजनाला जानार ! धोंडोपंत मघा मंघाले म्हून म्या तुम्हास्नी बोललों " पाटील नम्रपणाचा आव आणून म्हणाला. पाटील निघून गेल्यावर म्हाताऱ्याच्या डोक्यानें हें नवीनच वेड उचललें. अरुणा खरंच कां काँग्रेसची अनुयायी होती ? हल्लींच्या मुलांची काय खात्री द्यावी ? पिढ्यान्‌पिढ्या सरकारची इमानें इतबारें नोकरी बजावणारी रावबहादूर मंडळी सरकारी पेन्शन खात सैनिकीकरणाची फावल्या वेळेची चळवळ करीत असावी आणि त्यांचीं मुलें त्यांच्या न कळत तारा तोडण्याचें बेत करीत असावींत असे प्रकार गेल्या चळवळींत काहीं थोडेथोडके झाले नव्हते. अरुणा इतकी वेडी असूं शकेल ? ती नाहींतर तो मास्तरडा तिला फूस लावणारा आहेनं. त्यानंच तिला बिघडवली असली पाहिजे.

विचार करतां करतां अतिग्लानीमुळें त्यांचा पहाटें अंमळ डोळा लागला. स्वप्नांतसुद्धां त्यांना अरुणेच्या बंडखोरीचें चित्र दिसत होते. आबा खालीं उभा राहिला असून अरुणा एका तारेच्या खांबावर चढली आहे व हातातल्या पकडीनें तारा तोडीत आहे हें दृश्य पाहतांक्षणींच ते दचकून जागे झाले. नुकत्याच झालेल्या पावसानें बाहेर गारठा आलेला होता तरी

त्यांचें सारें अंग घामाघूम झालें होतें. समोरच्या घड्याळाकडे त्यांनीं पाहिले. चार वाजून गेले होते.

* * * *

सकाळीं सूर्योदयापूर्वी आबा आणि अरुणा परत आले. रात्रभर अरुणा बाहेर राहिल्यामुळें इनामदारांचें मन साहाजिकच अस्वस्थ झालें असेल, तेव्हां अरुणा त्यांच्या ताब्यांत देऊन सारा खुलासा करावा या निश्चयानें आबा अरुणेला घेऊन तडक इनामदारांच्या वाड्याकडे प्रथम गेला. झिंग्याने कबूल केल्याप्रमाणें एक मनुष्य उशीरा कां होईना पण धाडला होता. त्यांच्या मदतीने दोघेही पहाटे चारच्या सुमारास मधल्या वाटेने गाडींतून निघाले ते आत्ता वळुंजाला येऊन पोहोंचले. गोंद्याने दार उघडले. त्याने केलेल्या बाळासाहेबांच्या भांदलीचें वर्णन ऐकून आबा गंभीर झाला. अरुणा तोंड वगैरे धुण्यासाठीं खालींच राहिली. आबा जड पावलाने जिना चढून वर गेला. बाळासाहेबांनी त्याला पाहिल्यावर न भूतो न भविष्यति असा शब्दांचा मारा करण्यास सुरवात केली. त्याचे सगळे शब्द आबाने मनावर घेतले नाहींत परंतु पोरीच्या अब्रूवर घाला घातल्याचा त्यांचा आरोप मात्र त्याला मुळीच सहन झाला नाहीं. परंतु बाळासाहेबांना आडवून धरणें सोपें नव्हतें हें जाणून तो स्वस्थ बसला. बाळासाहेब तोंडाला येईल तें मोठ्या आवेशाने बोलून घेत होतें, "रात्रभर माझी पोरगी बरोबर घेऊन साऱ्या मुलुखभर तुम्ही वाटेल तसा धिंगाणा घातलात याचा अर्थ काय? तुमच्यावर मी विश्वास टाकला हा माझा गुन्हा काय? तिच्या अब्रूची तुम्हाला नाहीं पण मला काळजी आहे. तुम्ही काय जेवण झाल्यावर उठून चालते होणार पण मी पोरीचा बाप आहे. उद्यां पोरगी संसाराला लागायची आहे. तिच्याकडच्या माणसांना मी काय सांगू? तिला बरोबर घेऊन हिंडतांना तुम्हाला शरम कशी वाटली नाहीं? घरीं बायको लोळागोळा होऊन पडली आहे. एकीचा गळा कापलात तेवढा पुरें नाहीं झाला? तुम्ही कोण अन् ती कोण, काहीं विचार तरी कराल कीं नाहीं? तुम्ही एक यःकश्चित् भिकारडा शाळामास्तर अन् ती एक अब्रुदार इनामदाराच्या घरांत वाढलेली शिकलेली मुलगी. तिचा गळा कापलात अन् माझाही कापलात. सद्‌गृहस्था, तुझी पशूपणाची भूक

भागवायला गावांत इतर बायका काय थोड्या होत्या ? राक्षसा, माझीच पोरगी तुला कशी दिसली ? बोलानं आतां. दातखिळी कां बसली ? ”

“ बाळासाहेब, तुम्ही मला बोलूं द्याल तर मी सारा खुलासा करणार आहे.” आबा खिन्न मुद्रेनें म्हणाला.

“ खुलासा करतो आहे ! बेरडाची जात लेका तुझी ! तूं काय खुलासा करणार कपाळ ! तुझं तोंडच सांगत आहे. माझ्या पोरीची अब्रू घेतांना लाज नाहीं वाटली ! तुला दूध पाजलं अन् तूं शेवटीं माझाच चावा घेतलास. सर्पाची जात तुझी—” बाळासाहेब एकेरीवर येऊन बोलूं लागले. काय बोलावें आणि कसें बोलावें हें आबाला सुचेना. त्याचें अर्धवट उच्चारलेलें प्रत्येक वाक्य इनामदार मोठ्या त्वेषानें त्याच्यावर फिरवीत होते. अरुणा वर आली नसती तर आबा खात्रीनं तोंड लपवून पळून गेला असता. अरुणेला पाहतांच इनामदार त्वेषानें तिच्या अंगावर धावून गेले. “ कार्टे, हा काय खेळ माजवला आहेस ? ” बाळासाहेब संतापानें ओरडले.

“ नाना, तुम्ही आधीं शांत व्हा पाहूं.” अरुणा त्यांना हाताला धरून पुन्हां खुर्चीवर बसवीत म्हणाली. बाळासाहेब खुर्चीवर बसले खरे परंतु पुन्हां उसळून म्हणाले—

“ शांत व्हा ! तूंच बोलते आहेस कां हें ? कां त्या टोळभैरवाच्या नादानं तुलाहि पंख फुटले. मला जाब पाहिजे आहे. रात्रभर तूं कुठें होतीस हें कळल्याशिवाय मी स्वस्थ राहणार नाहीं. अन् या–या बुबडाचं तोंडसुद्धां पाहण्याची माझी इच्छा नाहीं. त्याला आधीं इथून हाकल. एक वेळ महा-रोग्याची सावली मला चालेल पण या माणसाच्या अंगावरून गेलेला वारा-देखील मला आतां सहन होणार नाहीं—”

अरुणेनें खुणेनेंच आबाला तेथून निघून [illegible] सुचवलें. आबा जागा सोडीना हें पाहून ती त्याला म्हणाली, “ आबासाहेब, आतां तुम्ही तरी जरा डोकं ठिकाणावर ठेवा. जा पाहूं तुम्ही. तुमचा खुलासा ऐकून घेण्याची मनस्थिति नानांची आहे असं का तुम्हांला अजून वाटतं आहे ? तुम्हांला खरंच सांगते. तुम्ही इथं राहिल्यानं मला मदत तर होणार नाहींच उलट त्रास मात्र होईल. जा तुम्ही. एका तासांत मी नानांची खात्री पटवून देतें–”

आबा खालीं मान घालून वाड्याच्या बाहेर पडला. इनामदारांच्या या त्राग्याचें त्याला सखेद आश्चर्य वाटत होतें. खुलासा ऐकून घेण्याचीसुद्धां त्याची तयारी नाहीं हें पाहून त्याला अतिशय वाईट वाटलें. त्याच्या मनांत विचार आला कीं अरुणेचा तर्क जर खरा असेल तर जानबानें आणि धोंडोपंतानें त्याचा सूड बरोबर घेतला होता. आतां स्वतःच्या घरीं मुकाट्यानें जाणें याखेरीज दुसरा उपाय नव्हता. आणि त्याच्या घरीं काय वाढून ठेवलेलें त्याला दिसलें ?

# — १७ —

रात्रीं धोंडोपंताच्या भाषणांतील बाईनें सांगितलेला एकूणएक शब्द ऐकून वेणू मनांतल्या मनांत जळत होती. रात्रभर ती अंथरुणावर उपाशींच तळमळत होती. आबाच्या येण्याची ती वाट पाहात टपून बसलेली होती. आबाच्यावरचा आजवर दाबून टाकलेला सगळा राग आज तिला एकदां झाडून टाकायचा होता. आतां हे चाळे सुरू झाले काय ? माझ्या जन्माचें मातेरें केलें आणि आतां गांवांतल्या पोरीबरोबर चैनी चालल्या आहेत काय ? थांबा म्हणावं. नाहीं तुमचीं भंबेरी उडवीन तर नावाचीच नव्हे. मला पांगळी करून ठेवली ती याच उद्योगाकरतां मोकळीक मिळावी म्हणून काय ?

आबाला आलेला पाहतांच वेणूनें जीभ मोकळी सोडली. आतांच इनामदारांच्या घरीं जो अनुभव आला होता त्यावरून त्यानें तर्क केला होता कीं आपली पत्नीही बिथरलेली असणार. त्या बेतानें त्यानें मन घट्ट केलें होतेंच. परंतु वेणूच्या बोलण्याचा हा झपाटा मात्र अपूर्व होता. असल्या जहाल वाग्बाणांना तोंड द्यायची त्याची तयारी नव्हती. वेणू बोलत असतांना तो स्वतःचें डोकें धरून पोत्यावर मटकन् खालीं बसला. त्याचें डोकें बधीर झाल्यासारखें झालें. वेणू बोलतच होती—"तगड्या पोरीबरोबर रात्रभर

हिंडतांना शरम नाहीं वाटली ? अन् आतां डोकें धरून मोठं सोंग आणतां आहां ! बरोबर आहे. घरची बाईल काय केव्हांही तुकड्यासारखी मोडून खाता येईल. पण बाहेरच्या पुरणपोळीची तुम्हाला चटक लागली आहे. माझा गळा कापलात. माझी मान इथूनतिथून तुम्ही चिरलीत, खेड्यांत जाऊन हे धंदे तुम्हाला करायचे होते हें मला काय ठाऊक नव्हतं ? काय म्हणे माझं ध्येय आहे. माझं कार्य आहे. दुसऱ्याच्या तरण्याताठ्या पोरींच्या तोंडची थुंकी झेलण्याचं तुमचं ध्येय होतं काय ? मी पडलें अशिक्षित अन् ती ढालगज भवानी मुंबईला शिकलेली, म्हणून तुम्ही तिला भाळलांत काय ? गुरवारी भजनं करताहेत म्हणे हे मंबाजीबुवा ! बुवा मोठे सात्विक ! यांच्या कासोट्याचं तीर्थ घ्यावं अन् वैकुंठाला जावं. इतके दिवस दुरून दुरून तुमच्या गमजा पाहात होतें; मी म्हटलं आहे खुळचट, घ्यावं जरा कला-कलानं. पण आतां तुम्ही माझ्या जिवावर उलटाल. ती पांढऱ्या पायाची अवदसा तुम्हाला मिळाली आहे. तिच्या नादान तुम्ही एकादे दिवशीं नरडं दाबून माझा प्राणसुद्धां घ्याल. तुमची आतां मला खात्री देतां येत नाहीं, साप म्हणू नये आपला त्याचप्रमाणें नवरा म्हणू नये धाकला हें अगदीं खरं आहे. माझ्या साऱ्या जन्माची तुम्ही परवड केलीत. तुम्ही माझ्या आशा आकांक्षांची राखरांगोळी केलीत. तुम्ही माझा सत्यानाश केलात. इतकंही करून तुमचं समाधान झालेलं दिसत नाहीं. माझ्या मरणाची तुम्ही वाटच पाहात होता. आतां माझ्या मनावर हे असले निखारे ठेवून तुम्ही मला जिवंत जाळू पहाता आहां. तुम्हाला काय वाटलं, मी अशी तशी मरेन ? तुमच्या दोघांच्या डोक्यावर तांदुळाच्या अक्षता टाकून मी मरेन असं तुम्हाला वाटतं ? नांव सोडा. मी मरणार नाहीं. मी जिवंत राहून तुम्हाला छळीन. जिवांत जीव आहे तोंवर साऱ्या जगाला मी ओरडून सांगेन 'हा गृहस्थ साधु नाहीं. हा गृहस्थ थोर मनाचा नाहीं. हा भोंदू आहे हा नीच आहे. दगाबाज, कपटी, नीच, हलकट आहे'—"

आबाला आतां मात्र यापुढें सहन करणें कठीण होतें. माणसाच्या मनाला आणखी किती सहन करणें शक्य आहे ? आजवर त्यानें एका शब्दाने वेणूला आपण होऊन दुखवलें नव्हतें. परंतु आतां मात्र त्याला राहवेना. डोकें वर करून तो तिच्याकडे तिरस्कारानें पहात म्हणाला, " काय बायको

आहेस कां सांग आहेस? तुझा पति झाले ह्या गुन्ह्याचं प्रायश्चित पुरे नाही का झालं? किती बोलशील? किती ओरडशील, काही मर्यादा आहे कीं नाही तुला?"

वेणूच्या अंगाचा आगभडका उडाला. आतां तिने सारी मर्यादा साफ झुगारून देण्याचें ठरविल्यासारखें दिसलें. आबाचें हे उद्धट बोलणें तिला खवळून सोडण्यास कारण झालें. बोलता बोलतां तिचें अंग थरथर कापूं लागलें. तिची जीभ अडखळूं लागली. तिच्या कपाळावर घामाचें थारोळें झालें. विकाराच्या भरांत आपण काय बोलतों आहोत, काय करीत आहोत याचें भान राहिलें नाही—आणि सारें बळ एकवटून ती लाल डोळे करून अंथरूण सोडून जाग्यावर ताठ उठून उभी राहिली.

—आणि आबा तिला सावरून धरायला जाणार तोंच तोल जाऊन ती धाडकन् जमिनीवर कोसळली. जात्याचा खुटा कपाळावर लागल्यामुळें तेथून भळभळां रक्त वाहूं लागलें. वेणू पूर्णपणें बेशुद्ध होती. तिच्या डोक्या-वर पाणी मारण्यासाठीं तो तिला नीट जाग्यावर निजवून पाणी आणण्या-साठीं उठणार तोंच बाळासाहेब आणि अरुणा आपल्या मागच्या बाजूस उभे असलेले त्याला दिसले. बाळासाहेबांची मुद्रा उतरलेली दिसली. ही वेळ बोलण्याची नव्हती. वेणूला शुद्धीवर आणण्यासाठीं तिघेजण आपापल्या-परीनें एक अक्षर न बोलतां झटूं लागले. वेणूच्या कपाळावरच्या जखमेंत हळद आणि चुना भरून अरुणेनें त्यावर एक पट्टी बांधून टाकली. थोड्या वेळानें रक्त येण्याचें थांबलें परंतु वेणू शुद्धीवर येण्याचें चिन्ह दिसेना. मधेंच बाळासाहेब अर्धवट स्वतःशींच म्हणाले, "बिचारीचा काय दोष? एवढा मोठा म्हातारा खोकड पण मीसुद्धां फसलों. ही तर काय बोलून चालून बायको माणूस."

आबानें उत्तराऐवजीं कृतज्ञतेच्या भावनेनें त्याच्याकडे व अरुणेकडे पाहिलें. सुमारे दोन तासांच्या अवधीनंतर वेणूनें डोळे उघडले. डोक्याशीं बसलेल्या आबाला तिनें हातानें कसली तरी खूण केली. आबा जवळ जाऊन तिला कोण पाहिजे म्हणून विचारूं लागला. परंतु वेणूनें खुणेनें पाणी मागि-तलें. आबाला शंका आली. आणि दुर्दैवानें आबाची शंका खरी ठरली.

मला मन मोकळं करून बोलून घ्यायचं आहे. तुम्हाला त्या दिवशीं चटकन् झोपडीबाहेर कां जावंसं वाटलं हें मी ओळखलं. अन् खरं सांगू? तुम्ही मोह आवरला नसता तर मी त्या दिवशीं घसरलेही असते. विशुद्ध प्रेमाच्या गोष्टींवर कुणाचा विश्वास बसत असेल तो बसो. पण तुमच्या[illegible]पयीं माझ्या मनांत, कुतूहल, नंतर आदर व शेवटीं प्रेम निर्माण झालें होतें. निर्लज्ज-पणानं हें मी बोलते आहे. याचं कारण मी आतां त्या पायऱ्या ओलांडून पुढें गेलें आहे. वेळ आली तर स्त्री आपल्या आवडत्या पुरुषासाठीं कोणता स्वार्थत्याग करूं शकते हें मी दाखवते आहे. मी इथें राहिलें तर कदाचित् मी मोहवश होईन. आणि तुम्ही कितीही धीराचे असलात तरी पुरुष आहात हें विसरून चालणार नाही. शेवटीं [illegible] फसला. आबासाहेब, मी इथून जाणार आहे तें केवळ तुमच्यासाठीं. तुमच्या कार्याच्या आणि ध्येयाच्या आड मी येऊं नये ह्या इच्छेने मी दूर जात आहे. मला हसतमुखानं निरोप द्या—”

[illegible]शीच विचार करीत बराच वेळ उभा होता. यःकश्चित् [illegible] अन् ही इनामदारांची शिकलेली पोरगी? आपण एक त्या दिवशीं घसरणार होतो पण ही सुद्धां—? जगांत अनेक आश्चर्यें असतात, त्यांतलें स्त्रियाचें मन हें पहिलें आश्चर्य होय. मान वर करून तो तिच्या डोळ्यांकडे पाहात म्हणाला—

“अरुणाताई, तुम्ही जावं असं मी कोणत्या तोंडानं म्हणू? पण तुम्ही सांगतां त्या परिस्थितींत तेंच योग्य आहे. मी मोहवश झालों कीं माझें कार्य संपलें. माझें कार्य थांबलें कीं माझें ध्येय नष्ट झालें. आणि कांहींहि झालें तरी ध्येयाविना जीवन ही कल्पनाच मला शक्य वाटत नाहीं. मी मनुष्य आहे याची जाणीव तुम्ही आत्तांच मला करून दिलीत. पण ती जाणीव दुसऱ्याला करून देण्याची जरुरी नाहीं, इतकी ती तीव्र आहे. ध्येयाचा मार्ग नेहमींच खडतर असतो, काट्याकुट्यांनीं भरलेला असतो, आणि म्हणूनच कीं काय त्या मार्गानं प्रवास करण्याची ईर्षा उत्पन्न होतें. माझें ध्येय अगदीं सामान्य आहे, हें मी जाणतों. पण तें साध्य करून घेण्यासाठीं मला एकट्यालाच धडपडावें लागावें हेंच योग्य आहे. तें साध्य करीत

असतांना अनेक मोह येतील तें नाइलाजानें दूर करणें माझें कर्तव्य आहे. वेणूच्या तडफड्या स्वभावामुळें माझा हा एक फायदाच झाला आहे. मोह दूर करायला तिनें मला शिकवलें. तिच्या दुराग्रही स्वभावामुळें मला चिकाटी कशी दाखवावी हें पटवून दिलें. आतां यापुढें मी आणि माझें ध्येय, यापुढें दुसरा विचार मी मनांत येऊं देणार नाहीं."

अरुणा निघून गेली तरी आबा बराच वेळ तिच्या वाटेकडे डोळे लावून त्याच ठिकाणीं उभा होता !

समाप्त

# बोकील यांचें वाङ्मय

## प्रकाशित—

### कादंबऱ्या

( १ ) फोल आशा
( २ ) झंझावात
( ३ ) दुसरी सावली
( ४ ) मंगळागौरीच्या रात्रीं—
( दु. आ. )
( ५ ) बेबीची बहीण
( ६ ) साडेतीन शहाणे
( ७ ) चल पुढें
( ८ ) आबा
( ९ ) बेबी

### कथासंग्रह

( १ ) वळवांचे पाऊस
( २ ) गारांचा वर्षाव
( ३ ) जलधारा
( ४ ) मांडवावरील वेली
( ५ ) उल्कापात
( ६ ) बोकिलांच्या गोष्टी
( ७ ) बेबीचा भाऊ
( ८ ) झिमझिम
( ९ ) चिमखडे
( १० ) बरसात
( ११ ) अत्तराचे दिवे

### नाटिका

( १ ) तारांगळ
( २ ) मीना–नीना

* * *

## आगामी—१९४४

( १ ) ब्रह्मघोटाळा ( कादंबरी )
( २ ) वसंत ,,
( ३ ) द्वंद्व ,,
( ४ ) पिवळा बंगला ,,
( ५ ) गामा गुंगा ( क. सं. )